श्री

भारत-इतिहास-संशोधक मंडळ

पुरस्कृतग्रंथमाला क्र. २४

# शिवचरित्र-साहित्य

## खंड ३ रा.



संपादक—

रा. रा. शंकर नारायण जोशी,

रा. रा. गणेश हरी खरे.



मुद्रक व प्रकाशक—

रा. रा. शं. न. जोशी, 'चित्रशाळा प्रेस' १०२६ सदाशिव पेठ,
पुणें शहर



श. १८५२ ]  किंमत ३ रु.  [ इ. १९३०

# प्रस्तावना.



शिवचरित्रसाहित्याच्या या तिसऱ्या खंडांत ले. ३९८ ते ६७४ म्हणजे २७७ कागद प्रसिद्ध केले आहेत. पत्रें प्रसिद्धीस येण्यापूर्वी पुढील सात गोष्टी कराव्या लागतात. ( १ ) कागदांचा पत्ता लावणें (२) कागद मालकांकडून मिळविणें. ( ३ ) नकला करणें व रुजू पाहणें ( ४ ) तारखा ठरविणें ( ५ ) कालानुक्रमानें लावणें, दुबार असलेले कागद काढून टाकणें किंवा संक्षेप करणें, टीपा देणें आणि प्रेस कापी तयार करण्यासाठीं करावी लागणारीं इतर कामें करणें. (६) प्रुफें तपासणें ( ७ ) व सूची करणें. या सात गोष्टीपैकीं पहिली तीन कामें आम्हीं केलेलीं नांहींत.पुढील ४ कामें बहुतेक आम्हीं केलीं आहेत. कांहीं फार्मांचीं प्रुफें तपासतांना व सूची लिहितांना श्री. दि. वि. काळे एम्. ए. यांची मदत झालेली आहे.

शिवचरित्रसाहित्याच्या पुस्तकांत शिवोत्तरकालीन कागद आलेले पाहून वाचकांस आश्चर्य वाटेल. पण कागद घराणेवार मिळतात, व सोय, एकसूत्रता, वगैरे दृष्टीनें कै. राजवाडे यांनीं घातलेल्या पद्धतीप्रमाणें ते घराणेवार छापणेंच युक्त असतें. यामुळें अशा पुस्तकांत शिवोत्तरकालीन कागद येणें अपरिहार्य आहे.

इतर खंडाप्रमाणें याही खंडांतील कांहीं कागद अस्सल तर कांहीं नक्कल आहेत. आंतील माहितीमुळें कांहीं कागद संशयास्पद ठरतील. याद्यांतील मित्या व वंशावळींतील पुरुष हे नेहमीं बरोबरच असतात असें नाहीं. पण प्रत्येक कागदाची चिकित्सा करून त्यातून इतिहास काढणें हें काम कालावधीचें, विशेष कुशलतेचें व खोल अभ्यासाचें आहे. तितकी सवड नसल्यानें मूळ कागद मिळाले त्या स्वरूपांत वाचकांपुढें ठेविले आहेत.

पुस्तकास शेवटीं सूचि जोडलेली आहे. त्याबरोबरच, छापलेलीं पत्रें किंवा लेखांक कोणी कोणास उद्देशून व कशासाठीं लिहिले ह्याचीहि स्वतंत्र यादी देणें फायद्याचें होईल. आणि ' शिवकालीन-पत्र-सारसंग्रह ह्या ग्रंथांतील सर्वहि म्ह. २३४० लेखांक अशा प्रकारेंच छापलेहि आहेत. फरामीन्-उस्-सलातीन् ह्या फारसी पुस्तकांतहि हा प्रकार अवलंबिला आहे. त्याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांत करावयाचें. परंतु, ह्यांतील लेखांक कालानुक्रमानें पण घराणेवार छापले असल्यामुळें शिवाय तशी यादी देणें तर तीहि पुनः लेखांकानुक्रमानें देण्यापेक्षां पाठविणाराच्या नामानुसार अकारादिक्रमानें देणें इष्ट असल्यामुळें नुसती तशी यादी देण्याची तितकी आवश्यकता नाहीं.

यांतील निरनिराळ्या घराण्यांतील कागद कोणी दिले व कोणी संशोधिले हें अनुक्रमाणिकेवरून दिसून येईल. यापैकीं ३-६ प्रकरणांतील पत्रें आज प्रसिद्धीसाठीं मिळण्याच्या कामीं रा. गो. स. सरदेसाई ( रियासतकार ) व ठाण्याचे रा. ल. वि. भावे यांनीं

सहाय दिलें, याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहों. संशोधन करण्याबद्दल संशोधकांचे आभार मानणें ज्याप्रमाणें आवश्यक आहे, त्याप्रमाणें किंवा त्याहून जास्त ज्या मालकांनीं उदारपणें कागद दिले त्यांचे आभार मानणें युक्त आहे. ते उदारपणा दाखवितात म्हणून पूर्वजांचा बरा वाईट इतिहास उजेडांत येतो. तेव्हां इतरांनींही असाच उदारपणा दाखवावा येवढीच सप्रेम विनंति आहे.

भा. इ. सं. मंडळ, पुणें.
श्रावण शु. ५ शक १८५२

शंकर नारायण जोशी
गणेश हरी खरे

# पुरस्कार.



श्रीशिवचरित्रसाहित्य खंड तिसरा हा मंडळाच्या पुरस्कृतमालेंत समाविष्ट होऊन प्रसिद्ध होत आहे. हा खंड श्रीशिवचरित्रकार्यालयाकडून श्रीशिवछत्रपतींच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवानिमित्त जी ग्रंथावली प्रसिद्ध झाली, त्यांतीलच एक भाग आहे. आणि याच्या प्रकाशनाचा भार चित्रशाळेच्या चालकांनीं पतकरून श्रीशिवचरित्रसाहित्यप्रसिद्धीस मोठें साहाय्य दिलें आहे; याबद्दल मंडळातर्फे चित्रशाळेच्या चालकांचे आभार व्यक्त करणें आमचें कर्तव्य आहे.

श्रीशिवचरित्रसाहित्य या नांवानें स्वतंत्र खंड काढण्यास प्रारंभ केल्यापासून पुष्कळच तत्कालीन उपयुक्त कागदपत्रें हातीं येत आहेत. साधनप्रसिद्धीचा प्रवाह जों जों खोलावत व रुंदावत जातो तों तों तिच्या आधारानें ज्यांनीं इतिहास कथन केला पाहिजे आणि आम्हीं तसें करतों म्हणून ज्यांची प्रतिज्ञा असते अशांची परिस्थिति खरोखर अधिकाधिक कठिण होत जाते. पूर्वी बनविलेला वृत्तांत स्थळोंस्थळीं चिताडून, खोडून भग्न करावयाचा प्रसंग येतो आणि ज्यावेळीं हें नूतन साहित्य द्राक्षापाकवत् सहज सेव्य नसतें आणि नारिकेलपाकाप्रमाणें बहिःकठिण, व नीरस व रुक्ष असतें त्यावेळीं तें नारिकेलकवच फोडून आंतील मधुररसाचें सेवन करणें व करविणें हें अभ्यासाभावीं ज्यांच्या आवाक्याच्या बाहेरचें असतें त्यांनीं ' ह्या कवटयांत काय आहे ? ' म्हणून उपहास करावा यांत आश्चर्य नाहीं. इतकेंच नव्हे तर ' द्राक्षेंसुद्धां आंबट ' म्हणून त्याचें सेवन न करतांच प्रौढी मिरविण्याचा खटाटोपहि कित्येकांस आवरत नाहीं.

मोघम आरोप करून जनतेच्या मनांत कालुष्य उत्पन्न करणें हें भलेपणाचें कार्य नाहीं. कोणी म्हणतो ' अहो, हें इनामांचे व वतनांचे कागद, तेव्हां त्यांत बनावटच पुष्कळ. '

आतां इनामाच्या व वतनाच्या खटपटींत लटपटीलाहि पुष्कळ अवसर असतो हें जरी खरें आहे तरीं तेवढ्यावरून सर्व इनामी व वतनी कागद बनावट म्हणून त्यांचेकडे दुर्लक्ष्य करणें अशास्त्रीय व घातक आहे. बनावटपणांतहि पुष्कळ प्रकार करितां येतील. सर्वस्वीं अगदीं निखालस बनावट कागद आणि माहितगारीनें आणि सावधगिरीनें तयार झालेला बनावट कागद हे दोन्ही बनावट असले तरी त्यांस एका मापानें मोजणें प्रमाणशास्त्राचे नियमांस धरून होणार नाहीं. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे इनामी व वतनी कागदांतहि अस्सल कोणते, बनावट कोणते आणि बनावट असतील ते कसल्या दर्जाचे बनावट याचाहि निर्णय करतां येतो, आणि मग सावधपणें या कागदांची विचिकित्सा करून त्यांतून इतिहासरचनेस उपयोगी असे विश्वसनीय माहितीचे कण गोळा करतां येतात. हें काम फार श्रमाचें व जोखमीचें आहे.

पण तें तसें आहे म्हणून सर्व इनामी व वतनी कागदांस नाकें मुरडून रद्द समजणें इतिहासकारांना शोभणार नाहीं. या इनामी व वतनी कागदांत पुष्कळदा एकतर्फी मजकूर असतो हेंहि खरें. परंतु खाजगी वादांत सहजगत्या ज्या सार्वजनिक किंवा राजकीय बाबींचा उल्लेख येतो तो विचारांत घेणें आणि त्याचा अवांतर पुराव्याचे जोडीनें निर्णयकर्मांत उपयोग करणं अवश्य आहे. असे उल्लेख एकतर्फी असण्याचा संभव बराच कमी असतो. या उल्लेखापेक्षांहि बलिष्ठ व विश्वसनीय पुरावा मिळेपर्यंत हेच उल्लेख प्रमाण समजणें योग्य होईल. तसेंच स्थळांचे वगैरेहि असेच उपयुक्त उल्लेख जमा करितां येतात. स्थळकाळनिर्णयाला या अशा उल्लेखांची मदत बिनमोल होते. मात्र इतिहासाचे कामीं सावधपणा कोठेंच विसरतां येत नाहीं

घराण्यांचे कागदांत घराण्यांबद्दलची माहिती असते ती जरा विचारानेंच पत्करिली पाहिजे. त्यांत एकतर्फीपणाला वाव पुष्कळ. तथापि महजर, निर्णयपत्रें यांचे मदतीनें सत्यनिर्णय करण्यास पुष्कळ साहाय्य होतें.

असो; तर याप्रमाणें विचार केला म्हणजे या खाजगी कागदांचाहि इतिहासविरचनेस केवढा उपयोग होऊं शकतो हें ध्यानांत येईल. आणि म्हणूनच ते प्रसिद्ध करण्याचें अगत्य. मिळेल तो कागद संशोधक छापतात असाही एक प्रवाद कोठें कोठें ऐकूं येतो. तसेंहि खरें नाहीं. कै. खरेशास्त्री यांनीं एकदा या भ्रमाचे निराकरणार्थ सांगितलें कीं ऐ. ले. संग्रहाचे १०।१२ खंड किंवा पांच सहा हजार पत्रें जमविण्यासाठीं सुमारे चारलक्ष पत्रें आपणांस चाळावीं लागलीं ! हाच अनुभव इतरांचाहि आहे.

असो. श्रीशिवप्रभूचा इतिहास श्रीशिवचरित्रसाहित्याचे प्रकाशनानें अधिकाधिक विश्वसनीय व निश्चित असा पुढें येत आहे आणि लवकरच जुने बखरी इतिहास रद्द होऊन नवा शास्त्रीय व सप्रमाण इतिहास जगापुढें येईल अशी आम्हांस उमेद आहे. जनतेकडून भरपूर प्रमाणांत कागदपत्रांचे रूपानें आणि द्रव्यरूपानें संशोधनास साहाय्य मिळेल असें आजपर्यंतच्या अनुभवावरून वाटतें.

श्रीशिवचरित्रकार्यालयांतील संशोधक, कागदपत्रांचे मालक, इतर साहाय्यक आणि मुद्रक यांचे पुनः एकवार आभार मानून पुरे करितों.

नागपंचमी १८५२ }

**दत्तो वामन पोतदार.**
**चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें.**

# संक्षेप व त्यांचा खुलासा.



अ०—अजम

अज र०—अज रख्तखाने

अधि०—<br>अ-आद०— } —अधिकारियान

अ आ०—आनाम

आली०—आली शान

इस्कील०—इस्कील करील त्यासी आपापले महजबेची सौगंद असे.

इस्मी०—इस्मी व रस्मी

औलाद०—औलाद व अफलाद चालवीत जाणे

क०—कलमी व कदमी

क०—कसबे

कार०—कारकुनान किंवा कारकुनान हाल व इस्तकबाल

कु०—कुयरीच्या आकाराचा

कुल०—कुलबाब, कुलकानू

तुली-कुली०—खुली-दयाम दौल

खा०—खान

खुदा०—खुदायेवंद

चौ०—चौकोनी

चौधा०—चौधारियान

जमे०—जमे लवाजिमात

तालीक०—तालीक लेहून घेऊन असल परतोन देणे.

दर हर०—दर हर साल, ताज्या खुर्दख-ताचा-सनदेचा उजूर न करणें.

दाम०<br>धाम० } —दाम दौलतहु

दि०—दिवाण

दे मु०—देशमुख

देस०—देसमुखान

देशा०—देशाधिकारी

न०—नकदी व जिनसी

नक०—नकदियात

नक्त०—नख्तयाती

नजर०—नजर इनायत फर्माऊन

( नि ).—अक्षर निराळें, (नपासून पुढचें)

प्रति०—'प्रतिपत्'नें आरंभ होणारा

प्रा०—प्रमाणें

फा.—फारशी

ब.—बहुदळी

बजा०—बजानेब

बदा.—बदामी

बराए०—बराए मालुमाती खातिरेसी आणौनु

बाजे०—बाजे उजूहाती

बिदा०—बिदानंद

बिनाबरा०—बिनाबरा इल्तमेसी खाति-रेसी आणून

म०—( नांवापाठीमागें ) मलिक

म०—मजकूर

मशु०—मशुरल

मर्या.—'मर्यादे'नें आरंभ होणारी

मा०—मामले

माहा०—माहाल

माहा०माहासूल किंवा महसूल व नख्त-याती

**मु०**—मुकाम
**मुकासा०**—मुकासा अर्जानी जाला आहे
**मुसलमान०**--मुसलमान होऊन इस्लील करील त्यास मक्केची-मुसाफेची सौगंद असे
**मो.**--मोर्तब
**मोक०**—मोकदम
**रा०**--राजश्री
**राज०**--राजमान्य
**शि.**—शिक्का
**लं. व.**—लंबवर्तुळी
**वा०**--वाटोळा
**ष.**—षटकोनी
**ष. को.**—षट्कोनी
**साइरे.**--साइरे कानूनात
**सी.**--सीमा
**से०**--सेकिन
**हज०**—हजरत
**हद०**—हदमहदूद घालून देणे
**हरसाल०**—हरसाल ताज्या खुर्दखताचा उजूर न करणे
**हवा०**—हवालदार
**हाल०**—हाल व इस्तकबाल
**हुदे०**—हुदेदारान
**हुजूर०**—हुजूर येऊन मालूम केले जे
**हिंदु०**—हिंदू होऊन इस्कील करील त्यास कासीत गाय मारलेचे पातक असे.
**क्षत्रिये कु०**—क्षत्रिये कुलावतंस

---

# अनुक्रमणिका.



भारत-इतिहास-संशोधक मंडळ पुणें.

# शिव-चरित्र-साहित्य खंड २ रा.



## १ चांवळी-सरनाईक.



ले. ३९८ | श. १५८६ ?<br>इ. १६६४

-॥ द अखडित लक्ष्मी राजमान्य राजश्री निलोजी नीलकठराऊ व सकराजी नीलकठ-राऊ व विसाजी नीलकठराऊ व त्रिबक नीलकठराऊ इनामदार देह ता कऱ्हेपठार यासि बापाजी नरसिगराऊ व येसवतराऊ सितोले देसमुख मोरो विठल व रामाजी गोविद व मुकुद कान्हो देसपाडे पा। पुणा दडवत व अनुक्रमे नमस्कार विनती उपरी तुमचा इनाम बिता देहाये कऱ्हेपठार व नीरथड

मौजे चावली कास टका १८ येक | मौजे पूर आबेपेड व तालिया खाले खाचर आहे | मौजे जेऊरी झो ...... रापी आहेत बिघे १०

मौजे कोढत खुर्द इनाम लावणी होती ते तहवेली करिता तुटले याचे टुकडे येक | मौजे किकवी कास रुके ८८॥ | झाडोरा आबे पेडी

येणेप्रमाणे तुमचा इनाम आहे तुम्हापासी दिवाणीचे फर्मान व खुदखते होती त्या सनदा तुमचा भाऊ सकराजी नीलकठराऊ मौजे चावलीस होते सन आर्बामधे पेडीगावीहून दौड मोगलाची जाली ते वक्ती सकराजी नीलकठराऊ खेडेबाराचे डोगरी होते ते दौडेस सापडिले त्यापासी सनदा होती त्या (या) त्या सनदा गेलिया म्हणौउनु तुम्ही सागितले कलो आले तुम्ही आपणास बोलिलेस जे आपली सनद देणे तरी तुमचा इनाम देहाये मजकुरी जमीन व झाडोरा आहे तो तुम्ही खात आहा व तुमचे वडील खात आहेत तुमच्या इनाम जमीन कास त्याचा नख्त व महसूल व पायेपोसीया पटी व बाजेबाब व वेठी बेगारी पालनूक सालाबाद चालिले आहे तेणेप्रमाणे तुम्हास भोगवटा आहे तेणेप्रमाणे

आपली जमीन खाणे व शाडोराहि आहेत तो खाने तुमचा इनाम कारकीर्दी मलिक अंबर व हैबतखान व कारकीर्दी माहाराज साहेबू व कारकीर्दी हाली राजश्री राजे साहेबाचे इनाम चालिला आहे तेणे माफिक खाणे बहुत लिहिणे न लगे हे विनाति यासि आम्हापासुनु अतर पडो ने दु यासि आण श्रीकुलस्वामीची व आपले पूर्वजाची असे हे विनती

---

ले. ३९९ } { श. १५९६ कार्तिक शु. १०
स. १६७४ आगष्ट २९.

श्री

सिवाजी राजे याणी पत्र निलो [ महादार्जी ] निलकंठराव नाईकवाडी किले पुरंधर निजामशाही किला बलाकाऊन भोवता मुलूख मारून खडणी घेऊन होतो इनाम गाव किल्याखाली होता हाकदस्तुरी होती शाहाजी राजे याचा घरोबा फार होता त्याजवरून पत्र पाठविले जे दादो कोंडदेव आम्हाजवळ वडिलीं ठेऊन दिल्हे होते ते मृत्ये पावले आता आम्ही निराश्रीत जालो तुमचे व आमचे वाडिलाचा बहूत घरोबा स्नेह यास्तव किल्या आश्राने खाली माचीजवळ येऊन राहू तुम्ही सांभाल तसी वर्तणूक करीत जाऊ ते समई त्याणी उत्तर लिहून पाठविले की उत्तम आहे घर आम्हां किला तुमचा आहे दुसरा विच्यार नाही आपण यावे यैसा उत्तर येताच घरात स्त्रीस व जिजाबाईस सागून आपण पंचवीस हजार मावले व पागा घेऊन गडाखाली येऊन राहिले पावसाला येथे छावणी केली निलोजी निलकंठराव वडील व पिलाजी निलकंठराव मधवे व शंकराजी नीलकंठराव धाकटे यैसे तिघे बंधू होते निलोजी निलकंठराव किल्याचा कारभार करीत होते शंकराजी नील कंठराव रिकामेच घरी होते त्यास सिवाजी राजे याजपासी ठेविले सिवाजी राजे त्यास मानू लागले तेव्हा शंकराजी निलकंठराव याणी आपेल मनोगत राज्यास येकांती सांगितले जे आमचे बंधू आम्हास वाटा देत नाहीत व काही कामकाज सांगत नाहीत आंनवस्त्र खाऊन आजपर्यंत होतो आता साहेबाजवल आहे किल्याची वतनी चाकरी माझा वाटा मजला देऊन तिजाई हिशाचे कामकाज माझे मजला सोपून द्यावे यैसी येकांती सागोन सिवाजी राजे याणी मांन्य केले काही चिंता न करणे तुमचा बदोबस्त करून देऊन यैसे कबूल करून जवल ठेविले नित्ये भोजन येके ठिकाणी करावे बहूत प्यारे त्याजवर राजे करीत होते इतकियामध्ये दिपवालीचा सण आला म्हणौन निलोजी निलकंठराव याणी शंकराजीस सागून पाठविले की तुम्ही उदैक सणास किल्यावर निरोप घेऊन यावे त्याजवरून शंकराजीने सांगून पाठविले की आम्हास येकट्यास येता येत नाही राज्याचा प्यार आम्हावर बहूत आहे व शाहाजी राजे यांचा व आपला घरोबा बहूत होता त्याचे पुत्रास व स्त्रीस टाकून कैसे यावे यास्तव आलो नाही आपण आमचा मार्ग न पाहावा आम्ही येत नाही तेसमई त्यानी विच्यार केला जे खरी गोष्ट आहे येकट्यास येता न य यास्तव त्यासहि बोलाऊन जिजाऊ व सिवाजी राजे आणि दाहावीस लोक मानकरी यास आमंत्रणे सागून घेऊन

यावे आंम्ही साहित्य करितो म्हणौन निरोप आला त्याजवरून शंकराजी नीलकंठराव याणी राज्यास आर्ज केला जे उदैक सण दिपवालीचा आहे वडिलानी आपण यावे म्हणोन विनती केली यावयास निरोप पाठविला आहे यैसीयास आपण व जिजाबाईनी आगत्य यावे तेव्हा सिवाजी राजे यानी आनमान करून उत्तर केले जे आम्हास लोकास टाकून येता नये येथे आंम्ही सण करू तुमचेच आहे तेव्हा शंकराजी नीलकंठराव निरोप घेऊन गडावर आले ते येत नाहीत म्हणौन सांगितले ते समई तिघानी विच्यार केला जे शाहाजी राज्याचा आपला श्रेह घरोबा आसता त्यास टाकून आपण सण करावा हे उर्चीत नाही यास्तव कुल लोकासुधा घेऊन यावे म्हणून शंकराजीस गडाखाली पाठविले शंकराजीने येऊन समस्त लोकासुधा चलावे म्हणून आर्ज केला बहूत आग्रह करून तयारी राज्याची करविली लोकासुधा जिजाबाई व सिवाजी राजे यास खिजमतगार चोपदार खासदार मावले लोक व पागेचे बारगीर पायउतारा करून गडावर घेऊन गेले जागोजागा लोक उतरविले राज्यास जिजाबाईस व मानकरी यास घरास नेऊन बहूत मोठा सन्मान करून तीन दिवस नाहाणे व भोजने केली लोकासुधा जेवणे घातली मोठा समारंभ केला बहूत आग्रह करून भाऊबीज करून जावे म्हणौन राहाविले प्रतिपदेस भोजने जाली रात्रीस निलोजी नीलकंठ-राव स्त्रीसुध्धा निद्रा केली पिलाजी व शंकराजी येकत्र होऊन मनसोबा केला जे राज्यास वर्तमान सागोन निलोजीस कैद करावे आणि आपणाकडे किला घ्यावा येकाने किलेदारी करावी आणि येकाने राज्याजवळ आसावे यैसा विच्यार करून राज्याजवल आले त्यास येकांती हे वर्तमान सागितले व पूर्वीहि शंकराजी नीलकंठराव याणी आपले खास बदोबस्ता-विसी विनंती केलीच होती त्यावरून राज्यानी सला दिल्हा आणि पंचवीस बारगीर खासे खासे समागमे देऊन बेडी निलोजीच्या पायात घालावयास सागितली निरोप दिल्हा ते तिकडे गेले आणि मागे याणी विच्यार केला निलोजीच्या पायात बेडी घालून आल्यावर या उभयेताचे पायात बेड्या घालून आपण किला घ्यावा यैसा मनसबा करून दोन बेड्या तयार करून ठेविल्या त्याणी तिकडे जाऊन झोपेमधे दगा करून पायात बेड्या घालून कैद करून आले राज्यास वर्तमान सागितले इकडे राज्यानेहि बदोबस्त करून ठेविलाच होता वर्तमान यैकोन घेतले आणि बोलिले जे किल्याचा बदोबस्त आम्हासच करावा लागतो तुंम्ही त्याचेच पंक्तीस बसावे यैसे बोलोन दोघाचे पायात बेड्या ठोकून दिल्या तमाम दरवाज्यावर लोक आपले बसऊन बदोबस्ती केली त्याचे लोक व त्याच्या बायका गडाखाली लाऊन दिल्ह्या वस्तभाव मालमता सर्व जप्त केली खजिना पुष्कल सापडला तीन दिवसपर्येत तिघे भाऊ कैदत होते चवथे दिवसी बंद खुलास करून गाव इनाम देऊन समाधान केले वस्त्रे देऊन ठेविले पुरधराखाली आद्यापि नाईकवाडी आहेत †मि॥ शके १५९६ आनंदनाम संवछरे कार्तिक शु॥ १० हस्त आक्षर हरी नारायण सरनाईक निलकंठ-राव इनामदार मौजे चांबली.

---

† मिती लिहून खोडली आहे.

ले. ४०० } { श. १५९७ वैशाख व. ५
{ इ. १६७५ मे. ४

श्री.

मशहूरल अनाम राजश्री राघो भास्कर सरहवालदार व कारकून पा। पुणा प्रती राजश्री संभाजी राजे शहूर सन खमस सबैन व आल्फ मा। निलोजी निलकंठराऊ व शंकराजी नीलकंठराऊ व विसाजी निलकंठराऊ व त्र्यंबक निलकंठराऊ यांसी मोजे चांबिली ता। कऱ्हेपठार पा। मजकूर येथें इनाम कास टका एक आहे त्यावरी तुम्हीं मिरास पटी पंचवीस होनू घालूनु पैका मागता म्हणऊनू कळों आलें तरी पा। मजकुरावरी मिरासपटी घातली नसतां उगेच आपले भातेने पैके मागता हे कोण खेश या उपरी त्यांस येक रुकेयाची तसवीस न देणें आजी ता। त्याचे इनामास पेशजीं रुका घेतला नाही व तसवीस लागली नाहीं पेस्तरहि तुम्ही मिरासपटी व हरयेक बाबे तसवीस न देणे ताकीद असे तालीक लेहून घेऊन असल परतून देणे छ १८ सफर [२]पा। हुजूर [३]सही

[१]श्रीशिवच
रणी तत्पर
त्र्यंबक सु-
त मोरेश्वर

रुजूसुरु
नीवीस

सुरुसुद

---

ले. ४०१ } { श. १५९७ वैशाख व. ५
{ इ. १६७५ मे ४

श्री

मशरल हजरत राजश्री राघो बलाल सुबेदार + + जुनर प्रती राजश्री संभाजी राजे दंडवत शहुर सन खमस सबैन व अलफ पुणें तरफेस मिरासपटी हुजरून तो ( येक ) दर घातलीच नाहीं मावलांवरी पटिया घातलिया त्या कारबारी देसमुख व देसकुलकर्णी व पाटील व गाऊकुलकर्णी यांवरी पटी घा ( तली ) कीं हकदक खाताती व काहीं गुज्यासी करितात म्हणून त्यांसि मिरासीपटी घातली येसीयासि इनामदारास पटी ध्यावयाची काये गरज आहे त्याहींमधें पुणें तर्फेस मिरासपटी घातली नसतां मा। निलोजी नीलकंठराऊ व मा। शंकराजी नीलकंठराऊ व मा। विसाजी नीलकंठराऊ व त्रिबक नीलकंठराऊ याचा इनाम मौजे चांबली ता। कऱ्हेपठार पा। पुणां येथे कास टका इनाम येक आहे त्यासी मिरासपटी देणें म्हणून राघो भास्करें होनु २५ पचवीस लाविले आहेत म्हणून कळों आले तरी ज्या माहालास मिरासीपटी घातली आहे तेथें इनामदारास हिसाबीने ध्यावे येसा तह केला आहे

१ श्रीशिवच
रणी तत्पर
त्र्यंबक सु
त मोरेश्वर

---

१ आकार बहुदळी आहे.

२ 'पा। हुजूर ' निराळे वळणाचा

३ ' सही ' त्याहून निराळ्या वळणाचा. ४ पाठीवर.

त्यास जे माहालीं मिरासपटीच घातली नाही तेथें इनामदारास पैके मागणे कोण गोष्टी त्याहीमध्यें नीलकंठराऊ यास पटी मागणें हे उचित नाहीं तरी तुम्हीं राघो भास्करास येक कागद लेहून देणें आणि त्यांचे वाटे नव जाये यैसी गोस्टी करणें मा। नीलकंठराऊ याचे इनामास पेशजीहि तसवीस लागली नाहीं आणि हालीं राघो भास्कर पटी मागतो याबदल तुम्हीं त्यास बहुतवजाने लेहूंन मा। नीलकंठरायाचे वाटे नव जाती त्यांचा बोभाट हुजूर न ये यैसी गोस्टी करणे छ १८ सफर तालीक लेहोनु घेउनु असल परतून मा।इंलेपासी देणे छ१८ सफर पा। हुजूर सही

सुरु रुजू मुरु

सूद निवीस

---

ले. ४०२ } { श. १५९७ ज्येष्ठ शु. ३ / इ. १६७५ मे १७

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री विसाजी निलकंठराऊ गोसावी यासी–

पोष्य राघो बलाल नमस्कार विनती येथील कुशल जाणोउनू स्वकुशल लेखन करणे विशेष गोसावी पत्र पाठविले ते पाऊन लिहिले प्रमाणे अभीप्राये कलो आला व मौजे चाबलीस इनाम कास टके १ येक आहे त्यावरी (इना) मती खडणी रा। राघो भास्करे होनू २५ पचवीस घातले आहेती ते घेतेल न पाहिजेत म्हणोऊनू गोसावी लिहिले तरी गोसावींच्या लिहिल्या वरूनू राघो भास्कराचा मजमूदार मोरो निबाजीस रोखा लिहिला आहे यावरूनू ते पचवीस होनू घतलि दूर करविले असेती कलले असावे कृपा असो दीजे हे विनती.

सेवक दामाजी रघुनाथ [ राघो बलाळाचा मुलगा ] नमस्कार विनती उपेरी गो। याचे आज्ञेप्रमाणे तीर्थस्वरूपास सांगोनू मोरो निबाजीस पत्र घेऊनु पाठविले असे राघो भास्करे देह ठेविला मोठा घात जाहाला कलले असावे हे विनती स्नेहास अंतर पडो न देण हे विनती.

---

ले. ४०३ } { श. १६१० पौष शु. ११ / स. १६८८ डिसें. २३

नकल

महजरनामा बीहुजूर हाजर मजालसी प्रांत वाई विलायती सुभे दारूजफर विज्यापूर बतारीख ९ रबिलावल सु॥ हजार १०९८ कारणे महजरनामा केला ऐसा जे मनाजी शंकर

नीलकंठराऊ याचा इनाम व आंबराई कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आला आहे गावगना परगणे पुणे बी ताा

इनाम
मौजे चांबळी ताा करपठार
जमीन सेत सिवेची पांढर
हू ल कास टका १
एकूण चाहूर चार
मौजे चांबली
सेत कास रुका १
येकुण बिघे ८१० मौजे
जेजुरी तले पौ
सेत बिघे ८५
सदरहूमधे आबराई आहे
त्यापौ राज हिसा येक १
व इनामदार माार
हिसा दोन २

आंबराई गावगना
ताा करेपठार
मौजे किकवी ताा
निरथडी जमीन कास रुके
साडे च्यार ८४॥
ताा
८१॥ बागाईत
८३ जिराईत
———
८४॥ यकुण बिघे ८२२॥
मौजे नारायणपूर
नजीक देऊळ सेत
बिघे तीस -।-
सदरहु पौ आंबे उतार
होता राज हिसा यक १
इनामनफर मार हिसा दोन २

सदरहु प्रो इनाम व आबराई आहे कारकीर्द निज्यामनमुलूक व आदीलखान व सिवाजी भोसले व इस्तकबिल मिर्जा राजा व बाजी सफीखान दिवाण व घोरपडे जाहागीरदार मौजे चांबली याच्या सनदा होत्या तेणेप्रमाणे मनाजी माार इनाम व आंबराईचा ब साल खात होता ऐसियास नफर मार गनिमाकडे होता त्यावेली खाने आजम नाहारखान गोरी ईही कौल देऊन आणिला तो सिरवलास आला मागून काबिला आणविला वाटेस येता आस्वलीचे घाटी गनिमाने कुल बिसाती लुटून नेली नफर माा (र) जाहीर केले की त्या बिसातीमधे सनदा होत्या त्या गलिमाने लुटून नेल्या ऐसियास याचे भोगवटीयाचे गोही गावगना मोकदम व बाजे लोक यानजीक मनास आणिता गोही दिल्ही ती बीताा

तानाजी नाकवला मोकदम
मौजे हरगुडे ताा निरथडी
सुभानजी जाधव मोकदम
मौजे परिंचे ताा निरथडी

मडजी निगडा मोकदम मौजे
किकवी ताा निरथडी
चाहूजी व बावाजी
व बालाजी व जानोजी
कामथा मोकदम मौजे
चांबली ताा करपठार

यानी गोही दिल्ही की मनाजी मौ मार याचा इनाम व आबराई सदरहूप्रमाणे चालत होते हलीहि चालत आहे आपणास दाखल असे सदरहू सनदाहि नफर माार मनाजीला होत्या

हे आपल्या वडलाचे जबानी ऐकले होते आपणहि पाहिले म्हणऊन सदरहू पाटील व कुल-कर्णी याहि गोही दिल्ही हा महजर सही

बी॥ देशपांडीये पा मार देहाये

नाहरखान गोर्डा देशमुख प्रा मार माहादाजी नामदेऊ हरकारे नामजाद हाजूर ठाणे वाई सदरहू नकलेची आसल रामचंद्र नारायण याजपासी आसे

---

ले. ४०४ } { श. १६१४ श्रावण शु. २
इ १६९२ जुलै ५

श्री

राजश्री गंगाजी नारायण सुबेदार व कारकून प्रांत पुणे गोसावी यांसि

—अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य——श्री संताजी घोरपडे सेनापति व कारकून दंडवत व नमस्कार सुा सलास तिसैन अलफ रा विसाजी [महादाजी] निलकंठ राऊ याणी विदित केले कीं प्रांत मारी आपला इनाम पूर्वापार चालत आला आहे

मौजे चाबिली ताा कर्‍हेपठार मौजे किकवी ताा निरथडी जमीन
जमीन काम १ टके कास रुके
८३ जिराइत
८१॥ बागाइत
८४॥

येणेप्रो कास जमीनीस येक टका साडेच्यार रुके चालिले आहे तेणे-प्रो चालविले पाहिजे म्हणून त्यावरुन हे पत्र लिहिले आहे तरी राजश्री कैलासवासी स्वामी-पासून [ म अ. शिक्का ] सालाबाद ताा साल गुा सदरहू इनाम चालिला असेल तेणें प्रो देस्तूर साल दरसाल चालवीत जाणें प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें प्रती लेहून घेऊनु आसेल परतोन देणें येविषीं राजश्री शंकराजीपंत सचीव यांचेहि पत्र निरालें आहे जाणिजे छ २९ सवाल हे[1] विनंती.

विल्सति ले
खना व
धि मुद्रा

---

[1] या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

ले. ४०५

श. १६१६ आश्विन शु. १०
इ. १६९४ सप्टेंबर १८

श्री

श्री
शंकराजी
नारायण

पत्र वतन सरंजामी राजश्री विसाजी निलकंठराऊ सभासद सेवक राजमडल सुा खमस सितैन (तिसैन) अलफ माइले पुरातन राज्यातील से[व]क स्वामिकार्याचे येकनिष्ठ याकरिता राजश्री पंत सचीव याही सरजामी केली वतन देखील चाकर सालिना होन पा।

१५००

येकूण दीड हजार होन रास

कदीम जाजती छ मा।

१००० ५००

येकूण सालिना होन पधरासे रास केले आसे वजावटाव देऊन प्रा वजा करून उरले वतन पावेल चाकर हाली वतनाचे मोईनप्रमाणे हाजिर होतील त्या दिवसापासून हक पावेल कदीम वतन छ ७ सफर ता पावले छ मापासून कदीम व जाजती मिळोन पावत जाईल संदेश समक्ष
तेरीख ८ माहे सफर

सीमा

सफर सुरुसुद
बार

ले. ४०६

श्री

श. १६१८ वैशाख शु. ९
इ. १६९६ एप्रिल ३०

राजश्री देशाधिकारी देशलेखक वर्तमान व भावी प्रांत पुणें गोसावी यांस

द अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—शेवक शंकराजी नारायेण सचीव नमस्कार सुरसा सीत तिसैन अलफ रा निलो निलकंठराऊ व शंकराजी निलकंठराऊ व विसाजी निलकंटराऊ व त्र्यंबक निलकंठराऊ सरनाईकवाडी किले पुरधर यापैकी विसाजी निलकंठराऊ यानी किले विचित्रगडचे मुकामी हुजूर विनंती केली की आपले पिते राजश्री निलकंठराऊ येही मौजे जेजुरी ता कर्‍हेपठार प्रांत मजकूर येथे विहीर करून अंबराई लाविली आहे तेथे जमीन कास रुका ८१ येक रुका याप्रमाणे चालत आली आहे ऐशास आपल्या वडिलीहि

या राज्यात सेवा बहूत केली आहे व आपणहि येकनिस्टपणें सेवा केली आहे पुढेहि करीत आहों तरी स्वामींनी कृपाळू होऊन सदरहू जमीन कास रुका येक देखील अंबराई इनाम करून दिल्ही पाहिजे म्हणून विनंती केली त्याजवरून मनाम आणितां मारनिले या राज्यातील कदीम आणि सेवा येकनिस्टपणे केली आहे पुढेंहि करीत आहेत याकरिता मारनिले याचें




चालवणे जरूर म्हणून याजवरी कृपाळू होऊन यास इनाम जमीन कास रुका येक देखील आबराई दिल्ही आसे तरी तुम्ही सदरहू जमीन येक रुका कासेची देखील अंबराई मारनिलेचे दुमाला करून यांस व याचे पुत्रपौत्रादि वंसपरंपरेने चालवणे प्रतीं वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे तालीक लिहून घेऊन मुख्यपत्र भोगवटिया निमित्य परतून देणे छ ८ शौवाल

पत्रा+
सुरु सुद बार वधिरयं
भाति

---

ले. ४०७ } { श १६८२ आषाढ व. ५
इ. १७६० जुलै ३

श्री

चिरंजीव राजश्री निलकंठ माहादेव यासि बालाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष किले वजगड येथील सरनाईकी रा माणको गंगाधर याची आहे त्यास रा बापू सखाजी व शंकराजी गणेश या उभयेताचा विभागाचा कजिया होता याजकरिता किले मजकूरची सरनाईकी जफ्त केली होती त्यास याची मनसुबी पचाईत मते होऊन बापू सखाजी खरे जाले व संकराजी गणेश खोटे जाले यास्तव किले मजकूरचे सरनाईकीची जपती मोकळी करून हे तुम्हास पत्र लिहिले असे तरी किले मजकूरचे सरनाईकीची चाकरी सुदामत प्रो माणको गंगाधर याचे हाते घेऊन वेतन पाववीत जाणे जाणिजे छ १९ जिल्काद सुा ईहीदे सितैन मया व अलफ

---

ले. ४०८ } { श. १६८२ आषाढ व. ५
इ. १७६० जुलै ३

श्री

राजश्री सटवोजी जाधव हवालदार व कारकून किले वज्रगड गोसांवी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य —— श्री बालाजी बाजिराव प्रधान आसिर्वाद व नमस्कार सुहुरसन ईहीदे सितैन मया व अलफ किले मार येथील सरनाईकी माणको गंगा

+ आकार बहुदली

घर याजकडे आहे त्यास चाकरीस येत नाही यामुळे वेतन पावत नाही त्यास हाली नेहमी

श्री
राजारामनर
पती हर्षनीधान
बाळाजी बाजी
राव प्रधान

चाकरीस यावयाचा करार केला आहे तरी याचे हाते पूर्ववतप्रमाणे सेवा घेऊन वेतन खासा व पोरगा देखील पेसजीप्रमाणे पाववीत जाणे जाणिजे छ २९ जिल्काद पा। हुजूर

लेखन
सीमा

---

ले. ४०९ श्री {श. १६९१ कार्तिक व. ८ / इ. १७६९ नोव्हेंबर २१}

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री माणको मनाजी निलकंठराव व बापू सखाजी निलकंठराव व शंकराजी गणेश निलकंठराव गो।

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुा सबैन मया व अलफ द्वारकाबाई कोम नारो नरसिंह निळकंठराव इणे हुजूर जेजुरीचे मुा येऊन विदित केलें की किले पुरधरचे सरनाइकीचे वतन निमे आपलें व निमे शंकराजी गणेश वगैरे सरनाईक याचें त्यास आपले वडील कर्नाटक प्रांती काही दिवस होतें उपरांत आपण चांबलीस आलों शंकराजीपंताचे तीर्थरूप गणेशपंत याचेच घरी राहिलो काही दिवस येकत्रहि होतो पुढे न बने सा। निराले जालों तेव्हा वतनाचा व इनामाचा विभाग मागितला त्यासी शंकराजी गणेश थाक लागू न देत म्हणून आपण सातारियास दादोबा पुरधरें याजकडे गेलो याणी शंकराजी गणेश यास नेऊन ताकीद केली उपरांत ते चांबलीस येऊन मौजे विकवी ता। निरथडी येथील इनाम जमीन आपणास दिल्ही ते पाच वर्षे आंम्ही आनभाविली त्यास किकवीकर साक्ष आहेत असे असता आलीकडे सदरहू जमीन शंकराजी गणेश याणी हिरोन घेतली आपले दोघे पुत्र होते तेहि मृत्यू पावलें नातू साहा वर्षाचा आहे तरी ताकीद होऊन माझा विभाग देविला पाहिजे म्हणून येैशीयास याचा विभाग वाजबी वाटणी प्रो। न द्यावयास कारण काये येविसीचे वर्तमान मनास आणावें लागतें तरी पत्रदर्शनी निघून सरकारचा जासूद पाठविला आहे याजबरोबर जलद हुजूर जेजुरीचे मुकामास येणे दिरंग न लावणे जाणिजे छ २१ रजब आज्ञाप्रमाण

लेखन
सिमा

---

ले. ४१० श्री {श. १६९३ / इ. १७७१}

राजश्री बालाजीपंत नाना गोसावी यांसि

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य —— श्रो माहादजी सिंदे

दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत आसिलें पाहिजे विशेष राजश्री विसाजी कृष्ण याणी हिंदुस्थानचे स्वारीत गिरमाजी मल्हार यास मेरठचें महाल सांगून लाख रुा रसद घेतली होती त्यापौ औसी हाजार रुा सरकारात मारनिलेचे राहिलें त्याची वरात बगाजी गंगाधर व विठल महादेव याजवर दिल्ही होती ते रुा उगवले नाहींत हाली सावकार यास तगादा करितात म्हणोन मारनिले याणी सांगितले त्यावरून हे पत्र आपणास लिहीलें आहे तरी याचे ऐवजाची हरयेक जागा सोय करून द्यावी

श्री
जोतिस्वरूपच
रणी तत्पर राणो
जीसुत महादजी
शिंदे निरंतर

आथवा जागा लाऊन द्यावी म्हणजे हे उगऊन घेतील[१] रा छ १४ मोहरम बहूत काये लिहिणे लोभ कीजे हे विनंती

मोर्तब
सुद

ले. ४११ } { श. १६९४
इ. १७७२

श्री.

हिसेबू एकदर खर्च परवाना इनाम मौजे चाविली गुा गणेशपत व गगाधर मनाजी मुा किले खेलणा व पनाला सुा ११७२ जमा रु.

फिलाजी निलकंठराऊ गुा गोपाल
१६ पहिले ता तात्या
१०० हुडीचे भरतीस
७५ रोख ता तात्या
 ५० किता
 २५ किता
 ———
 ७५
 ———
 १९१

विसाजी निलकंठराऊ
३७ दाणे विकिले
३ कडबा विकिला
५० गुा मल्हार जोसी
———
९०

मनाजी शंकर गुा गगाधर
१५ घरीहून खेलणीयास जाता वाटखर्चास घेतले.
८६ पांडाहून पाठविले गुा राघो वासुदेव.
 ६१ गुा गणेशपत
 २५ राघो वासुदेव
२३ गुा बहादूरखान
४ रोख

गणेशपंत
१ घरीहून वाटखर्च
६३ हुडीचे भरीस रुा ८१ पैकी वजा खेलणाहून हुंडी करून घरास पाठविले गुा वालकर वजा रुा १८ बाकी
———
६४
पैकी वजा रोख बाकी ता तात्या ११॥। रुा
गुा जानोजी कामथा

---

१ येथून अक्षर निराळें. २ येथून पुढील मजकूर त्याहून निराळे वळणाचा—सबंद पत्रांत तीन वळणें आहेत.

१९ बाबा बोडनिंबे
६ हुडीचे भरीस गुा गोमतीबाई
५ गुा गोमतीबाई
१५ हा केसो कावर
गुा रघुनाथभट १९ रुा

२३ हुडीस भरीस
१७ ता तात्या
——
४०

ठकार बाा पळस टिके रुा १९ कर्ज गुा हस्ये
७७।= गुा नऱ्हावा नाईक
११२ गुा जानभट ढेरे
२५ गुा आतोबा
——
२१४।=

तेरीज
१९१ पिलजी निलकंठराऊ
९० विसाजी निलकंठ
१५० मनाजी शकर
६४ गणेश शकर
४० जानोजी कामथा
१९ रघुनाथभट
२१४।= कर्ज
——
७६८।=
पैकी वजावाकी ताा तात्या रुा ११॥। बाकी रुा
७५६॥=
खर्च

बदल परवाना ३८४॥=
२६५।= अंताजीपत रुा ३००वजा
३० दहेला
४॥= सोडीविले
——
३४ ॥=
बाकी
११० बालकृष्ण मवाजनेर्नीस
रुा १२५ वजा
१२॥ दहेला
२॥ सोडिविले
——
१५
बाकी

९। किरकोल
५ बावाचार्य
२ पुंडलीक मवाजना नीट करावयास
२ बालकृष्ण मवाजना काहाडावयास
-।- दफ्तरबंद
——
९।-
——
३८४॥=

किरकोळ खर्च गुा गणेशपत
३७२

१०। जेजया वगैरे दुसाला
१ नरसा व राया जासूद
७४।- व्याजे पडिली
२। घेणीचंद त्रीवाड
५५ पोखर हजारी
१७ कासीपत
——
७४।-
८ शिरपाव नऱ्हावा नाईक
२।= तोटा बा जानभट रुा १००
पैकी
३२ नक्लेवर काजीची मोहर करा-
यास
२ सिपारस मनसूरखान
१० समाराधना
१० कोंढाणियाखाले खर्च ता तात्या
६७॥ रद कर्ज
३० आतोबा
३४॥ जानभट
३ नऱ्हावा नाईक
——
६७॥
——
१९७॥=

३। माला रुद्राक्ष ता तात्या
-।- बदल नकल काजी ता कासीपत
१ राघोपत मामास खर्चास दिल्हा
११०८= पोटखर्च पान सुपारी व धुलाई
१२ वाटखर्च तात्या
३ पेडगावीहून गावांस गेले
९ गावीहून परडियास व वारेश्वर
पतापावे [ कडे ]
——
१२
१। गंगाधर मनाजी
२५ जागीरदाराने खरीफावारी नेले
४ जागडा पुण्यास आन्याकडे पाठविला
तो नागाविला त्यास दिले
१७॥ गडखर्च गुा तात्या
——
१७४।=
——
३७२

——

ले. ४१२ } { ?

तीर्थस्वरूप राजमान्ये राजश्री
आन्या स्वामी वडीलाचे सेवेसी

बालके ..........................................................उपर वाईहून गंगाधराने व मनाजीपंती कागद पाठविले आहेत की तुम्हापासी परवाना आहे तो घेऊन येणे त्यावरून आणीक कागद नवा करून ( घेता ) त्यास चाळीस पनास + + खर्च पडतो तर तुम्ही पैका व परवाना घेऊन सत्वर येणे म्हणून दोनी तीन माणसे दो दिवसांत पा + + + येसीयास परवाना माणसाबा पाठविता येत नाही धामधूम ये प्रकारची आहे + + व्हा आपण खुदच घेऊन जावे बा येक माणूस पाहिजे व आपणास खर्चस पाहिजे व कागदास पडतो पुढे देऊन परंतु आपणास वेचास तूर्त पाहिजे गावात कोण्हास काही मागावे तर कुले नाहीत जे कुले आहेत ते तुमची आहेत पांच तिरके तुम्हाकडे लागले याकारणे वडिलास लिा आहे तर बालूबा खर्चस काही पाठविणे व मोरोपंतास पुसोन नवा कागद कोणे रजेने कागद तेथून करून घ्यावा तो मकोबा त्याच्या विदमाने करून बाद पडते पा करून सत्वर पाठवणे एक घडी विलंब न करणे खर्चसाठी खोळंबा जाला आहे या कारणे बालू तुम्हापासी पाठविला आहे येथे उशीर लागला म्हणजे संग्रामखान ठाणियास फिरोन येतील मग काम होत नाही तेथे आहेत तो ते भिडेने काम करून देतील तर बालूबा वेचाची व कागदाची बेगमी करून सत्वर सत्वर पाठवणे गडी ब रो गी यास परवानियाची तार्लीक दाखविली त्याचा मुश्रीफ आहे त्यास + + दिल्हे परंतु तो बेईमान आहे पुढे देणियास खलेल करणार आहे याकरिता आम्ही स्वार होऊन जातो तर देशपांडिया + + + + कागद कोणे तजविजेचा करून घ्यावा तो मकोबा करून पाठवणे वेचास न पाठवा तर आपण राहतो......................आहे तर आगडियास सेला............ पाठवणे........

---

ले. ४१३ } श्री { ?

तीर्थरूप राजश्री गंगाधरपंत बापाजी वडिलाचे सेवेसी

अपत्य बाबाने सिर सा नमस्कार विनंती उपरी येथील वर्तमान ता माघ बहुल शष्टी गुरुवार पर्यंत येथास्थित असे विशे[ष] येथे खोडगडे गुरव याणी कटकट माडिली आहे नारायेणाच्ये देउली इनाम तुमचा नाही याकारिता मोठासा कथला माडला आहे तरी पत्र पावताच येणे व आणिखी कितेक कामकाज आहे तरी पत्र पावताच सिवापूरचे मुकामी येणे अनमान न करणे बहुत काये लिहिणे हे विनंती

ले. ५१४ } { १

श्रीगुरुगणेशयोगी

वेदमूर्ती विनायक गोसाई काका स्वामीचे सेवेसी

सो नागपुरीहून सुखानंद चा मस्तक ठेऊन गाणेशरित्या आनंत नमो नमो विज्ञापणा येसी जे फार दिवस जाले आपनाकडोन पत्र येऊन वर्तमान समजल्यात न आले येमे नमावे हरघडी आलिया मणूशाबरोबर पत्र द्वारा परामृष करीत असावा विशेष पेशजी इक-ऊन सरमनाम पत्र पाठविले ते दादा वोंकार याहाचे हस्ते प्रविष्ट जालेच आसेल पावतीचे उत्तर यावे म्हणून आपेक्षा त्याची पूर्ती व्हावी याविशी उत्कंठा धरून प्रत्योतर यावे याविशी सहसा आव्हस नसावा दुसरे नाना तपस्वी यापासून गणेशतत्वरत्नाचे पुस्तक बाबास सांगून दादा वोंकर (ओंकार) याजला माझे नावचे पत्र देऊन प्रविष्ट करावे म्हणजे भाद्याचे पुस्तकाबरोबर मज प्रविष्ट होईल येथे त्याचे प्रत्यातर देऊन लौकरच मागती पुस्तक तुम्हास प्रविष्ट होईल याविशी निःसंशय होऊन बाबास ताकीद करून पुस्त[क] पाठ[वि]ण्याचे करावे आजी आमचे मामा वेदमूर्ती आताभटजी लुले तुमचेजवळ राहिले होते त्यास आम्ही आल्या दिवसापासून त्याचे वर्तमान कागदपत्र ठेऊन समजले नाही त्यास मामा व रामाजीपंत बाबाला याचे वर्तमान साकल्ये ल्याहावे हे विज्ञापणा

रा येकनाथबावा याहाचे सेवेसी गणेशायेनमाहा उपरी कृपा लोभाची वृधी करीत आसावी हरीभाऊ येथे खुशाल आहेत मुले मानसे आनंदरूप आसेत आपलास कलावे हे गणेशायेनमाहा

चिरंजीव बाबा व बर्हारबा यासी आसीरवाद

गाणपत्या श्री रावजी वाघ यासी आसीरवाद

सर्वत्र लहानथोर यासी गणेशायेनमाहा व आसिरवाद सागणे

गाणपत्या बंधुवर्ये रा कृष्णाआपा यासी सा। नमस्कार सदैव कृपेची आभिवृधी होत आसावी

तीा। स्वरूप रा विनायेकभट काका व येकनाथबावा व कृष्णाआपा व राजी वाघ वगैरे सर्वत्र गाणपत्या मंडळीस वक्रतुंडाचा सा।। नमस्कार विनंती येसीजे सदैव कृपापत्री गौरव गाणेशरित्या करीत असावा फार काय लिहीणे हे विज्ञापना ता। छ २ शुा। मार्गेश्वर रो मंदवासर

---

ले. ४१५ } श्री { ?

## २ किल्ले पुरंधरच्या घेऱ्याची हकीकत

आसिर्वाद उपरी + + + + की घेऱ्याची माहितगिरी कसी असेल ते लेहून पाठवावे श्रीमंत राजश्री सखारामपंत बापू लग्न करावयासी गेले ते किकवीवरून अले त्याणी पुसिले त्यावरून लिहिले अहे तरी आपल्यास माहितागिरी फार आहे तर साकल्य कसे ते ल्याहावे यावरून वडिलानी सांगितले त्याप्रमाणे व अलिकडे अपले कारकीर्दीस जाले ते लिहिले असे

पूर्वी नीलकंठराव पुरधरी किलेदारी हकिमी सरनाइकी करून होते शाहाजी भोसले पातशाही चाकर व हेहि पातशाही चाकर पातशाहीमधे गडब(ड) होऊ लागली ते समई किल्यावरी नीलकंठराव खाले अमल शाहाजी भोसल्याचा तेयाचे साहित्य करीत व पातशाहाची अज्ञा शाहाजी भोसल्यास की पुरधरचे साहित्य करीत जाणे करी[त] असेत त्यांकडे खेडेबारे व रोहिडखोरे मावळचे फुटगाव व थोरले रुपे शाहाजी भोसल्याकडे पुणे देश सरकारांत त्यास भोसलेच फार करून पुणे देसचा भोगवता घेत असेत शाहाजी भोसले इतबारी जाणून पातशाहानी चंदीकडे पाठविले दादाजी कोंडदेव सिवाजी राजे सिवपुरी वरसाचे ठेऊन आपण चदीस गेले किल्याचे साहित्य करावे तो सिवाजी महाराजे लाहान दादाजी पंताचे काही चालेना कोली माहार मिलोन वाटा पाडू लागले किल्यास सरजाम जाऊ देईनात येसे जाले किल्याची मोठी हालाखी जाली उपरी लोक होते ते उठोन गेले जवलिल गावचे होते ते दोनच्यार से राहिले किल्यास भरती नाही तेव्हा माहादाजी नीलकंठरायानी तजवीज करून कोली वाटा पाडितात त्यासी राजकर्ण करून कोली

१ ताम्हाणे कोली अवध्यांत वडील त्यास बालघाटी ठेविले
१ काल्कुड नीगुड मेटी ( ठेविले )
१ ढगारे बावचीचे मेटी ठेव ( ले )
१ मिसाल जवळ टाकरास ठेवला
---
४

येणेप्रा चार नाइक्या करून दाहा दाहा दाहा अशा म्यानसी ठेविले वाटा पडेनाशा जाल्या किल्यास सरजाम येऊ लागला सिवाजी राजे ल्हानपणापासूनच त्याची बुध पातशाही अमल उठवावा पुडाइ करावी ते किल्यासी घासो लागले कोली से पनास चाकर नीलकठरायानी ठेऊन मुलुग मारावा किल्याची बेगमी करावी त्यास कोली बलावले ते म्हणो लागले आम्हास तुम्ही अणून ठेविले अम्हास सरकाची सनद करून द्या त्यावरून नीलकठरायानी पातशाहास लेहून सनदा कोल्याच्या नावाच्या अणिल्या त्यास दिल्हा तुम्हास नीलकठरायानी अणून मेटाच्या नाइक्या देऊन ठेविले त्याप्रा तुम्ही मेटी राहून किल्याची चाकरी नीलकठराव सांगतील त्याप्रा करून सुखरूप राहाणे ऐसी सनद अणून दिल्ही त्यावरी ताम्हाणे कोली याचे बुडाले त्यापासी चिल्हे जमातीत चाकर होते तेच मेटी राहून चाकरी करू लागले याप्रा च्यारी

किलियास आणून त्याचा गौर बहुत प्रकारे करून राजगडाखाले ताम्हाणे कोली मुख्य होते त्यास वस्त्रेपात्रे देऊन त्याणी चाकरी किल्याची करावी ऐसे इमानप्रमाण करून ठेविले त्यास जागे नेमून दिल्हे

याउपरी शाहाजी भोसले चंदीकडे गेले पातशाहीची घालमेल जाली माहादाजी नीलकंठराव मेले सिवजी राजे बलावले त्याणी किला घेतला नीलकं(ठ)रायाची मुले माणसे उतरून पुणियास नेली बाजी घोलप सिवाजी माहाराजापासी होते बरे अकलवत शाहाणे माणूस जाणून किलेदारी सांगोन पुरधरी ठेविले ते किलेदारी करू लागले भोवताली घरे लोकाची त्याचे घरी लग्न मोहुर्त जाला तर पानाचा खाड व खोबरियाची वाटी गावकरानी न्यावी किलेदारास काही नाही तेव्हां घरा करार करावासा जाला भोवरगांव जमा करून घेरा किल्याकडे करावा ऐसे कागद भोवरगावचे घेऊन जमान अमान राजिनामे घेऊन आपण निघाले देशमुख देशपांडे अणवी निघाला तो बेलघाटचे वाटेने खाले उतरोन तल्वटी पुर अहे गांवचे दक्षणेस पेठेकडून वाट साबगिरीकडे जाते ते वाटेने निघोन पूर डावे टाकिले ते समई पेट नवती सायेघाटाचे तल्वटीहून हली घोडोबा अपानी विहीर खाटली आहे त्याचे दक्षणेस डोगर अेक आहे त्याच्या पायाने निघोन वरधोजी नाईक बेरडाची वहीवर गेले तेथून हली बेरड वज्रगडाखाले वाडीस राहातात ते वाडीस जाऊन पुढे अडसरची वाट पानवडीकडे उतरते तिकडे जाऊन पानवडी हली जे पानवडीस घोडो अपानी घर वाधले ते वाडी डावी टाकून वर चढोन नाइक्या करीत होते बेगले माहार कोल्या बराबर होते ते दाहाबारा महार बरे मर्द असेत त्यास किल्याचे दक्षणेस बावचीच्या मेटाखाली कालदरीच्या बहिरावचे उत्तरेस अदमध घरे बधोन राहावयास जागा दाखविली तेथे घरे बधोन नादत होते हली भिताडे त्याची अहेत.

या उपरी सिवजी राज्याचे प्राबल्य त्यास किल्याची अगत्य त्याचे कारकीर्दीस कोली अथवा महार गडावरी गेले नाहींत मेटीहून चाकरी करावी सकराजी नारायेणे यास सुरनिसी सांगितली पुणे देश त्यास दिल्हा सावोत्रा इनाम करून दिल्हा याप्रा चालत होते ते समई कोल्यानी घरा म्हणून घेतला नाहीं त्या उपर सिवजी राजे याचे अवतार समाप्त जाहाला नारो शंकर ल्हान संभाजी महाराजे धरून नेले मागे धणी कोणी नाहीं राजिक फार जाले मुलूक उजेड जाला किल्या वरील लोक नामजाद होते ते उठोन गेले त्रिबक सिवदेव सिचिवाचे मामा त्यास पुरधरी ठेविले पैसा मिलेना लोक मिलेनात गडावरील गस्त चालिली पाहिजे व सदरेस वेडा पाहिजे या करितां बेगले माहार गडावरी आणून संताजी बतदल येलदेकर यास नाइकी पहिलेच होती त्याची अलग होती ते जागा माहारास देऊन गडावरी ठेविले गस्तीची चूड धरावी व सदरेस वेडा आणून द्यावा गस्तीच्या असाम्या व वेडेकराची असामी करून दिल्ही कोली कोण्ही किल्यावर नवते याप्रा त्रिबक सिवदेव होते तो चालिले त्याचा काल जाला ते गेले पंताजी सिवदेव अले त्यापासी मुतालकीचा सिका त्याचे कारकीर्दीस कालदरीच्या बहिरावापासी गुरे मेली ते बेगल्यानी

कुघल्याचा डोंगर डावा टाकून खाल्ती वाट उतरते ते वाटेने उतरून बाहिरव डावा टाकून बेगल्याची घरे होती त्या अडसराने पालखी-चालोन हली कोडक्याची वाडी म्हणतात ते वाडी कालदरीची ते वाडी डावी घालून कुभोसीकडे मार्ग जातो ते वाटेने कुभासी कडे उतरले कुमवसी डावी पछमेस टाकून डोंगराच्या तल्वटे केतकल्यास अले केत-कवले डावे पछमेस टाकून डोंगर मधे लागतो तो चढोन अलीकडे उतरोन चिव्हे अपली वाडी म्हणतात ते वाडीवरून हली कोली-यानी देव अपला म्हणून देऊल बाधले त्या देवापासी अले त्या धोंड्यास सेंदूर लाविला तो देव अता जाला त्या देवापासून अडसर जातो त्या वाटेने पुरापासी येऊन किल्या-वरी बइल घाडे गेले त्या दिवसांपासून घेरा जाला घेऱ्यात गडकरी याची घरे त्याचे घरी प्रयोजन जाल्यास किलेदारास खाड वा पानाचा व वाटी अणून द्यावा घेऱ्या-चा पाटील किलेदार दुसरियास दर-कार नाही

महिमाजी. चिव्हे माहाराजापासी पेश जाले होते इकडील रोजमरा द्यावा आणि माहाराजानी दरमहा रुपया येक द्यावा त्याणी दोन च्या( र ) वेला अर्ज घेरा इना (म) करून द्यावयाविसी केला राजश्रीनी अज्ञा केली घरा इनाम करून द्यावयाचे होत नाही दाहा चाहूर इना(म) करून देवितो तेव्हां दाहा चाहूर इनाम करून दिल्हा सनदा पेशव्यावर आणिल्या गावगना इनाम घेतला परंतु शाहु माहाराजानी घरियाची गोष्ट करून । दिल्ही नाही

सिवाजी राज्यानी पूरची जमीन घेऊन पेठ वसविली बध्यास सेटेपण दिल्हे नेली ते कालदरीचे माहार अविचार त्याणी कलागत केली पंताजीपंतापासी फिर्या ( द ) अले पंतानी कालदरीकर पाटिलास मसाला केला सखदेव बाबा कुलकर्णी माहापुरुष सत्यवादी त्यास अणून पुसिले त्याणी सांगि-तले बाजी घोलपाची पालखी गेली त्याचे दक्षणेस गुरु मेले तर कालदरीकरी माहारानी न्यावे उतरेकडे मेले तर बेगल्यानी न्यावे ते समई बेगले खोटे जाले पैका लाविला पैका मिलेना तेव्हा संभर मोली हरकीची अवि-चार माहार कालदरीकडे त्यापासून घेतला पनास मोली बेगल्यापासून घेतली याप्रा पंतानी न्याय के[ला].

सिवाजी राजे याणी किला घेतला त्यास पेठ पाहिजे याकरितां पूरकर अणून त्यापा-सून जमीन टके घेऊन पेठ वसविली ते पेठेचा पाटिलकी चिव्हे आपली म्हणतात कृष्णाजी निबाळकर हवालदार सिचिवाकडे किला परंतु हवालदार राज्यापासून कृष्णाजी निबालकर पेठेची पाने वाण्याची सुपारी घरास माणू(स) पाठऊन नेत असे अलि-कडे कोली घेतात याप्रा पेठेचा मार शाहू माहाराज अले नारायेणाचे देवली दोन लग्ने केली ते समई कोल्यानी आलि घातला की किल्याचा घरा यात सेते अम्ही करू याचा पैका अमच्याबदल मुशाहिरा न ल्याहावा घरे बाधो त्याचा घरटका म्हसीचा म्हैसटका न घ्यावा लगीन मोहतूर जाला तरी पानाचा खाड व वाटी अम्ही घ्यावी येसे माहाराजानी करून घ्यावे त्यास राजश्रीनी माहादाजी येमाजी बोकील जवळ होते त्यास काका म्हणत असेत त्यास म्हणो लागले कोली काये म्हणतात ते समई माहादाजी येमा-जीनी उत्तर केलें की घेऱ्याचा व किल्याचा

बध्याने अर्ज केला पेठ घर दुकान घालावयास माहाराजानी जागा करून दिल्ही परंतु बैल सोडून उभा कोठे करावा तेव्हा सायेघाटाकडे कुरन पूरच्या जमिनीपैकीं दिल्हे ते कुरण अजपावेतो चालत आहे कुरण व पेठ मिलोन पूरची जमीन किती दिल्ही हे पूरकरास पुसावे ते सागतील.

पाटील किल्लेदार हाकउत्पन्न किल्लेदाराचे घरेयात सेते करितील ते बा मुा त्याहावे टका सरकारात वसुल घ्यावा हे येकोन कोली उगेच राहिले व रा चिमाजी अपा राजपुरीच्या मनसब्यांत असे न्हावी सितोल्याची तेथं मुकाम होता बालोबा माडवगणे यांणी कोल्याची मधेस्ती करून घेरा इनाम करून द्यावासा जाला परवानकी बालोबानी घेऊन सनदा तयार केल्या मजमदार अयाब होते त्याकडे निशाणास गेल्या तेव्हां अयाब बोलिले हे नवे काम किंवा पुरातन हे अपाम रुबरु पुसेन मग निशाण करून देईन तेव्हा अपाम पुसिले अपानी बापूजी श्रीपत यास बोलाविले पुसो लागले जे घेरीयाचे कसे अपानी सनदा बापूजी पंताचे हाती दिल्हा बापूजी पंतांनीं सनदा पाहून बोलिले घरा म्हणजे गांवचा जमीन गांव म्हणजे पुरंधर पुरंधरचा पाटील किल्लेदार घरा इनाम जाला तेव्हां किलेदार कोलियाची जाली किलेदारानी ज्या घरांत राहाव त्या घराचा घरटका कोली यास द्यावा व आम्ही राहतो ते जागा घऱ्यातील अम्हा घरजमे कोल्यास द्यावी या मागे हाकीम जाले त्यापासून इनाम कसा करून घेतला नाहीं आणि हली नवा इनाम कसा होईल येसे बापूजीपत बोलिल्यावरी बालोबास बोलिले की गैरवाका समजाऊन असी गोष्ट करितां हे गोष्ट कार्याची नव्हे कारभारास बोल लागतो सनदा घेतल्या त्या फाडून टाकिल्या याप्रा वर्तमान आहे.

---

ले. ४१६ } { श. १५३७ आश्विन शु. १४
{ इ. १६१५ सप्टें० २५

हू

नकल

हजरत ममलकत मदारी मलिक अंबर व खान सुरूरखान साहेब वाटणी तर्फ कृष्णाजी तानप्रभु व गणेशप्रभु केदाजी प्रभु व हरदप्रभु व सोनप्रभु आउप्रभु कुलकर्णी ताा खारापाट मामले अमीनाबाद उर्फ पाली सुरू खमस अशर अलफ कारणे हुजुरून खुर्दखत बाा साहेब सादर जाले बिनाम कारकुनानी ताा मजकूर बितेरीख छ ११ साबान सालमजकूर तेथें रजा जे गणेशप्रभु कसबा नागोटाणे ताा मजकूर हुजूर मालूम केले जे ताा मजकुरीचे कुलकर्ण आपली तिसरी तकसीम मिरास गहदम सालाबाद आहे जुनरांत वडिल चुलत भाउ कृष्णाजी तानप्रभु करकसा करितात हे बाबे पेसजी जुनरीचे मुकामी असता हुजुरून निवाडा केला असोन तेण्हेप्रा वर्तत नाही हरकत करिते दरीबाब सरंजामी होये म्हणून मालूम जाले तरी काजी हाकीम शरा बैसऊन सदरहू अमल खातीरेस आणून पेसजी हुजुरून अमल निवाडा केला असल तेण्हे बरहुकूम अमल कीजे निवडिले अमलास तकरार न कीजे म्हणोन रजा सिरी धरून काजी शरा व कारकून व देसाई व अदिकारी व समस्त देशक भली भली माणसें मज्यालिस करून पेसजी हरदो जणाचा निवाडा बिहुजूर काजी शरा, मुकाम जुनर जाहला होता तो कागद सन हाजीर मज्यालस आणून कागदाचा बयांन निमे कृष्णाजी तानप्रभु व निमे गंबाजी व हरदप्रभु व सोनप्रभु अवप्रभु कुलकर्णी वाटणी

कारकून ताा मार

कमाल ठाणदार

बाबाजी बल्लाल मजमदार

मुलना माहामद अजहत काजी हाकीम शरा मामले अमीनाबाद

अबाजी देसाई ताा मजकूर

अहमदजी सोनाजी नाइकवाडी ताा मजकूर

अबदलजी व इस्माइल अदिकारी ताा मार

दाउदजी सखाजी पावगी बंदर नागोठाणे

इस्माईलजी व वेठजी दलवी मुकादम बंदर नागोठाणे

अहमदजी खोत मौजे कानसे

येकोजी खोतु मौजे सुकेली

इस्माइलजी खोत मौजे सोहू सोनार

मालजी खोत मौजे पलस

मियां राउ

इभराइमजी कोरडकसी कसबे नागोठणे

दाद वारा तेली कसबे नागोठाणे

अबदलजी खोतु पाले

खोतु पत्र लोणी सुड कमसवी खोड मौजे नीडी

आलजी महमद दरदी

तानसेठ खोत मौजे चेनसे

महमदजी चोरघा खोतु मौजे दिगोडे

हे मुख्य करून समस्त मभा करून नर्फा केल्या सन सीता पासोन वाटणी

| तर्फ गंगाजी व हरदप्रभु व सोनाजी आवजी | | तर्फ कृष्णाजी तानप्रभु | |
|---|---|---|---|
| पल्स | बेनसे | काराड (उ) | सालिपे |
| निगडे | सुकेली | सोहु | पाले |
| वरप | कोडगांव | कारली | नींडी |
| कोढवी | चिकणी | मौजे कोपेटी | वासगांव |
| बलसे | ऐनघर | पाटणसे | गोठवसी |
| हैदोली | माडवसेत | कानसे | मौजे कुहरे |
| | | | उसर |
| आबडोसी | कुरनाड | पिगोडे | जाह्रोसी |
| दामेघर | जिनरे | ताबासोली | उसर |
| खार पालेखार | खारी पाढापूर | पाबल | खार ढोबी |
| खार कासु | वोवली | मौजे कडसुरे | पाटणी |
| | | बुराडी | कासरो घटवर्डा |
| जुडाणी | चोले | खारी काले | खारी गाधे |
| मोचला | आठवली | खार तरसेत | म्हैसबाड |
| तेलीपाले | घाट | खार कारावी | खार जा |
| निमे | निमे | | बे (दो ?) ला |
| माडवे | लाजिमा गौली | खार देउली | तेली मौजे पाले |
| निमे | निमे ८८५ | | निमे |
| लाजिमा माहार | लाजिमा ताबोली | माहार कर्याती | खार घाट निमे |
| कोडगांव | लारी निमे पाने | पिगोडे कोसली | गोली लाजिमा |
| सोहू | -॥- २५ | बोनसे कुहरे | ८८५ |
| नींडी | पलस | ताबसोली | सुकेली |
| लाजिमा हमाल | हैदोली | बकाल निमे | ताबोली निमे |
| निमे | चालघर (निमे) | | लारी -॥- पाने २५ |
| | वाईगणी निमे | कोरडी कसी निमे | |
| तेली कर्याति निमे | लाजिमा सराफ | सराफी निमे | तेली कर्याती निमे |
| लुगडी निमे | निमे | चालदार निमे | लुगडी निमे |
| | लग ० | माडवे निमे | वाईगणी निमे |

याखेरीज उया (पा) व उत्पन्न व मिरासी वर गाव आहेत दस्त होईल ते दो ठाई व नुकसान येईल तें दो ठाई या खो हक लाजिमा असल तो दों ठाई मिरासी वर नागवण पडल ते दो ठाई देणे.

ले.४१७ } { श. १५७२ चैत्र शु. १३
इ. १६५० एप्रिल ४

श्री




अस्सल

शिक्का फारशी

अज दिवाण तपे खारापाट उर्फ नागोठाणे मामले अमीनाबाद उर्फ पाली ता देसाई व अदिकारी व सेठिये व माहाजन व खोतु व पाटेल व सिलोतरी व मढवी व माहार व बाजे मिरासदार ता मजकूर व कसबे मजकूर बिदानद सुा खमसैन अलफ दरीविले बावाजी कृस्ण कुलकर्णी येउनु ठाणा अर्ज केला की आपले कुलकर्णपणाची निवाड कारकीर्दी मलिक अंबर साहेब जाला होता तेण्हेप्रमाणे आपले वडिले खात होते यावरी आपले वडिल बफात जालेयावर दरम्याने अताजी तानप्रभु आपला वारीसदार मऱ्हाटेयाचे कारकीर्दी निवाडियासि कुसुर करून निवाडा करून घेतला होता तेण्हे प्रमाणे अताजी दोनी चार साले कमावीस करून खात होता तो हि बफात जाला त्यावरी आपण कमावीस करून खात होतो यावर साबाजी अनत फर्जद अताजी सन तिसा कारणे लारी से येक १०० सीरणी कबूल केलियावर (दु) माहालीचे कारकुनी मिरास त्याचे हवाले केली त्यावरोन तेणे आजी तागाइत कमावीस केली आहे तरी साहेबी आपली मिरास आपले हवाला कर्णे आणि आपला निवाड कारकीर्दी मलिक साहेब जाला आहे तेण्हे प्रमाणे आपणासी हाली महजर करून देणे आपण सीरणी ळारी दोडसे १५० देईन म्हणौनि अर्ज केला बा (बराये) अर्ज खातिरेसी आणून कुलकर्णपणाची कमावीस बावाजीचे हवाला केली आहे तुम्ही कुलकर्णपणाची कमावीस याचे हाते घेत जाणे व याचे मिरासीचे निवाडियाचे कागद पेसजीचे आहेती तरी खातरेस आणून तेण्हे प्रमाणे माहाजर करून देऊनु मोर्तबु फारसी

लेखन
सीमा

(पाठीवर)

तेरीख १२ माहे रबिलाखर
रबिलाखर

ले. ५१८ } { श. १५७२ आषाढ शु. ८
इ. १६५० जून २७

श्री

असल

( पहिल्या ४ ओळी अगदीं फाटल्या आहेत )

\+ + + + +

इ ( हिदी ) खमसैन अलफ दादे कौलनामा येसा जे तुझे बाबे देसाई व अदिकारी तपे मजकूर मालूम केले जे कुलकर्णपणाची कमावीस व वाडवाही तकसीम तान्हाजी मजकुराची आहे पेसजी पासुनू हली हजरती-साहेबास तपे मजकूर मुकासा अर्जानी जाला तन्ही तान्हाजी मजकूर कमावीस करीत होता त्यावरी कारकीर्दी सिदी गेवान अबुतालीब ठाणदार मार्जी तपे मजकूर या नजिक साबाजी अनंत प्रभू तान्हाजीचा चिचेरा भाई उभा राहिला त्यावरी सिदी माइलेने हुकुमी त्याचे हवाला कमावीस केली त्यावरून साबाजी येक दीड साल कमावीस करीत आहे तरी साबाजीसी कमाविसेसी निसबती नाहीं दारीत नाही तान्हाजी मजकूर वडील आहे व वाडिलाचा फर्जंद आहे कमाविसेची निसबती यासी च आहे दरम्यान साबाजी मजकुरे कुसूर केला आहे तरी साहेबी तान्हाजी मजकुरास महजर करून देउनू बा महजर + + सिर्णी लारी दीडसे १५० साल मजकुरा कारणे येक साल देईल कमावीस याचेच हाते घेतली पाहिजे ये बाबे तान्हाजी मजकुरास कौलु सादर केला पाहिजे म्हणौनि मालूम केले बराये मालुमाती खातीरेस आणौनू कौल सादर केला असे कमावीस तुझे हवाला केली असे महजर करून दिधला अजी साहेब+मुडे १५० सिरणी दिवाणात घेतली + + + काही सकदारी + + + काही फिकीर न करणे + + + तुजसी येक जरयाची निसबती नाहीं खुसीहाल होऊनू कमावीस करीत जाणे सिरणी येक साल उसूल करणे कोण्हे चाबे तालुक अंदेसा न करणे कौल असे मोर्तबु

मोर्तब
सूद

तेरीख ७ माहे रजबु
रजबु

---

ले. ५१९ } { श. १५७२ आषाढ शु. ८
इ. १६५० जून २७

श्री

नकल

वाटणी तर्फ तानाजी कृष्ण व साबाजी अनंत कुलकर्णी ता खारापाट उर्फ नागोठाणे मामले अमीनाबाद ऊर्फ पाली सुरू सन इहिदे खमसैन अलफ तान्हाजी कृष्ण व साबाजी अनत या हरदो जणामधे कुलकर्णीपणीचे मिरासी ( ब ) दल करकसा लागला यावरी

तान्हाजी कृष्ण दिवाणात उभा राहोनु फिर्यादी केली की आपले वडील घर कुलकर्णा-पणाची कमावीस आपली वाडीविची येक तकसीम बरहुकूम निवाडा कारकीर्द मलकत मदारी मलिक अबर साहेब जाहला आहे तेण्हेप्रमाणे आपला बाप कृष्णाजी वडील व धाकटा गोविदप्रभु व त्या धाकटा अताजी सदरहू जण येकवट घराबेयामधे होते ते वख्ती आपला बाप खात असे यावरी गोविदप्रभु व अताजी घरामधून वेगले निघालेयावरी आपला बाप कमावीस करून खात असे अमा मिरास वाटली नाहीं यावरी आपला बाप मयेत जाला यावरी तीसरे महिने-या गोविदप्रभु मयेत जाहला यावरी तो मजकूर नागोजी भोसला यास मुकासा होता ते वख्ती आपण नादान अंताजी दाना कुल्कर्णपणाची कमावीस करीत असे म्हणोन आपणासी + दाम लाउन करकसा दोवेरफमी मिरासीची वाटणी करणे निमे मिरास तान्हाजीस देणे व निमे मिरास आपणास ठेवणे व कमावीस येक साल तान्हाजीने करणे व येक साल आपण कर्णे यैसा निवाडा करणे म्हणोन बोले यावरी नागोजी भोसले याचे कारकून रायाजी भोसला ठाणेदार व दत्ताजी त्रिमल मजमूदार तो मजकूर अंताजीचा पाठी राखोन आपणास नेऊन हुकुमी बैसउन आपणास बोल्त कीं मिरासीची वाटणी करणे निमे तुज देतो व निमे अंताजीस देतो बादज कमावीस येक साल करणे व येक साल अंताजीनें कर्णे म्हणोन बोल्त यावरी आपण बोले की कुळकर्णपणाचे मिरासीचा निवाडा पेसजी कारकीर्द मलकत मदारी मलिक साहेब जाला आहे तेणेप्रमाणे निवाडा करणे व वडिल घर आपले आहे कमावीस आपली व वडिलपणाची येक तकसीम कारकीर्दी मलकत मदार मलिक साहेबी दिधली आहे तेण्हेप्रमाणे देण बादज वाटणी करणे म्हणोन बोले अमा आपला बोल कोण्ही खातीरेस आणिला नाहीं आणि हुकूम करून मिरासीची वाटणी करून निमे मिरास आपणा खाले लिहिली आणि अंताजी खाले निमे मिरास लिहिली आणि कमावीस येक साल आपण-करावी व येक साल अंताजीने करावी यैसी वाटणी करऊन हुकुमे आपले निशाण घेतले यावरी येक साल आपण चालविले यावरी आपण अंताजीचे सिरी टाकिले आपणावरी हुकूम करउनु बुद्धीमधे बदवस्त साहेबा नाहीं जे वख्ती बदोबस्त साहेबा होईल ते वख्ती आपली मिरास व कमावीस व वाडीवे आपला बाप खात होता ते आपले हवाला होईल ते वख्ती आपण कमावीस करीन याबद्दल आपण कमावीस टाकिली अंताजी कमावीस करीत असे यावरी अंताजी पाणियात बुडोन मयेत जाला यावरी खान अजम हबासखान मुकासी तो मजकूर येही आपणास बोलाऊन दिलासा केला कुलकर्णपणाची कमावीस तुझी तू चालवणे म्हणोन बहुतवजा दिलासा केला कुलकर्णपणाचा कारभार आपण चालउ लागलो यावरी खान मा-इलेचा मुकासा बजावर्द होऊन सिदी अबर हवालदार कोठ जजीरे राजुरी यास मुकासा जाला पाच साले मोकासा होता ते वख्ती हि आपण च कमावीस चालवीत होतो यावरी याचा मोकासा दूर होऊन हजरती साहेब मुकासा अर्जानी जाहला यावरी साल दीड दान कमावीस आपण केलीयावरी साबाजी अनंत सिदी रेहन अबु तालीब ठाणदार यानजीक उभा राहोन अर्ज केला कीं कारकीर्दी मराठे आपले बाबे मिरास वाटणी निमे कमावीस येक साल तान्हाजीनें करावी व येक साल आपण करावी यैसी वाटणी केली आहे तर साहेबी

तेण्हे बरहुकूम येक साल आपले हवाली करणे यावरी सिदी रेहान याही मुनसर्फी न करितां अकस करून येकायेकी साबाजी अनंत यास पान देऊन कमावीस हवाली केली यावरी मिरासदार देसाई व अदिकारी अर्ज केला कीं वडिलपण कमावीस तान्हाजी कृष्ण याची असे त्याचे बापापासोन चालत आले आहे कारकीर्दी मलिक साहेबं निवाडा जाहाली तर तेण्हेप्रमाणे तान्हाजीचे हाते कमावीस घेतली पाहिजे म्हणोन सांगितले अमा आइकिले नाहीं यावरी साबाजी अनंत कमावीस साल दिडी करीत आहे तर साहेबी हरदम निवाडा कारकीर्दी मलिक साहेब जाहली आहे तेण्हेप्रमाणे निवाडा केला पाहिजे आपला बाप वडिलाचा फर्जंद त्याचे चिचेर भाई गबाजी केदाजी प्रभु व हरदप्रभु व सोनप्रभु व आउप्रभु या दोघास निमे मिरासीचा तकसीम दिधली आपले बापास बदल कमावीस व तकसीम येक व वाटणीची तकसीम येक. यैसी निमे मिरास व कमावीस दिधली कमाविसीसी व हरदो जणासी निसबत नाही आपला बाप कमावीस चालवीत असे म्हणऊन अर्ज केला यावरी साहेबी काजी हाकीम सरा व देसाई व अधिकारी व मोक्षसर लोक बोलाऊन मज्यालिस करून कारकीर्दी ममलकत मदारी मलिक आंबर वाटणी व खुर्दखते व मराग्या ( ठ्या ! ) चे कारकीर्दीची वाटणी आणून खातिरेस आणितां मराठ्याचे कारकीर्दीस वाटणी जाहली आहे त्यावरी गोही आहे तर या गोहीदारासी पुसणे की कारकीर्दी मलिक अंबर निवाडा होऊन वाटणी जाहली आहे कमावीस व वाडिवे तान्हाजीचे बापाची आहे तेण्हे बरहुकूम तान्हाजीने चालवावे असे असोन मराठेयांचे कारकीर्दीस वाटणी काये सबब असी केली यावरी अबदलजी अदिकारी बोलिले की मराठे याचे अमलामधे वाटणी केली आहे ती गैरमालूम केली आहे तान्हाजी राजी नव्हता हुकुमे निशाण घेतला आहे तर कारकीर्दी मलिक साहेब वाटणी जाहाली आहे त्यास राजी होता म्हणऊन गोही दिधली त्यावरून मराठेयाचे अमलामधे वाटणी जाहली होती ते बातील करून कारकीर्दी मलिक स.हेब वाटणी जाहली आहे ते करार केली ते वाटणी व खुर्दखते हाजीर मज्यालीस खातिरेस आणितां तेथे वाटणी जाहली आहे गबाजी केदाजी प्रभु व हरदप्रभु व सोनप्रभु व आउप्रभु याचे हवाला साहेबी मिरासीची निमे तकसीम केली व निमे तकसीम व कमावीस कृष्णाजी तानप्रभु वडिल म्हणोउन त्यासी दिधली यावरी कृष्णाजी हयात होता तलग कमावीस करून निमे मिरास खादली तेण्हेच बारनीस बा हाली वडिलाइ खातिरेस आणिता तान्हाजी कृष्ण हा वडिलाचा फर्जंद कमावीसचा भोगवटा तान्हाजीचा बाप कृष्णजी मूळ म्हणोन तेण्हेच केला आहे त्याचे नव्हे [!] भाई गोविंदप्रभु व अंताजी येही कमावीस केली नाही व वाटणी बदल पाहतां कमावीसची वडिलाइ मुलाचे तकसीमेची निा धरीत नाही म्हणोऊन कमावीस व वाडिलाईची तकसीम तान्हाजी कृष्ण वडिल म्हणऊन त्याचे हवाली करून मिरासीची वाटणी केली.

गबाजी प्रभु अजि दि॥ कोनेर पंडित मजमुदार

सिदि जोहार ठाणदार

मुलना अबुल रहीमा अज इस्माईलजी देसाई ता मार

| | |
|---|---|
| दि॥ काजी हाकीम सरा अबदलजी व हुसेनजी अदिकारी ता। मार | चागा सालवी मा। पाली |
| अगा मीर उस्तजा खोर्डी मौजे बेनसे | इस्माइलजी अहमदजी नाइक-वाडी ता। मार |
| महमद दलवी मुकादम निमम पाउगी दा। कसबा मार | बाबा सालवी नाइकवाडी मुकासाई मौजे वागणी |
| कनक सेट गोजसेट सोनार खोतु कोढवी | हिरोजी खोर्डी माडवसे ता। मार |
| अबदलजी वनामजी खोड सालिणे जौनरे | गण पाटेल व भिवा पाटेल खोर्डी पलस |
| बहीर दसजी खोत आवा बेणा मार | विसभट खोत वाढगो |
| विठोजी आउ प्रभु खोत निगडे | मलबार गोविंद खोत बोबेली |
| राम मेहतर गौली कसबे नागोठाणे | जोगीदास सेठीया बकाल मो। नागोठाणे |
| बदु मुकादम कोली डकसा कसबा नागोठाण | कासी खेडजी उदसी कसबे नागोठाणे |
| नान्हाजी सराफ तो। नागोठाणे | आबाजी सराफ मो। नागोठाणे |
| आलीजी पाणमारा जकाती बंदर नागोठाणे | |

हे मुख्ये करून हरदो जणाचा निवाडा केला जे मिरास कुलकर्णपणाचा लाजिमा.

तर्फ तान्हाजी कृष्ण

| बिा वाडावे देहे | | ऐन तकर्साम | |
|---|---|---|---|
| | | १ बेनसे | १ कोपेटी |
| | | १ निगडे | |
| १ सुकेली | १ कलप | १ वरप | १ पाढपूर |
| १ कोडगाव | १ अठवली | १ चिकणी | १ माचेला |
| १ जिनरे | १ तळेखार | १ हेबली | -॥- घाट |
| १ माडिवसेत | १ माडवे निमे | १ चिरबी | -॥- माडवे |
| ७॥ | | १० | |

हुगडे पटी
मालीना निा रग्रेती
लारी ३०

साबाजी अनंत व भागाई

| साबाजी अनंत | | भागाई |
|---|---|---|
| १ कोढवी | १ रेवेली | १ पल्स |
| १ कुरनाड | १ चीलेखार | १ आंबा |
| १ बालस | १ खारी उडाणी | १ पालेखार |
| १ आवाडोसी | १ खारी वोली | — |
| १ येन घर | १ खारी काळी | ३ |
| —— | | भागाई मयत जाहल्यावरी |
| १० | | तान्हाजी कृष्ण येणे खाणे |

याखेरीज किरकोल बाब तान्हाजी व साबाजी
कसब कुले निमे तान्हाजी व निमे
साबाजी लाजीमा व रोज राती
हावखलणी ( ? )

| | |
|---|---|
| गौली लाजिमा | बकाल |
| तूप व खडाणी | कोरडकसी |
| तांबोली लाजिमा | पाउगी नीमक |
| पाने विडीयाची | माली सेत्र चिटे |
| सराफ | चाम्हार |
| तेली लाजिमा | |
| रोज हाती | |

वाईगणी निमे तान्हाजी व निमे
साबाजी कोली मुकूट निमे तान्हाजी व
निमे साबाजी लाजिमा तेली कर्याती
निमे तान्हाजी व निमे साबाजी माहार
कर्याती निमे तान्हाजी व निमे साबाजी

सदरहूप्रमाणे नित्राडा केला यावरी साबाजी अनंत अर्ज केला की सदरहू वाटणी प्रो आपला आवकत चालत नाही तान्हाजी कमावीस करील आणि आपण बेकार तरी साहेबं तान्हाजीचे वाटणीमधून ज्याजती आपणास देववणे यावरी काजी हाकीम सरा व कारकू व देसाई व आदिकारी व मोक्षसर लोक बैसोन सदर + वाटणी खेरीज ज्याजती गाव दो तान्हाजी कृष्ण याचे वाटणी मधून साबाजी अनंत यास देविले यावरी हरदो जणाची समजा विसी केली की कुल्कर्णपणाचा कमावीस तान्हाजी कृष्ण याण्हे कर्णे साबाजी अनंत यास

कमाविसेसी निसबत नाही बाजद पेसजी वाटणी मराठेयाचे कारकीर्दीस जाहाली रद असे उयाजती गाउ

१ जीनरे १ कलद

सदरहूप्रमाणे समजाविसी केली यास जो कोण्ही हिलाहरकत करील तो दिवाणाचा अन्याई व गोताचा अन्याई: पेसजी कारकीर्दी मऱ्हाठे वाटणी जाहली ती रद असे व कारकीर्दी सिदि रहान तालीव ठाणदार खुर्दखते दिधली असेत + + + असे छ ७ रजबु

---

ले. ४२० } { श. १५७२ आषाढ शु. १४ इ. १६५० जुलै २

× × × × हवाल सिदी अजम काजी अली सेर हवालदार व कारकून + + + × × + + बुजानेबु कारकुनानी व देसाई अदीकरून × + + खारापाट बिदानद सु॥ इहिदे खमसेन अलफ + + × छ १२ रजब पौ छ २२ रजब पाठविली तेथें मजकूर लिहिले जे तपे मजकुरींचे कुळकर्णी तान्हाजी कृष्ण व साबाजी अनंत हर्दो जण चीचे भाइ हे कुल्कर्णपणाचे मिरासी बदल भांडत होते या वरी साल्मुदस्तां अखर साली तान्हाजी उभा राहोन अर्ज केला जे आपले मिरासेचा निवाडा कारकीर्दी मल्कि सेक मलिक अंबर जाला आहे तेण्हे बरहुकूम आपला निवाडा करणे म्हणौउनु अर्ज केला त्यावरून तपे मजकुरींचे काजी हाकीमसरा व देसाई व अदिकारी व देसक व भले लोक बैसउनु हर्दो जणांची हकीकत खातिरेस आणून पेसजी निवाडा जाहाला होता त्याचे गोही मोकाबला व खातिरेस आणून हर्दो जणाचा निवाडा केला वाटणीचा कागद केले त्याची तालीक बंदगीस पाठविली आहे त्यावरून रोसन होईल तरी साहेबी वाटणी खातिरेस आणोन तेण्हे बरहुकूम सुभाचे खुर्दखत नफर मजकुरास सादर केले पाहिजे वाटणी वित॥

तान्हाजी कृष्ण

बदल वाडवे

| देहाय तपे मजा | | यैन तकसीम | |
|---|---|---|---|
| सुकेली | १ | बेनसे | १ |
| कोडीज | १ | नितुडे | १ |
| जिनरे | १ | करप | १ |
| माडवे | १ | + गिणी | १ |
| साल्मे | १ | देवाळी | १ |
| अठवली | १ | खारी चिरटी | १ |
| तले खारी | १ | खारी कोपेटी | १ |
| माडवे निमे | -॥- | कास मढारे | १ |
| | ७॥ | माचेल | १ |

घाट निमे -॥-
माडत्रे निमे -॥-

सुगडी साली-
न्या + + रयताळा
+ + ३०८

साबाजी अनंत व भागाई

× ×
× +
कुरेनाड १
बल्से १
+ +
उवर्सा १
येनघर १
रेवाळी १
चोले १
उडाणी १
वोवळी १
कासु १
१०

+ +
+ +
पल्स १
× १
+ १
३

या खेरीज किरकोळ बाबा तान्हाजी कृस्न व साबाजी अनंत

कसबी कुल निमे तान्हाजी
व निमे साबाजी लाजिमा
व + + + ब व खडाणी

वागिणी निमे तान्हाजी कृष्ण
व साबाजी अनंत

गौली खडाणी
तुप
ताबोली लाजिमा व
पाने विडा
माली सेव
+ + + × दार

बकाल
कोर + कसी
+ + गीनिम
सराफ
तेली लाजिमा
व रोज रातीब

कोली सुक्टे निमे तान्हाजी
व निमे साबाजी
लाजिमा तेली + + + निमे
तान्हाजी व साबाजी
माहार कर्याती निमे तान्हाजी
कृष्ण व निमे साबाजी

येणेंप्रमाणें निवाडा केला यावरि साबाजी अनंत बोलला कीं सदरहू वाटणी प्रमाणें आपला अवकाती चाले नाहीं तान्हाजी कृस्ण कमावीस करील आणि आपण बेकार तरी तान्हाजी कृस्णाचे वाटणी मधून ज्याजती आपणांस देवणे यावरी काजी हकीम सरा व देसाई व अदिकारी व मोकसर भले लोक येही सदरहू वाटणी खेरीज ज्याजती गांव २ तान्हाजी कृस्णाचे वाटणी मधून साबाजीस देवविले यावरी हरदो जणांची समजाविसी

केली कीं कुलकर्णपणाची कमावीस तान्हाजीन करणे साबाजीचा कमाविसेसि निसबती नाहीं गाव २

मौजे जिनरे १ मौजे कळदे १

सदरहू प्रमाणे समजाविस केला यास जो कोण्ही हिलाहरकत करील तो दिवाणीचा अन्याइ व गोताचा अन्याइ पेसजी कारकीर्दी मराठे वाटणी जाली ते कागद रद असति व कारकीर्दी सिदि रेहा न अवुअली हे ठाणदार खुदखत दिधले ते रद असे म्हणोउनु वाटणी करउनु निवाडा केला आहे म्हणोउनु लिहिले तरी तान्हाजी कृस्ण व साबाजी अनंत कुळकर्णी ता मजकुरी हर्दो जणाचे जैसे काही कारकीर्दी मलिक अंबर चालिले होते तेण्हेच प्रमाणे हाली करार करून महाली हकीम सरी व भले लोक बैसोन निवाडा केला तोच करार केला असे दरम्यान भोसले यांचे कारकीर्दीस कमावीस केली होती ते रद असे सदरहू निवाडा बरहुकूम तान्हाजी कृस्ण कुलकर्णी याचे हवाले मिरास केली असे औलाद अफलाद चालविजे दरींबाब कौल खुदखताचा उजूर न कीजे

---

ले. ४२१ } { श. १५७२ कार्तिक व. २; इ० १६५० आक्टो० ३१

हू

असल प्रो नकल

इ कौलनामा अजदिवाण ता खारापाट मामले अमीनाबाद ता बावाजी कृष्ण कुलकर्णी तो नागोठणे बिदानद सुा इहिदे खमसैन अलफ दादे कौलनामा यैसा जे तुझे बाबे देसाई व अदिकारी तो मजकुरी मालूम केले जे साहेबी फर्माविले कीं बावाजी कुलकर्णी तो मजकूर बाहेर पाडिला आहे तरी त्याचा मुदा घेणे म्हणोनी रजा तरी नफर मजकुराचा मुदा मनास आणिता मालूम केले की आपले मिरासीचा निवाडा कारकीर्दी सिदी जोहार ठाणेदार माजी ता मजकूर जाला आहे तेण्हे प्रमाणे हाली सिदी अजमाचा कौल सादर जाले त्या कतिबा लेहोउनु येईन म्हणोनि तेण्हे मुदा बेसम केला आहे तरी साहेबी नजर अनायेती करून आपला कौलु सादर केला पाहिजे मालूम जाले हक मालुमाती खातीरेसी आणून कौलनामा सादर केला असे पेशजी तुझे मिरासीचा निवाडा जाला आहे तेण्हेप्रमाणें चालउनु हालीही कौलु असे कोण्हे बाबे शक अदेशा न कीजे आपला खातिरजमा राखोनी बेशक होउनु येईजे हर कोण्हे बाबे तुवा शक धरिली आहे तरी हे बाबेहीं तुज कौलु असे व काकाजी प्रभु यासही बराबर घेऊन येणे आपला हिसेबु करील जेहि हिसेब पैकी होतील ते हि मुदती फुरसतीने उसूल होईल बाजद कोण्हे बाब सक न धरणे सुखे येणे जाणिजे

तेरीख १५

जिलेकादी

---

ले. ४२२ } {शा० १६१८ आश्विन शु० २
{इ० १६९६ सप्टें० १८

नकल

दाा बाो गोविंद बावाजी व रंगाजी अनंत व निलाजी कुलकर्णी ताा खारापाट उर्फ नागोठणे सुाा सबा तिसैन अलफ कारणे दर बंदगी खानसाहेब आरमार साहेबाचे बंदगीस कबूल कतबा लेहून दिधला येसा जे साहेबी हुजूर आणून रजा फर्माविलो की इाा सन इसने तिसैन अलफ ताा सन सीत तिसेन सरकारींचा इजारा ताा मजकूर आहे त्या अमलामध्ये तुम्ही चोरी केली व सेताचे देणे दिधले नाही व सेत दुतर्फाचे देणे दिधले नाही व सीरणी हक मीठबंदर दिधली नाही तरी गुन्हेगारी देणे म्हणोन रजा फर्माविली यावरी बंदगीस आपण आपले हाल जाहीर केले यावरी साहेब मेहरबान होऊन आपणास खंड रुपये २५०० दोन हजार पाचसे खंड केला तो आपण कबूल असो उगवणी करून देखील हक गाव लिहिणार व दरबार खर्च नित रयेती व बागा खुद दल्वी कुल गुन्हेगारी देखील वसूल करून याचा वसूल इाा छ १ रबिलोवल ताा अखेर जमादिलोवल येकूण माहे ३ दर माहे नकद रुपये

| | |
|---|---|
| माहे रबिलोवल अखेर चाद | ८३३८ |
| माहे रबिलाखर अखेर चाद | ८३३८ |
| माहे जमादिलोवल अखेर चाद | ८३४८ |
| | २५००८ |

येकूण दोनहजार पाचसे रुपये सदरहू मुदतीचे मुदतीस वसूल करून देऊन हा कतबा सही

गोही

दादाजी हैबतराऊ देशमुख ताा ओसरे आधारणे लिाा प्राा साक्षे
१

भिकाजी देसमूख व रतनाजी अदिकारी ताो अस्टमी लिाा प्राा साक्षे
१

साबाजी अदिकारी तर्फे हवेली लिहिले प्राा साक्षे
१

तेरीख १
रबिलोवल

ले. ४२३ } { श० १६२४ आश्विन शु. १० | इ० १७०२ सप्टें० १९

अस्सल

श्री शिव न
रपतिहर्षनिदा
न मोरेश्वरसुत
भैरव मुख्य
प्रधान

इ कौलनामा अज स्वारी राजश्री पंतप्रधान तांहा खोत व रयानी तर्फ नागोठणे सुभा चेऊल सुहुर सन सलास मया व अलफ दादे कौलनामा यैसा जे तुमचे बाबे मा गोविंद बावाजी देसकुलकर्णी ताा मजकूर याणे हुजूर विदीत केले की लस्करचे धामधुमी करितां रयेत परागदा होऊन फिरं ( गणा ) त जात होती ते आपण अवरावर्ला तात ( ! खोलबून ठेविली आहे साहेबी मेहरवान होऊन रयेतीस कौल सादर केलियानें माहालास आणून जे गांवीर्चा ते गावी वसाहत करून म्हणून मालूम केले बराये मालुमार्ता खातिरेस आणून तुम्हांस कौल सादर केला आहे खोत पाटील रयेता बाजे खुद वाणी बकाल देखील जे गांवी ( चे ) ते गांवी येऊन वसाहत करून खुसीहाल राहाणे कोण्हे बाबे शक अंदेशा न धरणे गांवोगांवी लांबे पीक जाहाले आहे ते तुम्ही महालांत आपापले गावी रयेता खोत येऊन त्या पैकाचा आटोप करणे साऱ्याचे बाद बांधणे असतील ते आपली गांवी येऊन बांधणे पुढील कीर्दी माहामुरी करणे दरी बाब कौल असे छ ७ जमादिलोवल पा हुजूर

पाठीवर

मुरु सुद बार

लेखना
वधि

---

ले.४२४ } { श. १६२५ कार्तिक शु. ३ | इ. १७०३ आक्टो. २.

श्री

नकल

छत्रपति

राजश्री विसाजी भास्कर हवालदार व कारकून तो नागोठणे गोसावीं यांस

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये श्रो—शंकराजी बाजी सभासद नामजाद सुभा पंचमहाल चेउल सुरू अर्बा मया व अलफ मा गोविंद बावाजी कुलकर्णी तो नागोठणे यानी प्रतापगडचे मुकामी राजश्री—श्वामी कर्णाटक प्रांती श्वारीस गेले ते समई धामधुमे

करिता हा प्रां (त) अगदीच उद्वस जाला ते प्रसंगी आपण राजश्री पंतसचीव याची भेट घेतली त्यानी आपला दिलासा करून कौल दिल्हा आणि सेत जुई दर सवाद मौजे बेनसे तर्फे मजकूर रकम ढेप मुडे १॥ ३॥। दीड मुडा पावणेच्यार मण व नख्त लारी येक हे आपणास इनाम देऊ(न) सनद सादर केली त्यावरून आपण माहाली येऊन रयेत परागंदा जाली होती त्ये आणून कीर्दीस लाविली इनामतीचे सेत अनभवीत असतां ईनामतीची सनद आली ते किले सुधागडास राहिली आपण सुधागडी येऊन सनद ध्यावी तर शामलाच्या तगादियाकरिता माहालीहून किले मजकुरी यावयास अनुकूल पडिले नाही यामुळे इनामतीची सनद किले मजकूरी ठेविली होती ते आपले हातास आली नाही याकरिता माहालहून इनामतीचा खर्च घातला नाही बाकी काढिली आहे॰ ब्रिता।

| | नख्त टके | गला खंडी |
|---|---|---|
| सन सीत | २४।- | ६॥।२॥। |
| सन सबा | २२८४ | ८।३॥। |
| सन समान | २१॥।३ | ७॥।२॥२॥ |
| शन तिसा | २३।६ | ३८१।२॥- |
| सन मया | २३।७॥- | १॥३॥-॥- |
| सन इहिदे | ३२॥।४॥- | ५॥।१।१। |
| सन इसने | १८॥।- | ४८३।१॥- |
| | १६६॥१ | ३७॥।३॥।२।१ |

येकूण नख्त टके येकसे साडेसासस्ट टके येक रुका व गला खडी पावणे अठतीस खंडी पावणेच्यार मण सवादोन पाइली येक निठवे बाकी वोढत आहे यैसीयास वतनदार श्वामीच्या पायासी येकनिस्ट राहोन माहालाची लावणी संचणी करून दिवाणाचे दस्त देत आहे श्वामी सेवेसी आपणापासून अतर होत नाही श्वामीनी कृपाळू होऊन सदरहू बाकी माफ करून सेत जुई उतरोतर इनाम चाले यैसी आज्ञा केली पाहिजे म्हणून हुजूर विदित करून मारनुले सुभाच्या नावे सनद सादर केली असे छ २० रबिलाखर पो छ १० जमादिलोवल सादर असे त्याजवरून तुम्हास हे पत्र लिहिले असे तर मारनुले कडील इनामाची सात साला बाकी माहाली वोढत आहे मानुलेचे नावे इनामतीचा खर्च लिहिणे व सेत जुइ रकम मुडे १॥३॥। दीड मुडा पावणेच्यार मण व नख्त लारी रकम १ येक रास कुल कानु देखील हाली पटी व पेस्तर पटी खेरीज येकदार यासी हुजरून इनाम करून दिल्हे असे तर तुम्ही मारनुलेचे दुमाले सेत जुइ करणे प्रति वरसी नूतन पत्राचा उजूर न करणे प्रति लेहून असल पत्र यापासी भोगवटीयास देणे छ १ माहे जमादिलाखर.

---

ले. ४२५ } { श. श.

(वरील फाटले आहे.)

राहिले त्यास सिवाजी राजे बफात जाले + + + + + त्यावर रामघाट प्रांती होते त्यास संभाजी दस्त जाहा+ तेव्हा + +ला काबिला विशाळगडाखाली होते---------+ + +त + + + संभाजी राजा पाचाडास होते येसाजी फर्जंद म्हणून होते + + सरदेशमुखी दिल्ही होती त्याण्हे भारे बोस रवाना केले होते तेथून ऐवजाचे वसुलावर चेऊल प्रांती रवाना स्वारी जाली होती + + + आपण होतो त्यास संभाजीची खबर दस्तगिर जाहला अशी येताच + + + + +चे तफरका जाले बदा येकला ? पडिला मार्ग न चालजे नवाद पण त्यास उदेरीची स्वारी रेवदंड्याहून जात होती + + + पण रेवदंड्याहून सागरगडास म्हणून जाण्यास रवाना जालो त्याही उदेरीस मरहुमी सिदी अवदुल रहिमान साहेब यानजीक नेले त्याही उदेरीस चाकर ठेविले त्यास खानसाहेब अंतगीरीचे मोर्चियास होते ते पासून हुजूर ठेविले आपला बाप काबिला ते प्रांती होता त्यास ते प्रांतीहून बंदीयाचे खबरीस रोले पावेतो येउन फेर रामराजा चंदीस गेला त्याबराबर गेला असेल त्यावरून चंदीकडे गेला तो अनलंग खबर नाही तिकडेच वारला मागे कबिला होता त्यास मोगलाई जाली मराठे जागा जागा लुटू लागले. तेव्हा त्यास चांद सावत म्हणून होता त्याण्हे लुटले वस्तवानी गुरुढोरे त्याने नेले चाकर बंदी होती ती खावयास नाही यामुळे च्यारी चहूकडे गेली त्यापैकी बापीयाची बुढी मा व खंडोजी भाई ही दोघे जे वक्ती जुनरास खाजिना आणावयास + + स्वारी गेली होती ते स्वारी राजपुरीस अली ते वक्ती हर दूजणे राजपुरीस बदे या नजीक आली हे वजेची हकीगत जाली वतनाची हकीगत मनास आणवितो व तुज कोणी आपले सागणार नाही आपली वली कैसी त्याची वली कैसी हे काही कळेना असे जाले त्यास तलास करून हे हकीकत बदगीस जाहीर करावी त्यास यामागे काही मरहुमी खान साहेबाचे अमला तरफी तरतचं मराठीयाची होती वतनाचा काही कोणाचे अमल निवाडा ऐसा प्रसंग जाला नव्हता हाली साहेबाचे अमलात मागे मालिक साहेब होते याही कितेक सजाच्या वतनाच्या वगैरे मनसुफीया नीवाडे केले ते आजलंग चालिले आहेत तैसेच साहेब मेहेरवान दुधपाणी निवाडा करितील असे समजून बंदीयाची हकीकत जे होती ते बदगीस ठेविली असे निवाडा करणार साहेब धनी मावाप असेत.

हा जे काही वतनावर भोगवटा करीत असेत याची व खादीयाची अवलाद हे वजेदी असे.

बदी याची अवलाद मूल

१ आपाजी प्रभु ताचे दामाजी मारिला त्याची अवलाद वाघोजी प्रभु त्याची अवलाद बहिराजी प्रभु त्याचे बेटे

१ बापूजी
१ खंडोजी

---

२

१ वैज प्रभु खडकीस मोसब घेऊन गेले त्याची अवलाद.

हरबाजीची अवलाद
१ वैज प्रभु
१ गणेश प्रभुचे अतमाजी त्याचे मुले दोघे

---

२

नागोजीची अवलाद
अंताजीपंत पुत्र त्याचा नागोजी मालगडीस असतो
१

वैजो हरी याची अवलाद हरबाजी व तानाजी वगैरा भाई असत
१ गणेश प्रभु याम बेटा नाही बेटिया २ होत्या

---

३

लिहिणार ठेविले होते मूळ पुरुष त्याचे व जोगणीचे रा + नंतर त्याचे सिरकाल पाडिला सा २ भाई होते त्यापैकी वडील भाई कोंड प्रभु रोजगारास हे प्रांती आला तो रोहे प्रां घोसाल येथे पतकीपणाचा रोजगार करून राहिला त्याची खबर दुसरा भाई गोज प्रभु यास मालूम जालीयावर ते प्रांतीहून त्याची बुढी व तो भाईचे खबरीस हे प्रांती रोजगारा करावे दोघा भाई गुदेरान करावे म्हणून अला गणेश प्रभु कुलकर्णी याने बापू मढवी मौजे निडी तो नागोठणे यास सांगितले होते की आम्हास कारकूनाची दरकर असे त्यास गोज प्रभु व त्याची बुढी ऐसी मौजे मजकुरी वस्तीची राहिली त्याणे त्याची हकीकत विच्यारिली अण गणेश प्रभु कुलकर्णी याचे मुलाखतीस नेला तेथे त्याणे लिहिणार ठेविला वडील भाई कोंड प्रभु रोहे याचे पतकीपण चालवीत होते त्याची अवलाद रामाजी विष्णु हाली राजपुरीस असते गोज प्रभु लिहिणार ठेविला त्याची अवलाद बी ।।

तान प्रभु
१ कृष्णाची प्रभु
१ गोविंद प्रभुलंग
१ अताजी प्रभु
१ साबाजी प्रभु त्याची अवलाद नाही

---

४

अवजी प्रभु याचे अवलाद सोनाजी त्याची अवलाद
१ वामनाजी
१ दुराजी
१ रामाजी संतांन नसे
१ दामाजी

---

४

पौ अवलाद दोन २ बेटे कृष्णा जीचा बेटा बावाजी त्याचा बेटा गोदा- वा त्याचा कृष्णाजी हाली आहे-
१

पौ अवलाद भाई ३
अताजीचे बेटे ३
१ रंगाजी
१ रघुजी
——
२
याची अवलाद
हली असे रंगाजी बेटा
मल्हारजी
१

१ अवलाद
वामनाजी
१ अयाजी
१ निमजी
——
२
याची अवलाद
अयाजीचा बेटा
निमजी हयात असे
१ दामाजी हयात असे
१ मुराजीची अवलाद
सुदरजी याचे पुत्र
१ केशव
१ चिमणाजी
१ विठल
——
३
१ अवलाद सुद-
रजी
१ रंगाजी
——
२

हे वजेची हकीकत असे अण याणे अयाजी वामन महमद सफी बरार जाऊन टक्याचे बले फर्मान काढिला असे म्हणून मालुम होत असे साहेब तल कोकणचे हकीम हर-येक जमीदार म्हणबीत असेल त्याणे साहेबाचे बदगीस जाली हकीकत जाहीर करून साहे-बाचे विद्यमाने वतनाचा अमल करावा त्यास अयाजी मार महमद सफी याजकडे नोकरीस होता त्याचे वकिलाने तर्तूद करून फर्मान आणिला आसोन साहेबाचे बदगीस जाहीर केला नाही सबब त्यासी पुरसीस असे की तुम्ही वतन खाता हे पुरातन तुमचे आहे की काय त्यास ते जाब देतील की आमचे पुरातन असे मग साहेबी त्याचा कतबा घ्यावा त्याव-रून साहेब कीफायेत असे अगर ते म्हणतील की आम्हास आपण दिल्हेवर त्याचा कागद काढवणार साहेब धनी आहेत त्याचा कागद त्यासी केला असिला तर अवलाद असता अफ-लादेस पोहचत नाही यावरून तो कागद तकलिदी असे अगर हुजूर फर्मान घेतला त्यात दाखला कैसा असेल तो खातिरेस आणऊन यावर जर हा दाखला नसोन फर्मान घेतला असला

तर साहेबाची गुन्हेगारी असे की गैर वाका मालुम करून फर्मान घेतला असे अर्सा साहेब कि (फा)येत असे आपण बंदा साहेबाचा असे चहूंकडे मीलस साहेबाचा होईल की गेले वतन दूध पाणी याचा निवाडा करून बंदीयास सर्फराज केले हा नक्षा नामोस दिन दूनियात मल्कि साहेबाचा जाला असे ऐसा साहेबाचा होईल आपण बंदा पावख असे वतन साहेबाचे असे बदीयाची हकीकत जे होती ते साहेबाचे कदमा नजिक ठेविली असे साहेब धनी •माबाप असेत.

---

ले. ४२६ } {श. १५९० वैशाख शु. १२
{इ. १६६८ एप्रिल १३

श्री

मसुरुल अनाम राजश्री रायाजी भोसले हावलदार जंजिरे सिधुदुर्ग प्रति राजश्री
सिवाजी राजे सुा समान सितैन अलफ बो॰ रामचंद्र नीलकंठ यास
१ जंजिरे मजकुरीची सबनिसी साहेब मेहेरवान होऊन वतन दिल्ही आहे
यास इ॥ पैा पासून सालिन्या तैनाति होनु १०० सेंभरी पातशाही केले आहेती साल्मजकुरी सिरस्ता केला आहे तेणेप्रमाणे आदा करणे व यारेदी व कागदबाब हरनिसबति माजीप्रमाणे लिहिणियास देत जाणे माइले आपला मुतालिक जंजिरे मजकुरास पाठवितील त्याचे हाते सबनीसीचा कारभार घेत जाणे छ ११ माहे जिल्काद मोर्तब सुद

मर्या[3]
देयं विरा
जते

---

ले. ४२७ } {श. १५९२ मार्ग. शु. ८
{इ. १६७० नोव्हेंबर १०

श्री

तादलेस्वर साहेबु

महजर मिरासीपत्र श्री सके १५९२ साधारण नाव संवछरे मार्गेस्वर सुध ८ वार सुकुरवार ते दिवसीं हाजीर मजालेसी मौजे तादली ना टाकली तरफ राजणगाऊ पा जुनर श्री—याचे देउली बीहुजूर

---

१ हें पत्र अस्सल आहे कारण शेवटीं मर्यादेचा शिक्का आहे. परंतु या ठिकाणीं सवयीनें शिक्याची जागा सोडली आहे. २ अक्षर निघालें. ३ सीमा पदकोनी
४ अशाच मजकुराचें व तारखेचें एक मिरासीपत्र आहे. पण छापलें नाहीं.

मौजे मजकूर

बलुते

मुलाणा सेख नुरदी वलद सेख सेकु उमर वरसे ६० व सेख वलद सेख नुरदी याची उमर वरसे वीस
निा सुरी

मोर सुतार बिन तान सुतार उमर वरसे २५
निा किकरे

तुलवटा बिन जानवटा परीट अजहती मलवटा बिन दादवटा मिरासीदार मौजे मार
निा मोगरी

दऊ मेहतरी बिन रूप मेहतरी उमर वरसे तीस

दावल मेहतरी बिन परस मेहतरी उमर वरसे पंचवीस
निा

मोर पाटील मा। मौजे कोकनगाव पा— — —

जाऊ मेहतरी बिन अर्जे मेहतरी उमर वरसे ७५

खंड माहाला व नाग माहाला बिन जाम माहाला नाहावी उमर वरसे ७० याचे लेक दोग २
जैत माहाला जाम माहला
निा आरिसा

सेटियाजी बिन नागोजी सोनार उमर वरसे ८९
निा हातवडा

जाख दरणा बिन रेख दरणा गुरव उमर वरसे तीस व कुदरणा बिन रखदरणा उमर वरसे वसि
निा मादल

माहार विर्तिकार मिरासीदार

सिऊ नाक बिन गुणनाक उमर वरसे ५० व कु नाक बिन गुण नाक उम वरसे पचेतालीस

चादनाक बिन मालनाक उमर वरसे ७५ पाऊणेस निा इला दोर

गिरजोजी व कृष्णाजी मा। मौजे चाडगाऊ पा। कडेवली

+ ।।। सिवाजी सुखदेव कुलकर्णी मौजे मा।

मका बिन सता माग उमर वरसे २०
निा मागभाली

सत सालवा बिन दाद सालिवा कुभार
निा चाक

कुलवाडिये मिरासीदार

देउजी बिन तुवाजी कवाडे
उमर वरसे ७५

गोदजी बिन भिकाजी
डोहिरे उमर वरसे तीस
संताजी बिन तुकोजी निगडे
उमर वरसे ६२
दुबाजी बिन जाउजी बोस
( भोस )उमर वरसे ७०

धारोजी बिन बहिरजी
नलगे उमर वरसे ११५
सलाबत खानाचे वेलेस
उपजला

बहिरजी बिन नरसोजी
मिल्हे उमर वरसे २७
सताविस

सटवा मेहेतरी बिन नाग
मेहतरी उमर वरसे २५

मोकदम समस्त मौजे घोडे
गाऊ पा। रासिन
बी॥ सखोजी तानदेऊ
जोसी व कुलकर्णी मौज मा।

कृष्णाजी बिन नागोजी
पायगुडे मोकदम मौजे

पा। पुणा
मादारे ता। नीरथडी

जानोजी बिन जैताजी
कवाडा उमर वरसे६०
साठी

मल गावडा बिन म्हाल
गावडा याची उमर वरसे ६०
देउजी गावडा बिन
म्हाल गावडा उमर वरसे
४० चालीस
खंडोजी बिन नारोजी बोस
उमर वरसे २०

मकाजी बिन कृष्णाजी चौ-
गुले उमर वरसे २२
नागोजी बिन रतनोजी
बोडका उमर वरसे ६०

तुबाजी बिन ताउजी खी-
(र)सागर मौजे मजकूर उमर-
वरसे३५
नाग मेहतरी बिन बहीर
मेहतरी तेली उम रवरसे ७०
नि॥ पाहार

कोंड माली बिन सत माली
जमबु उमर वरसे ३०
मोकदम व समस्त माले
देऊलगाऊ
बी॥ खडो सिवदेऊ कुलकर्णी
जोसी मौजे मा।

राजजी बिन कान्होजी बेट
मोकदम मौजे कतकवले तपे
बोडबारे

पिलाजी बिन बालोजी वेलाकर
मौजे टाकली ना॥ तादले ता॥
करडे पा॥ कूर उमर वरसे ४०

महैलाजी बिन हिरोजी
झागडे मौजे टाकली ना॥ तादले
ता॥ करडे पा॥ जुनर उमर वरसे ८०

बाजी बिन महरजी रोडे मौजे
टाकली नॉ तादले ता॥ कडे पा॥
जुनर उमर वरसे ३० तीस

येमाजी बिन माहादजी
सागले चौगुले मौजे माडोगण
पुराटियाचे पा॥ कडे समत
जुनर उमर ४५

सूर्याजी बिन दामाजी राडे
मौजे देऊलगाव कोठारी पा॥
चाभारगोंदे उमर वरसे ८०
तुकोजी मोकदम व समता मौजे
मानगाऊ पा॥ कडे

गुजाजी मोकदम मौजे सुरगाऊ
प्रा॥ मा॥
बि॥ तान्हाजी अडदेव कुलकरर्णी
मौजे मजकूर — — —

— — — — — —

--कुलकर्णी

येसाजी व जैतजी काळोजी व
साबाजी मोकदम मौजे कालगाव
पा॥ कडे
बी॥ साबाजी दामोधर
कुलकर्णी मौजे मा॥

मोकदम मौजे राजणगाव ता॥ मा॥र

तान्हाजी मोकदम मौजे कामठी
ता॥--ण गाव सा॥
— — — —
बि॥ त्रिंबकजी विठल कुलकर्णी मौजे
मजकूर

रायाजी आढाऊ मोकदम हाजीर नाही

आबाजी मोकदम मौजे कोरेगव्हाण
ता॥ राजणगाऊ १

होन पाटील मोकदम
निमे व समस्त दाहीजन
मौजे बु॥ गा॥

बि॥ गोविद बोपदेऊ
कुलकर्णी मौजे मा॥र
मोकदम व समस्त मौजे
निबवी पा॥ कडे
बि॥ मल्हारी सीवदेऊ
व कुलकर्णी मौजे मा॥

बि॥ सकराजी मेगदेऊ जोसी
कुलकर्णी मौजे मा॥र
कृष्णाजी व मानकोजी मोकदम
मौजे ढो-ता॥ राजनगाऊ
गोविद रतनाकर
कुलकर्णी जोसी मौजे मजकूर

सुा इहिदे सबैन अलफ सन हजार १०८० या विदमान मिरासी पत्र खरीदी मौजे तादली नाा टाकली ताा राजणगाऊ साा जुनर ये गावीचे कुलकर्ण व जोतीस निलो सोनदेऊ व आबाजी सोनदेऊ यासी सिउजी बिन जैत पाटील व माण-कोजी बिन वेवोजी बोस (भोस) मोकदम मौजे तांदले नाा टाकली ताा राजणगाउ पाा जुनर याणे व समस्त बापभाऊ व बाराहि बलुते व मिरासीदार कुणबी यानी लेहोनु मिरासी पत्र दिधले मर्ा आपला मिरासीदार कुलकरणी व जोसी कुमाजी होता त्याचे घर कुल बुडाले यावरी आम्ही गावकरी मुतालिक ठेउनु गावकुलकरण चालवीत असे व भटपण तरी आम्ही गावलोक देखील लग्न मुहूर्त घेत असो. या उपरी आम्ही व समस्त बापभाऊ व बाराहि बलुते मिरासीदार कुणबी ऐसे मिलोन विचार केला की कुलकरण व जोसीपण हे विकावे आणि टका भरी घ्यावा आणि आपल्यास मिरासीभाऊ करावा ऐसा आम्हा आवघीयानी तह केला मग आम्ही तुम्हास मुकाम रायेरीस येउनु आपखुसीने मौजे तादली नाा टाकली तरफ राजणगाऊ पाा जुन्नर येथील कुलकरण व जोतीस व घरवाडा ऐसे तुम्हास विकले असे तुम्हास मिरासी करून दिधले असे सुखे लेकराचे लेकरी खाउनु सुखे असणे आप-ल्यास आम्ही मिरासी भाऊ तुम्हास केले असे देसमुखाचे सिके व देसपाडियाचे दस्कत करून देउनु जरी कोण्ही मिरासीदार कुलकरणासी अगर जोतिसास उभा राहिला तरी आम्ही मोकदम व बाराहि बलुते व समस्त बापभाऊ व मिरासीदार कुणबी ऐसे त्यास निवारून अगर आणीक हर कोण्ही कुलकरणास व जोसीपणास हरकती करील त्यासहि आपण वारून तुम्हास कोण्हेची निसबति नाही तुम्ही सुखे लेकराचे लेकरी खाउनु सुखे कुलकरण व जोतीस खाऊन जो वाडा दिधला आहे तेथे नादोन सुखे असणे राजणगाव तर्फेच्या गावगणाचे मोकदमाचे गोही नागर करून देऊन वाडा कुमभटाचा घर आहे ते बाधोनू सुखे लेकराचे लेकरी नादणे व मला बागाईत पाटा खाले बिघे ०१० आहे तेहि तुम्हास मिरासी करून दिल्हे असे सुखे राहोन खाणे जो गावाच्या बागाईतास महसूल पडेल तो देत जाणे तुम्हा पासुनु होनु १५० दीडसे कुलकरणाचे व जोसीपणाचे घेतले असे ते आण तुम्हास कुलकरण व जोसीपण व घरवाडा व मला मिरासी करून दिधले असे सुखे लेकराचे लेकरी खाउनु असणे यासी जरी आम्ही बेइमान करून तरी श्री-देव आमचे खराब करील हा मिरासी पत्र महजर सही

---

ले. ४२८ } { श. १६१४ माघ शु. १३<br>इ. १६९३ फेब्रु. ८

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १९ अंगिरानाम संवछरे माघ शुध त्रयोदसी सौम्य-वासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यासी आज्ञा केली ऐसी जे विनातिपत्र पुरवणी

पाठविली ते प्रविस्ट जाली ता। सोनवले प्रा। भिवडी येथील देसमुखी आपल्या वडिलानी भोगवटियानसी खादली आहे राजश्री निलोपंताच्या आजियाचे वेळेस मुतालिक ठेविला होता तोच बलाऊन देसमुखी करावयास लागला आमचे तर्फेचे १४ खून केले आहेत तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामींचे वेलेस रदबदल केली होती त्यास तुमचे वतन तुम्हांस देऊ म्हणोन मान्य केले परंतु आजिपर्यंत तैसचि गोस्ट राहिली प्रस्तुत मोगलाचे ठाणे तेथे मजबूद आहे काही प्रात्पवा विषये नाही परंतु वाडिलाचे वतन आपणास द्यावया आज्ञा केली पाहिजे. म्हणोन लिहिले त्यावरून स्वामी कृपाळू होऊन ता। सोनवले प्रात भिवडी येथील देसमुखीचें वतन तुम्हास आजरामऱ्हामत करून दिल्हे असे वतनाची सनद निराली देशाधिकारी याचे नावे सादर केली असे व राजश्री शंकराजी पडित सचीव यासहि आज्ञापत्र पाठविले आहे ते पावते करणे आणि ता। मारचे देसमुखीचे वतन पुत्रपौत्री आनभवीत जाणे जाणिजे *बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा

‡मर्या
देयं विरा
जते

---

ले. ४२९ } {श. १६१५ ज्येष्ठ व १३
इ. १६९३ जून २१

श्री

राजारामस्य

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्सरे ज्येष्ठ बहुल त्रयोदसी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी सौभाग्यवति जानकीबाई यासि

†श्री॥ राजाराम
नरपति हर्षनिदान
मोरेश्वर सुत नीलकं
ठ मुख्य प्रधान

§श्रीलक्ष्मि
नृहरि प्रीते
मुद्रा नीराजी
जन्मनः राजा
राम प्रतिनिधि
प्रल्हादस्य
विराजते

दिल्हे वृत्तिपत्र ऐसे जे तुमचे भर्तार राजश्री रामचंद्र पंडित आमात्य याही स्वामीच्या राज्यानिमित्य बहुत श्रम करून राज्याची अभिवृधिता केली आणि कीर्ति संपादिली याकारिता मानुल्वेरी स्वामि संतोषी आहेती व तुमचे ऊर्जित करून चालवणे स्वामिस बहुत अगत्य यास्तव तुम्हांस नूतन इनाम मौजे मुरवाड ता। संगमेश्वर देह १ येक कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी निधि-

---

* येथून अक्षर निराळें बहुधा छत्रपतींचें ‡ सीमा षट्कोनी. † आकार लंबवर्तुळ.
§ आकार अष्टकोनी

निक्षेपजलतरुपाषाण झाडझाडोरा पडले पान सहित गांव इनाम दिल्हा असे हा गाव तुम्ही आपले स्वाधीन करून तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप असणे

*[निदेश समक्ष

सां संमत — [1]मर्या

सचीव — देयं विरा

तेरीख २६ — माहे सौवाल — जते

सौवाल सुा आर्बा तिसैन

बार सुद — सुरु सुद बार

---

ले. ४३० — {श. १६१५ ज्येष्ठ व. १३ / इ. १६९३ जून २१}

श्री.




स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्सरे जेष्ट बहुल त्रयोदसी सौम्य वासरे क्षत्रीयकुलावतंस श्रीराजाराम छत्रपति याणी चिरंजीव ठकुबाई यास दिल्हे वृत्तिपत्र येसे जे तुमचे बाप राजश्री रामचंद्र नीलकंठ अमात्य याही स्वामीची सेवा बहुत एकनिष्ठपणे केली आहे आणि स्वामिच्या राज्यानिमित्य बहुत श्रम करून राज्याची अभिवृ-धीता केली त्यावरून स्वामी तुम्हा-वरी बहुत संतोषी होऊन तुम्हास दुदभातानिमित्य नूतन इनाम मौजे कडवै ताा संगमेश्वर देह १ येक कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी जलतरुपाषाण झाडझाडोरा निधिनिक्षेप पडले पानसहित गाव

---

* अक्षर निराळें [1] आकार बहुदळी [2] मुद्रा व सीमा ले. ४२९ प्रो.

इनाम दिल्हा असे हा गाव तुम्ही आपले स्वाधीन करून घेऊन दुद्दभात भोजन करून सुख-रूप पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम अनभऊन असणे* निदेश समक्ष

सां संमत
सचीव

तेरीख २६ माहे सौवाल
सौवाल सुा अर्बा तिसैन
बार सुद सुरु सुद बार

---

ले. ४३१ } {श.१६१५ ज्येष्ठ व. १३
इ. १६९३ जून २१

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्सरे जेष्ठ बहुल त्रयोदसी सौम्य वासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणि हवालदार व कारकून वर्तमान व भावी ताा संगमेश्वर यांसि अज्ञा केली ऐसी जे राजश्री रामचंद्र नीलकंठ +मात्य यानी स्वामिची सेवा बहुत येकानिष्ठपणे केली आहे व या राज्याकारणे बहुत श्रम करून राज्याची अभिवृधीता पावविली आहे यानिमित्य स्वामि मानुलेवरी बहुत संतोशी होऊन याचा स्त्रीस व कन्येस नूतन इनाम गाव दोन दिल्हे ताा मार पैकी

सौभाग्यवती जानकीबाईस इनाम चिरंजीव ठकुबाईस दुदभातानिमित्य इनाम
मौजे मुरबाड देह १ मौजे कबवई १

येकून देह २ दोनी कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी निधिनिक्षेप जलतरु पाषाण झाडझाडोरा पडले पान सहित गाव इनाम दिल्हे आहेत हे दोन्ही गाव उभयेताचे स्वाधीन करून यास व याचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने इनाम चालवणे वर्ष प्रतिवर्षी नवीन पत्राची अपेक्षा न करणे पत्राची प्रति लिहून घेऊन असल पत्र याजपासि परतोन देणे जाणीजे ‡निदेश समक्ष×

सां संमत
सचीव

तेरीख २६ माहे सौवाल
सौवाल सुा अर्बा तिसैन
बार सुद सुरू सुद बार

---

* अक्षर वेगळें +हस्तदोषानें मागील ‘अ’ राहिला आहे. ‡अक्षर वेगळें व सीमाबहदली. ×मुद्रा व सीमा ले. ४२९ प्रो.

ले.४३२ {श.१६१८ आषाढ शु. १३
इ. १६९६ जुलै २}

श्री

राजश्री कासी रगनाथ सभासद नामजाद सीमहाल सुभा प्रात राजापूर गोसावी यासि

अखडित लक्षुमी आलकृत राजमान्य—सेवक रामचद्र नीलकठ आमात्य नमस्कार सुहुर सन सबा तिसैन अलफ राजश्री—स्वामीचे आज्ञापत्र राजश्री रामाजी अनंत मुख्य देशाधिकारी सरसुभा—यासी सादर आहे तेथे आज्ञा की राजश्री रामचद्र नीलकंठ याणी विनतिपत्र पाठविले तेथे लिहिले की आपणास निरोपद्रव वौशपरंपरेने चाले ऐसे वतन मेहरवान होऊन दिल्हे पाहिजे ह्मणऊन त्याजवरून वतनाचे विसी मनास आणितां मामले प्रभावली येथील आठरा माहालींची सरदेशमुखी रंगोवा नाईक याचे वडिलास आदलशाई पातशाहा होता त्याणे फर्मान करून दिल्हा आहे त्यामध्ये ता खारापाटण हा माहाल आहे परंतु खारापाटणास मुसलमान मुकासी होता त्याणे रगोबा नाईकाचे वडिलांस भोगवटा चालो दिल्हा नाही त्या आलिकडे राजश्री कैलासवासी स्वामीस हा देश हस्तगत जाहला त्या कालापासून हा काल पावेतो रगोबा नाईक याचे वडिलास अथवा रगोबा नाईक यास भोगवटा जाहला नाही वतनदारास वतनाचा भोगवटा बहुत दिवस तुटला ह्मणिजे त्या वतनास वतनदारास समध नाही ऐसे आहे या करिता या वतनास रगोबा नाइकास अर्थाअर्थी समध नाही ऐसा निर्वाह केला आणि राजश्री रामचद्र नीलकठ भारद्वाज गोत्री हे स्वामीचे पुरातन सेवक स्वामीचे राज्य वृद्धीते पावावे ऐसाच हेत धरून अतःकर्णपूर्वक स्वामीसेवा करीत आहेत राजवृद्धीस कारण हे सेवक ऐसे जाणोन यांजवरी कृपाळू होऊन तपे मजकुरचे सरदेशमुखी वतन यांस अजरामराहमत करून दिल्हे असे हे वतन यांचे स्वाधीन करून या वतनास इनाम गाव मौजे पोवुरले देह १ व मौजे कोकिसरे देह १ येकून देह देह २ कुलबाब कुलकानु देखील हाली पटी व पेस्तरपटी जलतरु पाशाण झाडझाडोरा पाडिले पान सहित खेरीज हकदार व इनामदार करून गाव चतुःसीमा भूमी पूर्व मर्यादेप्रमाणे हकलवाजिमा व इसापति पानमान पटिपछोडी यासी याचे पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने सुरक्षित चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राची अपेक्षा न करणे या पत्राची प्रति लिहून घेऊन मुख्यपत्र यापाशी परतोन देणे यासी हिंदु कोण्ही कथला करील त्यास गोहत्या ब्रह्महत्या केल्याचे पातक लागेल मुसलमान कोण्ही इस्कील करील त्यास सोर मारिल्याचे पातक लागेल ऐसी पातके जाणोन यासी वतन सुखरूप चालवणे ह्मणऊन आज्ञा आहे ऐसीयासी तर्फ मजकूर हा माहाल प्रस्तुत तुम्हाकडे कमाविसीस आहे या करिता तुम्हास लिहिले असे तरी तपे मजकूचे वतन सरदेशमुखी राजश्री रामचद्र नीलकठ भारद्वाज गोत्री याचे स्वाधीन करणे आणि सरदेशमुखीचा कार्यभाग दडक प्रमाणे मारखुलेपासून घेत जाणे या वतनास इनाम गाव व हकलवाजिमा पटीपछोडी दिवाण दस्त खड वगैरे महसूल देखील आकार होईल ते बेरिजेस खेरीज दस्त लवाजिमा

इनाम देह२
मौजे पो ( बु ) रले
१

मौजे कोकिसरे
१

हकलवाजिमा पटी पछोडी दिवाण दस्त
दों खड व गैर महसूल आकार होईल
त्यास +रयत निसबतीने कलम २

खेरीज दस्ती बाब लवाजिमा मोईन

१ कुणबा गाव असेल त्यास
सालिना लोणच्याचा जिनस
उझे निम -॥-
१ कुभाराच्या आवियास मडके
येक
लाकडाचे भारे सालिना
दर गावास पांच ५
राहाणूक दर गावास
सालिना पंधरवडा
गुरव येक माहार येक
१ १

येकून दोन आरा कलम
येक १

इरले दर गावास सालिना येक
१
जेव दर गावास सालिना
कलम निम -॥-
पारधीस
१ डुकरास सिसाल येक
१ साबरास सात येक
१ वरकड पारधीस
भाकसी येक
———
३

येकून तीन आरा कलम
येक १

येकून सात बाब आरा कलम १

येणे प्रमाणे इनाम गाव दोन व हक लवाजिमा पटी पछोडी दिवाण दस्तास रयेत निसबतीने दरसदे कलम दोन व खेरीज दस्तीबाब लवाजिमा कलम येक व पान मान आधी सरदेसमुखास त्या उपर पूर्वदंडक वरकड वतनदारास येणेप्रमाणे चालवणे या पत्राची प्रति लिहून घेऊन असल पत्र माारनुलेस भोगवटियास परतोन देणे §छ १२ जिल्हेज
निदेश समक्ष

श्रीरामचं
द्र चरणीं नीळ
कंठ सोनदे
व शीरण
बार

++
++समु
ल्लेखति

सुरु सुद बार*

---

+ दुसऱ्या दोन पत्रांत "त्यास दरसदे रयतनिसबतीनें" असे आहे.

§ येथून अक्षर निराळें.

* या प्रमाणेंच आणखी दोन पत्रें आहेत. एक खुद्द **रामचंद्र नीळकंठांनीं** '**रामाजी अनंत** देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सरसुभा प्रांत **राजापूर** " यास लिहिलें असून त्यांत आरंभीं ' स्वामीचें आज्ञापत्र तुम्हांस सादर आहे वगैरे' म्हटलें आहे. दुसरें पत्र **रामाजी अनंत** यांनीं " **लक्ष्मण रंगनाथ** हवालदार व कारकून वर्तमान व भावी तो **खारेपाटण** " यांस लिहिलें आहे. त्यांत आपणांस पंत आमात्य यांचें आज्ञापत्र आहे असें आरंभीं म्हटलें आहे पण स्वामीच्या आज्ञापत्राचा उल्लेख नाहीं.

ले ४३३ } { श. १६१८ श्रावण शु० १ इ. १६९६ जुलै १९

श्री

‡ श्री
द्वितीयेंदुरिवा
त्यर्थं वर्धमाना दि
नेदिने अनंतसू
नो रामस्य मुद्राभ
द्रां विराजते

अज सरसुभा राजश्री रामाजी अनंत सरसुभेदार व कारकून सुभा प्रा राजापूर तहा खोत कुलकर्णी व गावकर रयानी मौजे कोकीसरे ताा खारेपाटण सुहुर सन सबा तिसैन व अलफ राजश्री रामचंद्र नीलकंठ भारद्वाज गोत्री यावरी राजश्री—छत्रपति स्वामी कृपालु होऊन तपे मजकूरचे सरदेशमुखी वतन यासी अजरामराहमत करून दिल्हे असे हे वतन याचे स्वाधीन करून या वतनास इनामगाव मौजे पोबुरले देह १ व मौजे कोकीसरे देह १ येकून देह दो कुलबाब कुलकानु देखील हाली पटी व पेस्तरपटी जलतरुपाषाण झाडझाडोरा पडले पान सहित खेरीज हकदार व इनाम दार करून गाव चतुःसीमा भूमि पूर्वमर्यादेप्रा व हकलवाजिमा व इसापत पटी पछोडि यांसी याचे पुत्र पौत्रादि वौशपरंपेरेने सुरक्षित चालवणे म्हणून राजश्री—छत्रपति स्वामीचे आज्ञापत्र त्याप्रा राजश्री—पंतस्वामीचे आज्ञापत्र सादर जाहले त्यावरून मौजे मजकूर इनामगाऊ कुलबाब कुल कानु देखील हालीपटी पेस्तरपटी जलतरुपाशाण झाडझाडोरा पडले पान सहित खाो हकदार व इनामदार †वजा करून मानिलेचे दुबाले गाव केला असे तरी साल मारपासून वसूल मानुलेकडे देत जाणे छ २९ जिल्हेज मोर्तब सूद।

वीलसति
लेखना व-
धि मुद्रा

———

‡ मुद्रा व सीमा यांचे आकार वाटोळे.

† या प्रमाणें दुसरें पत्र " मिरासी व माहाजन व कुलकर्णी मौजे पोभुरले ताा खारापाटण " यास आहे. त्यांतहि " वजा " ही अक्षरे शोधवजा वर घातलेलीं आहेत.

ल. ४३४ } { श. १६१९ अश्विन शु. ३
{ इ. १६९७ सप्टें. ८

श्री.

*राजश्री सुभेदार व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रात मावले राजगड गोसावी यासि अखडित लक्षुमी आल्कृत राजमान्ये-सेवक शकराजी नारायेण सचीव नमस्कार सुा समान तिसैन अलफ राजश्री रामचद्र नील्कठ भारद्वाज गोत्री याणी हुजूर विदित केले की मौजे केलवाडे ताा खेडेबारे येथे इनाम जमीन जिराईत चावर १येक इनाम हरि गोविद कोडलकर आपला मातुलवंश याचे नावे कारकीर्द दर कारकीर्द भोगवटा चालत होता हरि गोविद मृत्य पावलियावरी आपले आजे सोनाजी नारायेण याणी कारकिर्दी रा दादाजी कोडदेउ सदरहु इनाम भोगवटा अनुभविला कारकीर्दी कैलासवासी स्वामी आपले बाप निलो सोनदेउ यानी भोगवटा कितेक दिवस अनभविला दरम्यान राजश्री कैला सवासी स्वामींनी देशामधे बटाई केली ते प्रसगी कुल इनाम अमानत केले होते त्या उपरी कैलासवासी राजश्री सभाजी राजे याचे कारकीर्दीस इनाम आपण भोगवटा अनभविला आहे मध्ये मोगलाचे राजकारण जाहले त्याप्रसगी विलायेत खराब पडिली या करिता भोगवटा राहिला हाली राजश्री-छेत्रपति स्वामीने शत्रु पराभवाते पाऊन राज्य सुरक्षित केले देश वसाहत केला वतनदाराचे व इनामदाराचे इनाम दुमाले केले तरी आपलाही इनाम चावर आपले दुमाले करून सनद सादर केली पाहिजे म्हणून विदित केले व दस्तमली हरि गोविद याचे नावे इनाम चावर येक दाखल आहे त्याचा मातृवंश राजश्री-रामचद्र नीलकठ व त्याचे वडील याणी पूर्वीपासून भोगवटा अनुभविला हाली इनाम जिराईत जमीन चावर विसापाडाचे विघियाचे दर थल चावर१येक कुलबाब कुलकानु देखील हाली पटी व पेस्तरपटी खेरीज हकदार राजश्री रामचद्र नीलकठ याचे दुमाला केला असे देह याचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरा भोगवटा अनुभउनु राजश्री छेत्रपति स्वामीस कल्याण चिंतितील तुम्ही सदरहु चावर इनाम याचे दुमाले करणे दर हरसाल ताजा सनदेचा उजूर न करणे तालिक लेहून घेऊन असल भोगवटियासि मारनूले पासी देणे १छ रबिलोवल संदेश समक्ष

श्री
शंकराजी
नारायण

पत्रा
वधि रयं
भाति

बार सुरु सुद बार

बार

बार

---

* ह्याच तारखेचें व मजकुराचें एक पत्र शंकराजी नारायण यानें खेडेबारेच्या देशमुखांना लिहिलें आहे.

१ अक्षर निराळें. नेहमीं ' निदेश ' असतें येथें " संदेश आहे " मुद्रा व सीमा बहुदळी

ले. ४३५ } {श.१६३० आषाढ व. ६ / इ. १७०८ जून २८

श्री

*स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ३५ सर्वधारी संवत्सरे आषाढ बहुल षष्टी इंदुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा **शिवछत्रपति** याणी समस्त राजकार्ये धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री **नारो** पंडित यासी आज्ञा केली ऐसि जे तुम्ही स्वामीचे कदीम कार्याचे सेवक आहा तुमचे सर्व प्रकारें चालवणे हे स्वामीस अगत्य व आवश्यक याकरिता तुम्हास जंजिरे **विजयेदुर्गी** राहावयाची आज्ञा केली आहे तरी तुम्ही आपल्या समुदायानसी जाऊन पहिले **विजयेदुर्गी** होतेस तैसे तेथे राहणे तुम्हास पहिले दोनी गाव होते ते करार करून द्यावयाविषी राजश्री **रामचंद्र**पंडित अमात्य यास आज्ञापत्र सादर केले आहे ते दोन्ही गाव तुम्हाकडे चालवितील तुम्ही दुसरा मनात न आणतां **विजयेदुर्गी** जाऊन राहाणे स्वामी तुमचे चालवायास अंतर करणार नाहीत. +बहुत काये लिहिणे

¶ मर्या
देयं विरा
जते

---

ले. ४३६ } { श. ? / इ. ?

श्रीरामवरद

तीर्थरूप राजश्री ______________ दादा वडिलांचे सेवेसी

अपत्ये **सिवरामाने** चरणावर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना उपरी येथील क्षेम ता। वैशाख वद्यपर्यंत सुखरूप असो विशेष माझे वडिली पाळणपोषण केलें वडिली मला त्या मार्गात ठेविले होते ते कालवशेकडून उभयेताची दर्शने जाहाली आम्हास माहाराजानी **पाराशरच्या** माहाराजांच्या हाती दिल्हे त्याजबराबर **कोलापुरास** आलो वडिलांचे आमचे दर्शन जाले माझी तो वडिलांच्या पायासी निष्टा परंतु सागणीवागणीमुले परस्परे विकल्प वाढला त्याजवरून वडिलीं मजपासून क्रिया घेतली की आपण तीर्थरूप मिलेला मला वडिलाच्या पायाविना दुसरा विच्यार असेल तर श्री-रघुवीर साक्ष माझे वडिली चालवावे नावारूपास आणावे पुत्रत्वाप्रमाणे चालवावे थोर पदीस चढवावे हे वडिलास विहित असे कितेक मनुष्ये वडिलापासी गोष्टी सांगतील त्या वडिली न ऐकाव्या आम्ही ऐकणार नाही लिहिल्या पत्राप्रमाणे वडिलीं अतर देऊ नये आम्ही अतर कदा पडू देणार नाही आम्ही वडिलाचे वंशपरंपरेने चालऊ वडिलाचे कुटुंब जितके असेल तितक्याचे

---

*याच तारखेचें व लेखकाचें एक पत्र रामचंद्र निलकंठ अमात्य याचे नावचें असून नारो पंडितास ' विजयेदुर्गी राहो देणे' म्हणून आहे. +अक्षर निराळें. ¶ सीमा षट्कोनी.

चालऊ हा कागद लेहून दिल्हा सही सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना लक्षशतनीं प्रसग वंशपरंपरेने सत्ये चालवावे हे विज्ञप्ती

---

ले. ४३७ } { श. ?
इ. ?

* श्रीसंकर प्रसन

राजमानं राजश्री भगवतराव पंडित यास आज्ञा केली ऐसी जे तुम्हाकडे रा रामाजीपंत व इटल कृष्ण पाटील आहेत हे जे सागतील ते स्वामीचे वचन जानो त्याप्रमाने मान करून स्वामीच्या दरसनास मजल दर मजल येने नारिंग व केला पाठिवला आहेत ते घेन बहुत लिहिन सुज्ञ असा

---

## सातारा शिर्के.

श्री

ले० ४३८ } { शाक १६४० कार्तिक व. १
इ० १७१८ नोव्हें ८

*श्री

वार्धिष्णु र्विक्रमो
र्वि + + + + + +
वामनी शं + मुसूनो
रसौ मुद्रा शिवरा
जस्य राजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्छरे कार्तिक बहुल प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपति स्वामी याणी राजश्री पिलाजीराव बिन गणोजीराव सिर्के देशमुख मामले दाभोल यासी दिल्हे वतनपत्र यैसे जे तुमचे चुलते राजश्री

१। २¶

देवजी सिर्के स्वामीसंनिध किले साताराचे मुकामी येऊन विदित केलें कीं दाभोलची देशमुखी देहाये दुतर्फा येक इमजाबाद उर्फ गडे विलायेत व येक जाफराबाद उर्फ खेड विलायेत येकून सातसे वीस देह व कसब व बंदर दाभोल मामले मैमून मुस्तफाबाद येथील देसमुखी वतन पूर्वी ब्राह्मणाचें त्यास या ब्राह्मणापासून अगा रजाचे कारकीर्दीस आदलशाहा पादशाहासी हरामखोरी जाली याबद्दल पादशाहानी ते देशमुख ब्राह्मण कबिल्यासमेत जहाजावरी चढऊन बारा आरबास पाठऊन मुसलमान केले देशमुखी वतन अमानत केले ते कितेक वर्शे अमानत असतां शृंघमपुरी रा सूर्याजीराजे सुर्वे प्रभानवली-

*हें संबंध पत्र शाहु छत्रपतींच्या हातचें आहे. १। मुद्रा बदामी. ¶ मुद्रा अष्टकोनी.

कर होते त्याणी आपली लेंकी रा। पिलाजीराऊ सिर्के यांस देऊन सोईरक केली तेव्हा पातशाहांस विज्यापुरीं अर्ज पोहचून पिलाजरीव यास दाभोल मामल्याची देसमुखी मागितली पादशहा मेहरवान होऊन देशमुखी वतन मऱ्हामत केले वतनाचा भोगवटा व्हावा तों कैलासवासी छत्रपति थोरले स्वामीस तल्कोंकण कबज जाले त्या प्रसंगी वतनाचा भोगवटा न जाला त्याउपरि कितेक मुदत जाल्यावरी पिलाजीराव यांसी राजश्री स्वामीनी सोइरीक केली अपली लेंकी राजकुंवरबाई गणोजीरायास दिल्ही पिलाजीरायांची लेकी जिऊबाई राजश्री राजे यांस केली पिलाजीरायांवरी कृपा करून चाल्वीत होते येसे अस्तां लखम सांवत सरदेसाई पा। कुडाल भीमगड फोंडे प्रांते फिसाहत केली कोंकण वसाहत न व्हे यैसे जाले याकारितां राजश्री स्वामीनी पिलाजीरायांस आज्ञा करून लखम सांवताकडे पाठविले ते जाऊनु त्यास भेटोन कितेक प्रकारें त्यासी बोलोन त्याचा शक तोडून अणभाश क्रिया देऊनु लखम सांवतास राजश्रीचे भेटीस अणिलें महाडचे मुकामी भेटी केली लखम सावताचा तह करून त्यांस त्याचे वतनावरी ठेविले पिलाजीरायानी अर्ज केला जे उर्जित स्वामी करितात तरी अक्षये उर्जित करावें मामले दाभोल्चे देशमुखीचें वतन अदलशाहानी आपणास मऱ्हामत केले आहे त्याचा भोगवटा जाला नाहीं तें वतन अपलें अपणास देउनु चाल्वावे त्यावरून राजश्री स्वामीने आज्ञा केली कीं आपल्या राज्यांत वतनें द्यावयाचा दंडक नाहीं परंतु तुम्ही स्वामी कार्ये केले व सोइरीकहि तुम्हांसी जाली तरी चिरंजीव राजकुंवरबाईस पुत्र होईल तेव्हां हे देशमुखी वतन अपण देऊनु ते आज्ञा मान्य करून उमेदवार राहिले त्याउपरि राजश्री स्वामी राज्याधिकारी जाले तेव्हां तो प्रसंग करावा तरी राजकुंवरबाईस पुत्र जाला नव्हता म्हणून प्रसंग न केला यानंतर राजश्री स्वामी राज्याधिकारी जाले तांम्राचे दाटीचे प्रसंगे कर्नाटकांत चंजी प्रांते गेले तिकडे तांम्राच्या फौजा झुलपुकारखान जाऊन चंजीस वेढा घातला तेव्हा राजकारण करून राजश्री स्वामी चंजीतून निघोन वेलुरास गेले त्या वेलेस गणोजीराव मोगलाचे चाकर अस्तां राजश्री स्वामीस रात्रीचे अरणीस पाठविले व सौभाग्यवति ताराबाई व राजसबाई राजकुवरसहित चंजीऊन काढून अरणीस पाठविली या सेवेमुले राजश्री संतोशी होऊनु अक्षये वतन द्यावयास उदित होऊनु काये पाहिजे ते मागा यैसी आज्ञा केली तेव्हां गणोजी राजे याणी विज्ञाप्ती प्रविष्ट केली जे दाभोल्ची देसमुखी अदलशाहानी अमानत केली होती ते अपले बाप पिलाजीरायांस मेहेरबान होऊनु दिल्ही परंतु भोगवटा न जाला त्या वतनावरी कोण्ही वतनदार नव्हता म्हणोन चंजीचे मुकामी राजश्री खंडो बलाल चिटनवीस यांस स्वामीनी कृपाळू होऊनु दिल्ही आहे यैशास राजश्री थोरले स्वामीनी अपणास अंदण देऊ यैसे अभये वचन दिल्हे त्यांचे वचनाप्रमाणें आपणास पुत्र जाला आहे पिलाजीराव नाव ठेविले असे तरी तें वतन अपणास द्यावे वाडिलांचे अभये वचन सत्य करावें हेच अपणास मागणें आहे त्यावरून राज-

श्रीनीं खंडो बलाल यांचे समाधान करून दुसरे वतन देऊं केले आणि दाभोलचे देखमुखीचें वतन गणोजी राजे यांस दिल्हे पत्रे करून दिल्हीं राजश्री खंडो बलाल चिटनिवीस यांस पत्रें दिल्हीं होतीं तेहि घेऊन गणोजी राऊ यांजपासी दिल्ही वेळूराहून राजश्री स्वामी स्वार होऊन स्वराज्यास स्वदेशास आले रामोजी सिर्के बिन कान्होजी सिर्के गणोजी रायांचे पुतणे यांजपासी वतनाची पत्रें देऊनु इकडे पाठविले इकडे आलियावरि रामोजी सिर्के यांणी वतन चालवावयाबदल ताकीद पत्रें मागितली ती राजश्री स्वामींनी देविलीं त्या पत्रांत अपलें नांव घालून राजपत्रें घेतली आणि वतनाची कमावीस करू लागले अपणास वतनास दखल होउ देतनासे जाले त्याचा आमचा कथला होऊ लागला, चिरंजीव पिलाजीराऊ कर्नाटकांत राहिले गणोजीराऊ निवर्तले ऐसे असतां कितेक दिवसी रामोजी सिर्केहि भांडणी पडले त्यांचे भाऊ विठोजीराव व दौलतराऊ सिर्के व रामोजी सिर्के यांचे पुत्र कान्होजी व बाहिर्जी सिर्के हे वतन चलावुनु अनभव करितातीं अपणास काही देत नाहींत तरी स्वामींनी कारिना मनास अणून गणोजीरायाचे वतन त्यांचे पुत्रास अपण बंधू अपणास दिल्हे पाहिजे म्हणून विदित केले ते स्वामींनी अंतःकर्णास अणून याची व त्यांची मनसुफी करावी स्थल व गोत लाऊन यावें ऐसे करून विठोजीराव व दौलतराव व कान्होजी व बहिरजी सिर्के यांस हुजूर आणून गोतांत राजीनामे द्या म्हटले व स्थलास जाऊन वेव्हार सांगा गोतमुखें न्याये होईल त्याप्रमाणें वतन चालविले जाईल ऐसी आज्ञा केली त्यास विठोजी व वरकड मान्य नव्हेत राजीनामे नेदीत नस्ती दिलात घेऊन कथले करूं लागले त्याउपरि स्वामीने चंजीस सरकारकून होते त्यामधें जे सरकारकून हाजीर आहेत ते व राजश्री शंकराजी मल्हार मोगलाईतील सैदांचे तर्फेने आले होते ते व राजश्री मानसिंग मोरे खंडेराव दाभाडे सेनापति हेहि चंदीस राजश्री काका स्वामी संनिध होते त्यांस बोलावून व राजश्री सुलतानजीराऊ निंबालकर सरलस्कर व वरकड भले लोक व कितेक परगणियाचे देशमूख देशपांडे मोकदम व मख्तसर लोक सभेस बैसवून त्यांस याचा कारिना पुसिला तेव्हां समस्तांनी विदित केलें कीं देवजी सिर्के याणी कारिना विदित केला तो यथार्थ आहे वतन गणोजीराऊ सिर्के यांस दिल्हें रामोजी सिर्के त्याचे पुतणे म्हणून त्याणी वतनाची पत्रें त्यांपासी देऊन इकडे पाठविले तेवढीयानेंच रामोजी व त्याचे भाऊ वतन अनभऊ लागले वतनाचे खावंद विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरजी सिर्के हे खोटे ऐसे कलो आलें त्यास सदरेवरून उठऊन दूर केलें स्वामीस थोरले कैलासवासी स्वामींचें वचन प्रतिपालावें व कैलासवासी राजश्री काका स्वामींचें दत परिपालण करावें हें अगत्य वडिलाचें चालवावे हेहि अगत्य म्हणून तुम्हावरी स्वामी कृपाळू होऊनु मामले दाभोलची देसमुखीचे वतन तुम्हासच बाहाल केले असे तुम्ही व तुमचे पुत्र-पौत्रादि वंशपरंपरेने वतनाचा उपभोग करून दंडकप्रमाणें वतनाची सेवा करीत जाणें य,

वतनास रामोजी सिर्के याचे पुत्रास व विठोजी सिर्के व दौलतराऊ सिर्के यांस समंध नाहीं जाणिजे *लेखनालंकार (सीमा)

रुजु सां
मंत्री

बार सुद सुरु सुद बार बार

---

## कुडाळ देशमुख.

लें० ४३९ } {शा० १५८६ श्रावण शु. १० {इ. १६६४ आगस्ट २२

श्रीमेरुलिंगाची

सीवाजी राजे

† माहाजर बतारीख ८ माहे मोहरम बीहुजूर हार्जार मजालसीयानी प्रांत का कुडाल स्वस्ती श्री सालित्रान सके १५८६ क्रोधीनाम संवछरे स्त्रावण सुध दसमी सुक्रवार

| | | | |
|---|---|---|---|
| चांदखान बिन कमाल खान सरगु न्हो किले चदन (कट्यार) | सीकरखान हुदेदार का कुडाल (शिक्का फारसी) | साबाजी बिन तुकाराऊ कनोजे (शिक्का फारसी) | रायाजी बिन भान पडित कनोजा (कट्यार) |
| सूर्याजी बिन रामजी येसवतराउ बाणकरी (एक निशाणी) | विसो पुंडलिक सर (गुन्हो) समत देहाये पा कुडाल (शिक्का फारसी) | नखोजी ना बिन तुकाजी ना पिसाल देसाई मो उझर्डे पा वाई | विठोजी ना कोडे देसमुख ता खेडबारे |
| | आबा सेटी बिन हर सेटी सेटिया का बुधण (तागडी) | चांगोजी बिन धारोजी सेटिगा (खंजीर) | खानाजी बिन चिमनभाई (खंजीर) |

---

* येथून अक्षर निराळें व सीमा षट्कोनी † असाच (याच तारखेचा व एकाचेच हातचा) दुसरा महजर. बापूजी बिन रतनोजी नाईक यास सूर्याजी नाईकाने लिहून दिला आहे मजकूर दोहोंचा एकच आहे. फक्त आम्हास तेथें तुम्हास वगैरे योग्य ते फेरफार आहेत

| | | | |
|---|---|---|---|
| विसाजी | बापूजी | गगाजी पा। बिन नरसीव्ह | |
| माभलेस्वर | नागोजी | पटेल वा सारे नाडगौडा | |
| देसकुलकर | देस कु- | वा मोकदम वा तान्हाजी | |
| णी बी कलम | लकरणी | चौगला का। मजकूर | |
| खु | | ( नांगर ) | |
| गणसेटी | आबाजी | | |
| व बकसेटी | वा बाजी | | |
| सेटिया व खं- | बाबाजी | बाबाजी पटेल | बापूजी अ- |
| ड सेटिया | का। मा।र | मो। सेते | वसरा |
| माहाजन | ( एक चित्र ) | ( नांगर ) | ( कात्री ) |
| का। मा।र | | | |
| ( तागडी ) | | | |
| बहिरोजी | पदाजी | | |
| म्हेतर दरजी | ह्मेतरीया | | |
| (कात्री ) | दुलाई ( कुंचला ) | | |
| वाघोजी | | भाल ठाकूर | राया बिन |
| साल्वी व | | ( एक चित्र ) | भानजी व |
| बाकोजी | लिंग जोसी | | खंड बिन भिऊ |
| सालवी | | | चाभार. |
| कुंभार का। | | | |
| मा।र | | | |
| ( चाक ) | | | |
| जाउजी भ- | कान्होजी | | |
| डसी | व घाटा राउत | | |

सु॥ खमस सितैन अलफ कारणे जाहाला माहजर ऐसे जे सूर्याजी नाईक बिन तुबाजी नाईक देसमुख पा। कुडाल यास बापूजी पा। बिन रतनोजी नाईक देसमुख पा। मजकूर याने हाजीर मज्यालसी या हुजूर लेहून दिल्हे माहाजर येसे जे आम्हास माहाराज राजश्री ———— राजेसाहेब भोसले यानी दस्त करून नेउनु किले बासोटियावरी सालयेक अदबखाना राखोन कैदसा ठेविले मग अपले बाबा मुले लोकी मध्योवर्ती पडोन अपणास करारती बाधले त्यास हर सेटी सेटिया का। बाउधाणे व अणिक तिघ जण जमान जाहाले जे बेकुसूर दिवाण नफराई करावे वा करारतीचे पैके उसूल करून यावे म्हणऊन सोडऊन गावास आलो करारतीचे पैके जबर उसुलातीस जागा नाही म्हणउनु आपले बापभावास आपले तकसीमेचे इनाम विकितो म्हणउनु पुसिले त्यावरी ज्यासी टाकले ( टोकले ) तो घेणे नेटके ( नेटके ) तरी मी आणिकास विकितो म्हणऊन सदरहू बिरादराचे रजावरून का। कुडालस येउनु को। मजकुरी हकमधे आमचे तकसीमेचे

हकाचे ऐवजे जमीन बिघे १५ वाडा मिताडा नजिक बेलाचे सेतासेजारील दाइ-मदाल अम्ही खात आलो ते सदरहु जमीन पधरा बिघे तुम्हास विकत दिल्हे दर बिघेस होन १ येकून होन पंधरा तुम्हापासी घेउनु अवलादी व अफलादी लेकराचे लेकरी तुम्हास मिरासी करून दिल्हे असे त्यास हिला हरकर्ता अगर फितवा फादडा कराविया निसबत नाही मौजे कसबे मजकुरी बिलगाचे हक व पेठेचा हक व बाजे आमचे तक-सीमचे कानु कायदा आम्ही घेउनु तुम्हास जमीन दिल्हे ते सालाबाद खाउनु सुखे असणे आमचे तरफेचे भाऊबंद दाईजे कुसूर केलिया आम्हीं निवारून यास अनुसारिखे करील त्यास — आण असे व आपले बेतालीसाचे सुकृत असे (सीमा षट्कोनी.)

---

ले० ४४० | श. १५८९-९० इ. १६६७-६८

( वाटोळी फारसी-मुद्रा )

मुसाफेचे

कार्साचे

अज दिवाण **किले चंदन** तां मोकदमानी वा रयानी देहाये पा कुडाल मु॥ किले मजकूर मु॥ समान सितैन व अलफ दरीविला किले मजकुरीचे विलाती **सिवाजी भोसलेचे** तसाविसी करिता कुल खराब पडिले देसाई वा देसकुलकर्णी वा मोकदम वा बाजे रयेता परागंदा होऊन परमुलकासी गेले विलातीत दिवे लागण नाही ऐसे जाहाले किले नाजुक सरहदेचा पाहून विलातीचे मामुरी बदल सूर्याजी नाईक देसाई याचे तफवासी होता नफर मजकूर मौजे नींब पा बाईचे थलात उभा राहून सदरेसी वा जमातीस अपले अहवाल सांगितले जे सिवाजी भोसलेने आपले घर लुटून तलफ केले वा आपले गुरे वासरे वा घोडी नेली वा आपले बहीण + + + + + + अदबखानेत ठेऊन दंड घेतले होन ३०० वा सिलकावणी होन ६० घेतले जे पेसजी किले मजकुरीचे विलातीच व जमातीचे गुन्हे वा नाईकवाडी याचे गुन्हे घेऊन गेले होते ते खडणी देतो म्हणौउनु सोडून आणिली आणि खडणी दिल्ही नाही म्हणौउनु गुन्हे लाऊन अपणासी सदरहु नागवण घेउनु ये वख्ताच खाविया नाही ऐसे केले त्यावरून जमायती सरगुन्हो वा नाइकवाडीयानी किले मा नफर मजकुराचे बाबे इलतमास केले जे विलाती खराब त्याकारिता दिवाण बाब वा तनखे ठाणकार वा कारकून वा वख्त हसम पावत नाही त्या कारिता वख्त बेहाल जाहाले असेती किला नाजुक असे देसाई मजकुराचे दिलासा करून बदल निवाला इनाम चावर १ देऊन विलातीचे मामुरी करविले जे किला नुवाना होइल वा दिवाण बाद व रझ न खा कारकून वा हसम पावेल बराये इलतमास खातीरसी आणून सूर्याजी ना बिन

तुबाजी नाईक देसाई मजकूराही बदल निवाला इनाम चावर १ दिल्हा असे बा तपसील

| कसबे कुडाल | मौजे सरताळे |
| --- | --- |
| चावर -।- | -।- |
| आराथल जमीन | अराथल जमीन |
| १० वाडापैकी | -।- |
| ८ ५ भोसा मोढा | ८१० बेदपैकीं |
| ८१५ गुरविक | ८२० कोलकाईपैकीं |
| -।।- | -।- |

येणेप्रमाणे कुलबाब कुल्कानु दो माहासूल नख्त याती

\+ + + + + +

\+ + + + + + +

नवीन तालीक लेहून घेऊन असल मिसेली परतून दीजे पेस्तर × यासी × कोण्ही इस्कील वा खलेल करील × × × त्यासी मुसलमानार्मा—सौगद असे वा हिंदू ब्राह्मणासी——असे मा। (फारसी)

———

## सासवड बोकील.

ले. ४४१ | श. १५९३ फाल्गुन व. ११ / इ. १६७२ मार्च १५

श्रीशंकर

राजश्री कारकुनानी प्रा सिरवल गोसावी यांस

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——सेवक × विठल पीलदेऊ सुबेदार व कारकून सुभा तो मावाले नमस्कार विनंती सु॥ इसने सबैन अलफ मौजे पलके प्रा मजकूर येथील कुलकर्णी व जोतीस निमे मा यमाजी रंगनाथ बोकील याणी खरीदी केले आहे बर-हुकुम महजर देसक प्रा मजकूर केला आहे तरी सदरहू महजर प्रमाणे जोतीस व कुलकर्ण निमे माइलेच्या दुमाले केले आहे तेणेप्रमाणे दुमाल करणे छ २५ माहे जिल्काद तालिक लेहोन घेऊनु असल माइलेसी फिराऊनु देणे

*श्रीशिव चरणी शर-णागत विठ-ल पिलदेव नीज भक्त

§मोर्तब सुद

पा। छ ४ माहे सौवल

———

× विठल पिलदेऊ अत्रे गराडकर § षटकोनी. * चौकोनी.

ले. ४४२ } {श. १६२९ फाल्गुन शु. ५
{इ. १७०८ फेब्रु. १५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित संवत्सरे फाल्गुन सुध पंचमी भानुवासरे क्षत्रिय कुलावतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमूख व मुकदम कसबे सासवड यासी आज्ञा केली ऐसी जे माहादाजी पमाजी बोकील याणी हुजूर येऊन विदित केले की कसबे मजकुरी आपणास वाडा देसमूख मुकदम याणी देऊन पत्र करून दिधले आहे ऐसे असोन सांप्रत ते जागियास हरकत मांडली असे तर स्वामीने पारपत्य करून आपला वाडा हरप्रा आपणास देविला पाहिजे म्हणून विनंती केली त्यावरून हे आज्ञापत्र तुम्हास सादर केले असे की पत्र करून दिल्हे आहे तेणेप्रमाणे याचा वाडा याचे हवाली करणे हरकत फितवा न करणे परतोन बोभाट आलिया ताकीद होईल जाणिजे +निदेश समक्ष

¶ मर्या
देयं रा
जते

† श्री ०
शिव नरपति ह-
र्षनीधान मोरेश्वर
सुत भैरव मुख्य
प्रधान

सुरु सुद बार

---

ले. ४४३ } {श. १६३४ वैशाख व. १
{इ. १७१२ मे १२

श्रीवटेश्वर

बाहिरव विठ्ठल

स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शक १६३४ नंदननाम संवत्सरे वैशाक वदी १ प्रतीपदा भृगवासरे तदिनी राजेश्री भगवंत गंगाधर बोकील यासी देशमूख व मोकदम व देशपांडिये कर्याती सासवड लेहोन कृतीपत्र दिल्हे ऐसे जे सेत नजीक श्री—खंडी १॥ दीड थल करून पुरातन दिल्हे आहे त्यास तुम्ही सेताचा सारा पूर्वी गला खंडी १॥ व नक्त टके ३० देत होतेस त्याप्राच घेऊनु येणेप्रा दरहरसाल याच शिरिस्तियाप्रमाणे चालऊनु गावास आदिक उणा टका पडेल तो गांवसमधे समजोन तुम्हासी समध नाहीं हे आम्ही शफतपूर्वक स्मरोन दिल्हे असे लेकराच्या लेकरी आनभवणे ये गोष्टीस आम्हापासून अंतर पडेल तरी श्री—यांची आण असे व वाराणसीमधें गोहत्यचे व ब्रह्महत्यचें पातक असे व आपल्या बेताळीस पूर्वजाची आण असे हे पत्र सही

*मोर्तब
सुद

---

+ अक्षर वेगळें ¶ चौकोनी † वर्तुलाकार. * चौकोनी.

ले. ४४४ } {श. १६३९ मार्ग. व. ४ / इ. १७१७ डिसे. १०

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी संवत्सरे मार्गसीर्श बहुल चतुर्थी भोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी याणी राजश्री बापूजी श्रीपती यास आज्ञा केली ऐसी जे गंगाजी एमाजी याचे पुत्र भगवंत गंगाधर व राजश्री माहादाजी येमाजी बोकील याणी विदित केले की कसबे सासवड का मजकूर येथील ठाणियाची चिटणिसी व ठाणियाचे लोकाची सबनिसी हे वतन आपले पुरातन कारकीर्द दरकारकीर्द पूर्वी चालत आले तेणेप्रमाणें कैलासवासी थोरले राजे छत्रपती स्वामी व राजश्री कैलासवासी आबास्वामी उभयतांच्या राज्यांत चालिले त्या उपरी धामधुमेकरिता ठाणियाची मजबुदी नाही म्हणून वतनी हुदेहि चालिले नाही अलीकडे राजश्री बाळाजी पंडित प्रधान याणी कसबे मजकुरीच्या ठाणियाच्या स्थलावरी कोट बांधोन ठाणे बैसविले लोक ठेऊन मजबुदी केली आहे तरी स्वामीने पूर्वी चालिल्याप्रमाणें सबनिसी व चिटनिसी दोन्ही हुद्दे आपले वतन आपणास चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणून त्यावरून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले आहे तरी तुम्ही महादाजी येमाजी व भगवंत गंगाधर उपनाम बोकील यास चिटणीसी व सबनिसी ठाणे मजकूरचे वतन पुरातन चालत आल्याप्रमाणे चालवणे हरदू वतनाची सेवा घेत जाणे वेतन चालत आल्या प्रमाणें देत जाणें पेस्तर यास व याचे वंशपरंपरे वतन चालवणे या पत्राची प्रती लेहोन घेऊन हे मुख्यपत्र भोगवटियास याजपासी परतोन देणे दरहरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे जाणिजे *बहुल काय लिहिणे.

सुरु सुद बार बार

†मर्या
देयं रा
जते

---

ले. ४४५ } {श. ? / इ. ?

श्री

यादी माहितगारी मंडळ

१ श्रीमंत महाराज शाहू राजे दिलीहून आले शके १६२९ या सालात येऊन चंदेन वंदन किल्यानजिक राहिले ताराबाईसाहेब सातारियासी होती त्यांही शाहुराजे याजवर खुळ माजविले नंतर धनाजी जाधवराव याजवर मराठे बेदिल जाले होते ते वेळेस बालाजी विश्वनाथ आबाजीपंत पुरंधरे व खंडो बलाल चिटनिवीस या त्रिवर्गानी समेट करून सात हजार मराठे जमा करून शाहुराजे यास शके मार किले चंदन वदन येथील मुक्कामी भेटले कलम.

---

* अक्षर वेगळें. † चौकोनी.

१ शके १६३० वैशाखमासी धनाजी जाधवराव याची व महाराजाची लढाई जाली जाधवराव याचा मोड जाला नंतर माारनिले पळून मोगलाईत गेले त्या उपरी त्यांजकडील सेनापतिचे पद दूर करून दाभाडे यासी दिल्हे. कलम

१ परशरामपंत प्रतिनिधी खुलास मिळाले हा दोश ठेऊन पारपत्य करित होते ते वेळेस खंडेराव चिटनिवीस याणी बक्षीस मागोन प्रतिनिधी त्याची त्यांजकडे काईम राहिली कलम

१ पिंगले पेशवे यांजकडे नाकर्तेपणा आला सबब त्याजकडील पेशवाई काढून त्याम श्री देवी प्रतापगडची माहाराजाची कुलस्वामीण देवी तेथील पेशवाई त्यास देऊन दाहा हजाराचा सरंजाम चालविला तो हली पिंगले खाऊन आहेत त्याजकडील पेशवाईचे पद काढून बालाजी विश्वनाथ कोकणस्त ब्राह्मण देशमूख ताा श्रीवर्धन प्रांत कोकण यास शाहूमहाराजानी कृपा करून दिल्हे शके १६३५ या सालात त्याजकडे पद जाले त्या दिवसा-पासोन पेशवे प्रधान कोकणस्त आहेत कलम

———

ले. ४४६ } {श. ?
{इ. ?

श्री

†यादी

१ प्रथम जजिरा येथे कोली याचा + + + होता सन खमस इसरीन तिसा मिया या सालात बहिरखखान निजामशाही पातशाहाकडून येऊन इतबारराव कोली यास पातशाहाकडे नेले आणि पातशाहानी इतबारराव कोली यासी जजिरचे अमलदारीचे काम सागितले त्याणी पाच वर्षे आमल जजिरे येथे केला.

१ सन समान इसरिन तिसा मियात बाहिरखखान जजिरचे आम (ला) वर आले त्याजपासून पातशाहीतून जजिरा येथे आमलदार येत गेले

१ सन समान समानीन तिसा मिया या सालात मलिकंबर यासी वजिरीची वस्त्रे पातशाहीत जाली.

१ सन सीत आर्बैन व आलफ या सालात सिवाजी महाराज याचा आमल सुरू जाला शके १५९६ आनंदनाम सवत्छरे सन खमस अर्बैन व आलफ या साली राज्याभिषक जाला शके १६०२ रौद्रनाम सवत्छेरे सन इहिदे समानीन व अलफ या साली महाराज कैलास वासी जाले

१ शके १६१० सन तिसा समानीन व अलफ या साली संभाजी राजे यासी धरून सगमेश्वराहून नेले. पुढे दोन वर्षे मोगलाई होती भालेराई जाली

१ सन तिसैन व आलफ या साली खैरातखान साहेब स्वस्तान जजिरा याणी मुलूख

---

† यातील मुसलमानी सन चुकीचे असावेत. मूळाप्रमाणें लिहिली आहे.

काबीज केला तागाईत सन सलास सलासीन अखेर पर्यंत पुढें सन मजकुरी बाजीराव बलाल पेसवे वैशाखमासी जजिऱ्याचे म्हसल्यास आलें.

१ सन इहिदे खमसैन व आलफ या सालात आनाजी दतो याही पाहाणी केली बिघवणीची केली.

सदरहु प्रमाणे लिहिले आहे × × बेशाख रुजू पाहून ध्यावे.

---

## अकोले देशपांडे

ले. ४४७ } {श. १५५१ आश्विन शु. १०
{इ. १६२९ सप्टें. १६

श्री

तालीक मा असली

अज दिवाण ठाणे पा आकोले ता कारकुनानी व देसमुखानी व मोकदमानी कर्याती राजोरु पा मार बिदानद सु॥ सलासीन अलफ खुर्दखत रा छ माहे— पौ छ ७ माहे सफर तेथे रजा बो तिमाजी गगाधर कुलकरणी कर्याती राजौरु हुजूर येऊनू मालूम केले जे कर्याती मजकुरीचे कुलकरण आपली मिरासी आहे हाली सिवाजि बायदेऊ आपला गोत्रज आपली तकसीम आहे म्हणौऊनू कुसूर करितो त्याची तकसीम लाभत नाही आपले वडील खात आले आहेती ता कारकीर्दी मा मदार मलीक अबर आपण खात आलो आहे भोगवटा यैसा असोनू नफर मा नवी जिकीर करुनू करकसा करितो तरी साहेबी आपले कुलकर्न आपले दुमाला केले पाहिजे दरीबाब खुर्दखत मऱ्हामती होय म्हणौऊनू मालूम केले बराय मालुमाती मालूम जाले तरी सदरहू हकीकती बालोजी देसमुखास पुसतां बालोजी देसमूख कर्याती हवेली जाब दिधला की आपली उमर वरसे पनास जाली आहेती तिमाजीचा भोगवटा जाला आहे म्हणौऊनू हुजूर गोही दिधली तरी तुम्ही याचे वतन कारकीर्दी मलीक अबर मालुमाती गोही बालोजी देसमूख याचे हवाला करणे तालीक घेऊनू असेली खुर्दखत फिराऊनू देणे म्हणौनू रजा रजे हुकूम अमल करणें विसाजी पासुनू कुलकरणाचे काम घेत जाणे मोर्तबसूद

तेरीख ८ माहे सफर

---

ले. ४४८ } {श.१५५१ (?)
{इ. १६२९-३० (?)

श्री

रुजू सिका. ता

अजरख्तखाने मसुरल हरजती राजश्री दादाजी विस्वनाथ साहेबू दाईम दौलतहू बजानेबू कारकुनानी पा आकोले बिदानद सु॥ सलासीन इसरीण ? अलफ तिमाजी व सिवाजी कुलकर्नी हे हुजूर आले का राजूर पा मा कुलकरनाचा करकसा होता म्हणौनू हरदोजनी

कडी वाद सांगितला मुनसफी करितां माहाली गोही साक्ष आहेती यावेगला निवाडा होत नाहीं म्हणौनू का माचे कुलकर्न अमानत केले असे पेस्तर माहादाजी रंगनाथ माहालास येतील ते वख्ती गोही साक्षी पाहोनू निवाडा करितील मुनसफी करिता ज्याचे होईल त्याचे दुमाला करितील तश्रीफ दिधली आहे ते ठाना जमा करणे तुम्ही तालीक घेऊनू असल सिवाजीस फिराऊनु देणे मोर्तबु

———

लें० ४५९ }

{ श० १५५१ ?
{ इ०१६२९-३०?

नकल राजीनामा + + + + × +
+ गणे संगमनेर सुा स ... ... ... ...

काजी अहमद हाकिम
... ...पा मार
नागोजी महादेऊ कारकून
पा। मार

खा दिलावरखान

× + सावदे व अज + त
अमीनलमुलकी खा
+ मा पनाले
बहजूर खुद ... ...

हरदो देसमुख का सगमनेर ... ... येथील कागदाचे सिरस्ताबदल व कसाब्यिा-बदल करकसा करीत होते हाली सदरहूने तह केला तेणेप्रमाने हरदो जनी वर्तने बितफसील कलमे सात

शिस्त सदर तिमाजी
कुलकर्णी यानें लेहावे
व सदर बेरीज तिमाजीने
ल्याहावी अक्षरे थोप सिवाजीने करावे
करियात बेरीज तिमाजीने घालावी
तिमाजीनें आपले गांव व सिवाजीने
आपले गाव तरफवार ल्याहावे
कसवांची रोजकीर्द
का मजकूरचे कुळकर्णी याने मजमूचे
दफतरीं रसद लेहवावी
व कुलकर्णी कसबे मजकूर
त्याने लेहावी
दफतरीहून हुजत घ्यावी

कसवा तिमाजीने म्हणावा ( ? )
बेरीज सिवाजीने घालावी
कसबाची तकरीर अगर कतबा
कसबाचे कुलकर्णी याने लेहावा
कसबाचे बावे हरयेक बाब ज ज ह
लु दिवान कारबार हरदो देसमुखां
करणे

लाग
०

सदरहू प्रमाने निवाडा केला असे येणेप्रमाने हरदोजनी वर्तने या निवाडलिखि अमलास जो हिला हरकत नवी जिकीर करील तो दिवानचा गुन्हेगार व गोताचा अन्या मोर्तबशुद

ता २७ माहे सवाल

ले. ४५० } { श. १५५४-५५?
{ इ. १६३२-३३?

श्री

तालिख

++ तुबाजी दादास तिमाजी गंगाधरे लेहोनु दिधले यैसे जे सुा सलास सलासीन अलफ आपली तकसीम हवेलीचे कुलकरण गाव ९ आहेती तेथील मुस्याहिरा व इनामती व सनवार व तश्रीफ दिवाणातील येईल व याखेरीज आणिक उत्पन्न होईल त्याची तक्षीम देखील थूगो बुा गाव कुलकरण

तुम्ही घेणे रुके ।६ आठरा दर टकियास आपण घेणे दर टकियास वाटा व चाकरीचे रुके ॥६ तीस टकियास घेणें जो चाकरी करील तेणे येणेप्रमाणे घेणे

सदरहू प्रमाणें वर्तत जाणे तुम्हास देणे जरा एक मुलबाई जा त ना खोटी करील त्यास वाडिलाची आण व आपले कुलस्वामिनीची आण असे व याखेरीज नागोजीचे ताा गाव ८ खरेदी केले आहेती त्यापा एकोजी गांव ४ बाकी गाव ४ हे याचे पैकी होनु ४॥ तेवा जेवेरी ती देणे मग ते ही सदरहूप्रमाणे वाटूनू खाणे तोवरी तेथील उत्पन्न कलातरावारी जे येईल ते खाने मग मुदल पैके होनू ४॥ साडेचारी देणे तुम्हास साल गुा ताा हली अस्विन सुध पाडवा तुम्हास पावले असे हे लिहिले सही व आपले +++ गावगणा कुलकर्णी येवूनू तेथें +++ तरी सदरहूप्रमाणं वाटूनू देणे हे सही कानडे हटी दर साले बाल वेगले करूनू पुढे जो रुका साधेल तो वाटूनू सदरहूप्रमाणें खाणे सही

यासी साक्षी विसाजी हरदेऊ

———

ले. ४५१ } { श.१५४०-१६०० ?
{ इ. १६१८-१६७८ ?

श्री

माहाराज श्रीमनोहरदासजी माहाराज साहेबू.

॥छ अर्जदास्त महाराजाधिराजश्री-सेवेसी सेरीकर देशमूख व मोकदम कर्याती राजूर पा आकोले सेवेसी अर्जदास्त विनती बाा ताा तेरीख माहे साहेबाचे कृपादृष्टीकरून सेरीकराची बखेर सला वत असे बाा साहेबाचा परवाना राजश्री सायेजी साहेबास सादर जाला तेथे रजा जे माणकोजी देसपाडियास हुजूर पाठवणे येथे गोविद धोडो आला आहे तरी माणको मजकुरास पाठऊनु देणे म्हणौन रजा तरी येथे राजश्री साहेबी माणकोजी मजकुरास राजश्री परसो सायेजी व हिरोजी देशमुख औरंगाबादेस रायाजि देशमुखाचे समजाविसी बदल पाठविले याबराबरी माणकोजीस पाठविले आहे यैसीयास वतन तो कदीम पिढी दर पिढी

माणकोजीचे देसपांडियेपण आहे गोविंद मजकूर नाहक खलेल करीत आहे बेसीयास माण-कोजी औरंगाबादेहून आलियावरी साहेबाचे सेवेसी येईल.
( पाठिवर वाटोळा मराठी शि. )

---

ले. ४५२ } {श. १५६०-१६००? / इ. १६३८-१६७८?

श्री

रामराम

॥ द

श्री सकल गुण अलंकृत राजमान्ये राजेश्री केसोपत व माणकोजीपत देसपांडिये यासि हिरोजी देसमुख व रायाजी देसमुख व देसपांडिये पो आकोले अनुक्रमे-नमस्कार
+ + + विनति उपरि तुम्हाला कागद पाठविला मनास आला ली ( पुढील कांहीं
( मुद्रा ) ओळी नापत्ता )

स ठाऊक नाही यावरी गोविंद धोंडोस प्यादे पाठवुनू बोलावुनु दरबारास आणिले त्यास ताकीद करून पुरसीस केली तेणे जाब दिधला कीं आपण परवाणा घेतला नाही महालास पाठविला नाही परवाणा घेवूनू महालास पाठवुनू ते आपली गर्दन मारिली पाहिजे यैसा नेम केला आहे तरी गोसावी याची तहकीकाती करून वा कैद आमल असला तो आम्हास साबे हुजूर पाठविला पाहिजे म्हणवुनू लिहिले तरी गोविंदाचा बाप धोंडावा त्याने आमिना पासी परवाणा हजीर मजालिसी हुजूर दाखविला. यावरी आम्ही हाजीर मजालिसी हुजूर पुसिले की तुवा परवाणा आणिला आहे तो दाईमुदाई दोघे दरबारी उभे राहोनू घेतला आहे कीं देस गैबती घेतला आहे यावरी त्यानें जाब दिधला कीं दाईमुदई दोघे उभे राहो-वुनु परवाना घेतला आहे. ( अपूर्ण )

---

ले. ४५३ } {श. १५६०—१६००? / इ. १६३८-१६७८?

श्री

रामराम

॥ छ

श्रीमत प्रढुड प्रताप दिनकर ( खंडे ) स्वरी सदा येसबत राजमान्य राज( श्री ) हिरोजी देसमुख गोसावी यासी ×× लुखजी व दूलोजी देसमुख क॥ राजूर—ति लेहावया कारणे यैसे जे मानकोजी तुबदे व केसो त्रिमल यास महजर करुनु देणे आम्हास बोलावा तेधवा येवूनू हे काम मनीं धरने अगती काम करणे आम्ही तातडी गावास आलो कीं राजश्री सेखदार + बोली जाताती म्हणउनू भेटीस अतर पडले.

ले. ४१४ }  { श. १५७० वैशाख शु २
{ इ. १६४८ एप्रिल १५

श्री

नकल महजर हाजीर मजालसी सदर ठाणे पा आकोले बिहुजूर तपसील तेरीख १ रबिलाखर

| काजी व खत्री हकीमशा | | हवालदार व कारकून | |
|---|---|---|---|
| काजी हकीम | खतीब पा | राजश्री मल्हार | नरसो चंद |
| पा मा | मजकूर | राउ हवालदार | रस मजुम |
| बमोहर माइले | बमोहर मा | बमोहर मा- | दार का |
| | इले | इले | मार |
| | | सेख बुद ह | |
| | | वाले का मा | लग |
| | | मोहर माइले | • |

देसमुखानी व मोकदमानी व सेटिये
देसमुख पा मजकूर
जाउजी देसमुख
पा हवेली
बमोहर माइले
जेसजी देसमुख
नागर माइले

मोकदम व सेटिये कसबे आकोले

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सेटियाजी झोले | बाबजी फर्जंद | म्हउजी गुरव | बाबसेटी | मेडजी |
| कर मोकदम | सदाजी धुमाल | मोकदम | सेटिया | सेटिया |
| नागर माइले | मोकदम नागर मा | नागर माइले | तराजू | तराजू |

देसपाडिये पा मजकूर

( कोरी जागा )

नाइकवाडी पा मजकूर

| | | | |
|---|---|---|---|
| सूर्याजी नाईक | रभाजी नाईक | देउजी (?) नाइ- | अंबुलजी |
| वाडी पा मार | वाडी कटार | कवाडी कटार | नाईकवाडी |
| कटार | | | कटार |

मोकदम गावगणा
काउजी मोकदम
मौजे उ ष खु म वा डं या

सुा समान अर्बन अलफ सन हजार १०५७ कारणे महजर केला यैसाजे नरसजी पानसारा व येसाजी पानसारा माहाल आवटबोलावी कसबे आकोले पा मजकूर हे हुजूर जाउनु खुर्दखत बिनाव कारकून छ ११ रबिलौवल सानी (?) आणिले तेथे मजमून की नरसजी व येमाजी पाणसरे मालूम केले जे किदीमुल अयाम आपली मिरासी पाणसारगी पा मजकूर असोन लाइनी देउजी नाइकवाडी व रतनजी... ...हे हरदोजण फर्यादी साहेब हजूर करितो तरी साहेबी नजर येनायेत करून बरहक, निवाडा केला पाहिजे बराये मालुमाती हाकीम शरा व देसमुख व देसपांडिये वगैरा मोख्तसर लोक बैसऊनु बरहक मुनसफी निवाडा करून भोगवटे तसरुफाती मनासी आणिता नाइकवाडी यासि निसबती नाही नरसजी व येमाजी पाणसारगी केली आहे येसी गोही मुकाबला जाला यावरी नाइकवाडी दूरी करून देउजी व रतनजीचा कागद आत्मखुसीचा लेहोन घेतला की आपली व आपल्या बापाची वडीलाची मी [ रा ] सी पानसारगी नव्हे खाली जागा मिया राजियाचे कारकीर्दीस आपल्या बापे भिउजीने पानसारगी चालविली ते वख्ती खाली जागा चालविली ते मसमु नव्हे आपली मिरासी नव्हे पाणसारगीस आपणास निसबती नाही यैसा काजी हाकीम शराचे सनदेनसी कागद लेहोनु दिधला असे यावरी पाणसारगी यांची यासी मोकरर केली आहे याजपासून पाणसारगीची खिजमती घेणे व यास महजर निवाडे माफीक देसपांडियांचे दस्तुरे करून गोही निशानिया करून देवणे ताकीद असे यैसी रजा बा रजा महजर देसपांडी लिहिला यावरी शिवाजी बायेदेऊ कुलकर्णी कसबे आकोले हा येउनु सदरहु मजालसीस बोलिला की सदरहु माहाल कसबे निसबतीचे आहेती हे लिहिणे सालाबाद पिढी दर पिढी आपले आहे. आणि देसपांडे महजर लिहिला आहे. बहुकूम आपणावरी होतो आपली मिरासी बुडते यावरी सदर व देसमुखी सिवाजी बायेदेऊ यासि हुकूम केला की हुजूरील रजा आहे तुम्हा हुजूर जाणे यावरून सिवाजी बायेदेऊ हुजूर गेला संगमनेरी दुसरे रोजी सिवाजि येकनाथ व तिमाजी गंगाधर देसपांडिये येही आले मग देसमुखी हर दोजणास बोलीले की तुम्ही लाइनीच भांडता सालाबाद पिढी दर पिढी चालिले आहे तैसे लेहो नवी जिकीर करणे काये......स आहे हे लिहीने सिवाजि बायेदेऊ कुलकर्णी कसबीयाचे बा ये येणे लिहीले हा निवाडा हवालदार राजश्री मल्हारराऊ हवालदार या हुजूर बसोन सिवाजी बायेदेऊ याजहाती महजर लिहिविला असे देसपांडीही महजर लिहिला असे तो रद असे सदरहू मजालसीयाने पानसारगीचा बुनयादि मनासि आणिली नरसजी व येमाजी पानसारे यासि मिरासी होये देऊजी व रतनजीचा बाप भिऊजी नाईकवाडी येणे मिया राजियाचे वेळे पानसारगी केली ते नरसजी व येमाजीचा बाप तुमजी हे परागंदा जाले होते याचे कोन्ही हजीर नव्हते खाली जागा होता याकरिता भिऊजीने पानसारगी केली परी त्याची काही मिरासी नव्हे याची मिरासी होये भिऊजीचे लेक देऊजी व रतनजी हे लाइनी उभे राहीले होते ते दूर केले असे तरी त्यासि पानसारकीसी निसबती नाही नरसजी व येमाजी पानसारगी याची मिरासी होये त्याचे दुमाला केली असे इही पानसारकी चालवणे यासि हिलाहरकती करील तो दिवाणाचा गुन्हेगार व गोताचा अन्याई हा महजर सही.

ले. ४५५ } { श.१५७० मार्ग. व. ७
{ इ. १६४८ डिसें. २६

ता नबाबसाहेबू

राजीनामा येसाजी व बालोजी देसमुखमानी का॥ राजूर पा॥ आकोले सु॥ तिसा अर्बैन अलफ राजीनामा लेहोनू दिधला यैसाजे आपली निमे देसमुखी कदीम होय हली आपण नाकाम व नातुवणा सबब तर्फ घसरली सालबसाल कमी होती गेली याबदल—साहेबी हुजूर बोलाऊनू आपला वडील भाऊ नेऊजी देसमूख त्याचे हवाला समुदी देसमुखी केली ते आपण खुसनुद दिधली असे हली महालास कसबे राजुरास येऊनू समस्त मायेवत लोक जमा करुनू त्या हुजूर आपण नेऊजीस देसमुखी दिधली असे तेणे सुखी देसमुखी करणे त्यास आपण हिला हरकती करू तर दिवानीचे गुन्हेगार व गोताचे आन्यायी हा राजीनामा सही

( कागदाच्या उजवीकडे कोऱ्या जागेंत )

येसाजी बालोजी बी॥ बयाजी सिवदेवू देसपांडिया
( नां. चि. ) ( नां. चि. ) का॥ मजकूर

तेरीख २०

जिल्कादी

गोही

| | |
|---|---|
| गोपाळ घुगरी बकाल | बालोजी परडेकर बकाल |
| वाऊजी मोकदम मौजे | धाऊजी मा॥ चिंचोड |
| वाकी | |
| जैतपा कराला का॥ मा॥ | बाहिरजी सीदा का॥ मा॥ |
| बापूजी मालोजकर का॥ मा॥ | अंताजी वनजारा का॥ मा॥ |
| पीलजी निरोडा का॥ मा॥ | येसाजी गभीर का॥ मा॥ |
| लुखजी वनजारा का॥ मा॥ | जाखो व देऊ तेली |
| खंडोजी सोनार | कुमाजी लोहार |
| चाहु परीट | निरा महार व हणमता |
| रामजी चाभार | महार पाडेवार का॥ मा॥ |

———

ले. ४५६ } { श. १५७१ आश्विन शु. ११
{ इ. १६४९ आक्टो. ६

नवाब कारतलबखान

अज रख्तखाने खुदायवद खान—साहेब तुली दयाम दौलतहु बजानेब साऊजी देस-मुख पा॥ आकोले सु॥ खमसेन आलफ (फा.शिक्का) सन हजार १०५९ हुजूर मालूम जाहले जे साहेब काम दिल वखतेसी करितोस परगणाहि कुली वसूल होईल यावरून तुम्ही माकुलाती

व मेहनाती जाहीर जाहाली हाली येसाजी व बालाजी देसमुख राजूर याम दिलासा देउनू आणोनू आबादानी करणे येबाबे कोताई न करणे ( ष. फा. मो. )

तेरीख ९ माहे सौवाल

---

ले. ४५७ } { श. १५७९ मार्ग. शु. ४ { इ. १६५७ नोव्हें. २९.

नकल नबाब काहारतलबखान

छ सियादत पनाहा मिरा सैद दाऊद सेखदार व कारकुनू पा आकोले व आमल बद सवान मत बाशद किताबत ( फा. वा. शि. ) पाठविली हाकीकती मालूम जाली दादाजी व येकोजी मोकदम सोली मा याचे बाबे लिहीले होते अर्दास हुजूर छ ८ रोजी गेली आहे तेथे हाकिकती नफर मजकुराची लिहीली आहे जबाब सादर जालियावरी पेस्तर देसपाडेया बराबरी लेहोन पाठऊनू तेणेप्रमाणे आमल करणे व बार्दी पाठविली ते तिचे पैके राघोजीबराबर देसपाडीयाबराबरी पाठविले ती आपल्या हुजुर जाऊजी देउमुख यांच्या हवाला करणे रुपये २० वीस करा होनू ३८ इजारदारासी पटा देऊनू बिदा केले यासि देणे स देसपाडे याचा कथला आहे तरी ते शहराचा साल मजकुरीचा हक अमानत करणे पेस्तर अम्ही येऊनू खातिरेसी अणोऊनू ज्याचा हक लाजिमा असेली त्यास देउनू व रखमी गुरवीन कसबे धारफल राघोजी विस्वनाथ रुपये २० खुद घेतले होते ते तुम्हापासूनू घेऊनू अमारत येकवाल पन्हाहा यास पावले वा मूतन ऊ ब रुपये ३ हजार सात आहेती त्याची ताकीद बहुत आहे हर्राफ व रबीपैकी तहसील करुनू अमानत ठेवणे ये बाबे गाफली न करणे हे किताबत ( ष. मो. फा. )

छ २ रबिलोवल

सुा समान खमसैन आलफ

सन १०६७

---

ले. ४५८ } { श. १५८० आश्विन शु. ६ { इ. १६५८ सप्टें. २२

श्री

तालीक वा + +

बा मोहर खोज्या

मोकदमानी देहाये का राजूर पा आकोले + + गोविंद देसपाडे का मजकूर याचा हक ह्या सन १०६८ ता सन १०६९ जो चालेत आली आहे तेणेप्रमाणे त्याच्या दुमालीं कीजे उजूर न कीजे तालिक घेऊनु असली फिराऊनु दीजे मोर्तबू धोंडोवास

अदबखाणी राखिले होता फर्जद हाजीर नव्हता म्हणऊनु केसो त्रिमल व्हाया पाठविली होता यावरी याच्या याचे दुमाले केले असे मोर्तबू

तेरीख १४

मोहरमू

---

ले. ४५९ | श.१५८३ चैत्र व. ११
इ. १६६१ एप्रिल १५

श्री

तालीक ( तत्कालीन )

अज रख्तखाने राजश्री चत्रोजी राजे साहेबू दाईम दौलतहू ता बजानेबू कारकुनानी व देसमुखानी पा अकोले सन १०७१ तुबाजी गंगाधर देसपांडिया पा मा हुजूर येवुनू मालूम केले जे आपले देसपाडेपण ता राजूर पा मा करोसी दर करोसी चालत आले आहे हली धोंडो गोविंद नहक करकशा करितो म्हणउनु मालूम केले तरी पेसर्जा धोंडो मजकूर हजूर येउनू खुर्दखत नेले आहे तरी तुम्ही त्यावरी नव जाणे तुम्ही आपणा हूजूर रयेता बोलावूनू खातीरेस आणूनू ज्यास रयेती राजी असेली व जो वेतनदार असेलाली त्याचे दुमाले करणे तकरार उजूर न करणे मोर्तबू

तेरीख २५

साबानू

---

ले. ४६० | श. १५८३ पौष शु. १४
इ. १६६१ डिसें. २४

श्री

तालीक

दसखत बा रेऊजी देसमुख कर्याती राजोरू पा आकोले सन १०७१ साहेबाचे बदगीस तकरीर केली येसी जे तुबाजी गंगाधर व धोंडो गोविद हे नफर मजकूर तरफ मजकुरीच्या देसपाडेपणाबदल करकसा करिताती साहेबापासी फिर्यादी जाले साहेबा सदरहू नफर मजकुरांची हकीकती खातिरेस आणिली व सनदा पत्राहि मनासि आणिलिया यावरी आपणास बोलाउनू फर्माविले की तरफ मजकुरीचे देसपाडेपण कोणाचे हे जाहीर करणे तरी बेदरी पातशाही होती तधी बालोजी माडको बोली ( ? ) त्याची मिरासीचे देसकुलकर्ण तो निपुत्रिक होता त्यास फर्जद नव्हता तो आपल्या दादीयाचा सासरा तेणे आपलिया

आजीपासी दिल्हे यावरी आपलिया वडिलास नागवण पडली दिवाणातून खंड जाला त्यानिमित्य कुखोजीस देसपाडेपण विकले हे तकरीर सही.

तारीख ११ जमादिलोवल

---

ले. ४६१ } { श. १५८३ पौष शु. १५
इ. १६६१ डिसें. २५

तालीक

सेख अली फत्ते पा अकोले सन हजार १०७१ यास अमानतपना साहेबी फर्माविले की तुबाजी गागाधार व धोंडो गोविद देसपाडेपनाबद [ल] करकसा करितात तरी तुम्ही बुढे पीरीमर्द आहा तुम्हास सवगद आहे जे हक हिसाबी असेल ते जाहीर करने यावरी सेख अली तकरीर बोलिले की कारकीर्दी माजी अमल दक्षनी जागीर याकूदखानास होती त्याचा सेखदार दताजी माहाली होता तव याचा झगडा जाला पहिले रगोजी धोंडोजीचा चुलता देसपाडेपण करीत होता त्यामधे व कान्होजी तुबाजीच्या भावामधे करकसा जाला सनदा कागद कुल रगोजीचे हुजूर आनिले त्या सनदात गफलत केलिया रगोजी मजकुरास अदबखानास राखिले होते ... ... मोगलाईमधे कारतलबखान रदार तेही अमानत के जनुसद कुलीखान

१२ जमादिलवल हे नकल मा असल मगाजीपत खासर्नास अमीनाचे पाच भाऊ या + + त्रिबक+पत तेही लिहिला असे

---

ले. ४६२ } { श. १५८३
इ. १६६१-६२

राजश्री तुबाजीपंत देसपाडे संत यास रखमाजी जाखदेऊ कुलकर्णी मौजे भोजापूर पा आकोले सन १०७१ लेहोन दिधले यैसे जे तुम्ही मौजे मा अमिनाबराबरी आले तेयावरी तुमचे व धोंडो गोविंद याचा राजुरीच्या देसपाडेपणाचा झगडा होता यावरी तुम्ही आपणापासी कागद भेंडाले १ व गाथोडे लहान १ त्यात कागद मिरासीचे तुमचे होते ते कागद गोविंद धोंडो येवून आपले सुणेपासून मागोन नेले ते तुमचे तुम्हास दिधले बाकी गाथोडे लहान तुम्ही मागो लागले तीयावर आपले सुणेस पुसिले तिने सागितले की गोविद धोंडोने भेंडाले दिधले [दु]सरे गाथोडे लहान दिधले नाही यावर आपण गोविदास पुसिले की तो घरीहून कागद नेले त्यता भेंडाले १ दिधले दुसरे दिल्हे नाही ते देणे यावरी गोविद धोंडो बोलिला की धोंडोपंताबराबर यावीस गेले आहे ते आपण आणून देऊन हे लिहिले सही बीा वों

गोही

| | |
|---|---|
| सोमाजी देसमुख | रायाजी देसमुख |
| नरसो विस्णु देसपाडे | कोंड पाटील पिपले |
| | केरोजी व माणकोजी |
| | मोकदम मौजे |
| | मोजापूर |

---

ले. ४६३ } { श. १५८४ माघ शु. ८
{ इ. १६६३ जाने. ७

तालीक

राजश्री तुबाजी गगाधर देसपाडिये कर्याती राजोरु पा आकोले सन १०७२ मासि

| | | |
|---|---|---|
| जेसजी | माणकोजी | कृष्णाजी |
| देसमुख | देसमुख | देसमुख |

लेहोनु दिधले यैसे जे तुमचे देसपाडियेपण कर्याती राजोरीचे मिरासी आहे यैसी-यासि तुम्हास देसमुखी व मोकदमी व रयेतीने राजीनामा लेहोनु दिधला यावरी गोविंद धोंडो दरबारास जाऊनु परवाना घेऊनु आला म्हणो लागला की आपली मुनसफी करुनु आपणास हुकुमी परवाना दिधला तरी हाली रयेतीने आपणास राजिनामा लेहोनु दिधला आहे यावरी गोही करणे याजवरून आपण गोही केली असे ते रद असे तेणे आपली अकल चोरून राजिनामेयावरी आपली गोही करून घेतली आहे ते आपलीच गोही रद असे हे लिहिले सही

तेरीख ७ जमादिलाखर

---

ले. ४६४ } { श. १५८६ श्रावण शु. १
{ इ. १६६४ जुलै १४

( दोन ओळी फारसी मजकूर व दोन फारसी शिक्के )

सके १५८६ क्रधी नाम सवस्छरे स्रावनु सुद पाडिवा ते दिवसी राजश्री हिरोजी देसमुख पा आकोले यांचीया घरासी तुबाजीपंत व माणकोजीपंत देशकुलकर्णी व बकाल व खेत्री व साली वगैरा लोकही होते तेथे बोली निघाली जे सवबाजी व यसाजी उभ वर्ग सावरचोलेसी पलोन गेले आहेती तेथून सागोन पाठवितात जे राजश्री नाउजी देसमुखास तुबाजीपंती जहर देउनु मारिले मिया उमेद खोजा सेकदार होता त्याचे अमली मारिले यैसे जानजी बकाल व दादजी तेली मेहतरी वगैरा जे कोण्ही येतसे त्याहाती यैसेचि सागोन

पाठवितातो मग हे तहकीक करावयास भिउजी देसमुख व मुधाजी नायक लोणेकर यांस पाठविले येसे जे हे खरे असेली तरी यास हिरोजी देसमुख म्हणतातो जे आपण ही तुमचे या कार्याबदल पाठीसी आहो आणि खोटी अमल असेली तरी खोटियाचे पाठीसी आपण नाही येसे खवबाजी व येसाजी व इद्रोजी मोकदम ( म? ) वगैरा प्रजा होत्या मौजे सावचौल हणवंताचे देउली बैसले होत्ये त्याजपासी भिउजी व मुधाजीने पुसिले जे तुम्ही लोकाहातो सागोन पाठविता की देसमुख तुबाजीपंती जहर देऊ ( नु? ) मारिले तरी हे खरे कराल मग खवबाजी व येसाजी बोलिले जे मिया उमेद ठाणगावास ( ? ) स्वारी करून गेला होता ते वख्ती आपण ही बराबरी होतो मौजे ठाणगावीं आंबियाखाले हिरोजी देसमुखाचा डेरा होता तेथे रात्री हिरोजी आपणासी बोलिले त्यावरूण आपणहि बोल तो येसे उतर दिधले यावेगले आपणास ठाउके नाही येसे समस्ता हुजूर हणवताचे देउली बोलिले या उपरी भिउजीने व मुधाजीने खवबाजी व येसाजी याचा निरोप घेउनु स्वार आलो मग थुगावासी आलो त्याची उतरे याजपासी सागितली मग हिरोजीने उतर दिधले येसे जे आपण काही या गोस्टी बोलिलो नाही मग तेथून मुधाजीचे निरोप घेउनु आकोलियास तव आलो तुबाजीपंताची भेटी जाली तेही वर्तमाण पुसिले जाला वर्तमाण सदरहुप्रमाणे सागितला असे हे लिहिले सही बोली अडसष्टी असे

गोही

| | |
|---|---|
| | बिा मुधाजी लोणेकर |
| गोविंद जोसी | *पत्र प्रमान त्रिक्क |
| * गोबिंद बळाळी | वीसाळ साक्षी |
| * धुगरी पा | पत्र प्रमाने साक्षी |
| आकोळे | देवाजी परडेकर |
| * गगाजी वेदे | माणकोजी दडनाक |
| | महाजन |
| राघोजी देवीगीरकर | * कोनेरी दडनाक |
| | महाजन |
| * गणावा घुगरी | हिरोसाव खतरी |
| पुना साव खतरी उकरडा | ठीक ( सीक ? ) |
| सोमाजी साली | |

———

* या सह्या बाळबोध अक्षरांत आहेत.

ले. ४६५ } {श.१५८६ कार्तिक शु. २
इ. १६६४ आक्टो. ११

( फा. ब. शिक्का )

ताा तर्फ सरकार व देसमुख व देसपाडिये काा राजूर पाा आकोले व मोकदम व रयाा देहाये मजकूर सुाा सन खमस इजार १०७४ बिदानद काा राजूर इजारदारासि इजारा सायेर आहे त्यापैकी इजारदारी व वरखदाद राजी होऊनू आपल्या इजारायापैकी हरबाजी तुबाजीस इजारा पथक काा राजूर इा। छ रबिलाखर ताा छ १७ रजबू मख्ता बेरीज रुपये ४०८ हरबाजी तुबाजीस इजारदारी गुता केला आहे. तो वसूल करील तरी काा मजकुरीची कमाविस हरबाजीचे हवाले करणे जेणेमाफीक पेसजी कमावीस चालिली आहे तेणे माफीक अमल करणे उजूर न करणे मोर्तब ( फा. ष. मो. )

तेरीख १ रोज माहे रबिलाखर.

---

ले. ४६६ } { श. १६०३ वैशाख शु. ९
इ. १६८१ मे १६

श्री

हकीकत जबानी भोगाई सतीण रंगोपंताची श्री(श्री) रंगोपंत रामाजीपंताचा पुत्र रामाजी हरबाजीचा भाऊ धाकटा हरबा लुमाजीचा पुत्र भागाईनें राजूरच्या देसपाडिये-पणासी हकीकत सागितली सुाा सन इहिदे समानीन अलफ सके १६०३ दुर्मति नाम सवत्सरे वैशाख शुध नवमी शणवार ते दिवसी हकीकत सागितली प्रथम हरबाच्या मारियाची हकीकत रखमाई बाईल लुगडीयासि दिवा लागून जलून मेली होती तिजला सासुरवास सासूने केला होता ते दुःख पोटी होते येसीयासी दिवियाची वाती पदरास लागून जलोन मेली ते रामाजीपंताच्या आर्गा वारे होवून खेलो लागली वारिया मधे रागे करचा पायी सासूच्या तोडावर मारी तिच्या जिवाचा आकांत करी यावर एके दिवसी वोलिले की पिंपरकणीयाकडे न जाणे देशमुख मारा करू पाहतात हे गोस्त अमान्ये करून देसमुखाबरावर हरबा गेला त्या बराबर कान्हाबा हा तुबाजी गंगाधराचा भाऊ होता येते वेलेस हरबा देसमुखाबराबर जात होता पिंपरकणाचे सिवेसी हरबा झोडून पाडिला जिवेची पुरा केला मागे कान्हाबा अंतरे येत होता तो त्यासी चुकावून राजुरास घरास आला तो रामाजी आघूल करीत होता एक पाव भिजविला होता तों कान्हाबाने हांक मारली की घर बुडविले हरबास देशमुखी जिवेच मारले यावर रामाजी तैसाच उघडा बोडका दीड गांव भोये आकोलीयास येऊन संतापासि हाक मारली सदरहू खुनाचा समाचार सांगितला यावर गोत्रज अवघे येवून हरबास आगी पाणी दिधले उत्तर कार्य केले विटाळ फिटलीयावर रामाजी हरबाचा धाकटा भाऊ शहाणा होता हरबा बराबर कारभार करीत होता तैसाच औधेजणी राजुरी ठेविला त्यासि कुलकर्णाचा कारभार करू लागला दाहा वीस वर्षे केली त्यावर विसाजी हरदेवू हरबाचा पुत्र हरबा मारिला ते समई गर्भापोटी होता

तो सोबई विसाजीची माय आजी तिने वाढविला हाहि रामाजी बरावर कारभारास वागत असे त्यावर देशमुखी गावई करून माणिक वोझर पा कोतुल तेथे गेले होते रामाजी विसाजी तेथेच गेले होते तेथे रामाजीस सापे खादले उपाव करून बरा जाला नव दिवस जाले होते कान्होजी नेऊजी देशमुखाचा भाऊ साईकाली घरास आणिला त्यास पुसले कीं काका तुमचे वीख उतरले की नाहीं यावर घरात जाऊन रामाजीचे बायकोस म्हणो लागला की काकी वाटीत तूप घालून दे की याचे वीख उतरले की नाही हें पाहूं म्हण-वून तूप बलात्कारेच वाटीत घालून त्याचे तोंडी लावीताच गलिया पासीं फड्ड आला तेच समई प्राण गेला त्याच मरणें मेला. ऐसे दोन खून हरबा व रामाजी हे खून देशमुखी केले यावर देसमुख गावास आले सोबई विसाजी पंतहि गावास आले विसाजीपंत देशकुल-कर्णाचा कारबार करू लागले यावर आपमरणेच राजुरी मेले त्याचे दोघे पुत्र व स्त्री उमाबाई मेली त्याची सून एक आहे ते माहेरी आहे धामधुमेआधी वर्स दोन राजुरी आपले घरीच मेले हे लिहिले सही रामाजी पंताचे संतान कन्या दोही वडील कन्या जिजाई तिचा पुत्र सखोजी त्रिमल हाली मौजे पिंपलगाउ जोगा पा करडे तेथील कुलकर्ण करीत आहे दुसरी कन्या धाकटी चापाई तिचा पुत्र अंताजी दादो

गोही

रघुनाथ जोसी अकोलेकर
विनायेक जोसी याचे पुत्र

---

ले. ४६७ } { श. १६०७ कार्तिक शु. ७
{ इ.१६८५ आक्टो. २४

श्री.

राजश्री विसाजी माणकेश्वर देशपांडिये पा। अकोले यासि
सयाजि देशमुख मोकदम.
( नां. चि. )

हाराजी †
( नां. चि. )
देसमुख

मौजे धूगौऊ बुा। पा। मजकूर सुा। सन हजार १०९६ कारणे तुम्हास लेहोन दिधले ऐसे जे तुमचे सेत वडिलाचे मौजे मजकूरच्या सिवेस व मौजे वासेराचे सिवेसी आहे ते कहदसाला साले साटी सतर पडिले आहे ते तुम्ही किर्दी करणे यावरी तुम्ही म्हटले कीं

† वहुदली

आपणास इस्तावा सात साला बीलामक्ता दर चाहुरी रुा ६०८. साठी बाल तरी किर्दी करूनू तरी तुम्ही सात साला इस्तावेमाफीक किर्दी करणे माफीक इस्तावे टका वसूल करणे बी ताा

| | | |
|---|---|---|
| सन १०९७ | सन १०९८ | सन १०९९ |
| दर चाहुरी रुा | दर चाहुरी रुा | दर चाहुरी रुा |
| ८८. | १६८ | २४८. |
| सन ११०० | सन ११०१ | सन ११०२ |
| दर चाहुरी रुा | दर चाहुरी रुा | दर चाहुरी रुा |
| ३२८. | ४०८. | ४८८. |
| सन ११०३ | लम | |
| दर चाहुरी रुा | ० | |
| ६०८. | | |

सदरहू प्रमाणे कीर्दी करणे साल बसाल जे कीर्दी कराल त्यास माफीक इस्तावा रुा वसूल करणे यासिवाये सादीलवार व पटी वगैरे बाबती व बेठी बिगार जेवा आवा तुम्ही न देण जोवरी तुमच्यानी कीर्दी होईल तोवरी कीर्दी करूनू खाणे आन टका वसूल करणे जेव्हा तुमचे खातिरेश येईल तेव्हा टिकणे हे लिहिले सही

तेरीख ५ माहे जिल्हेज

---

ले. ४६८ { { शा. ! इ. !

श्री.

यादि आमलदार शा ता

| | |
|---|---|
| कारांकर्दी चागस्ताखान गुमास्ता | कारकीर्दी सलाबतखान |
| कारकीर्दी ( अस्पष्ट ) | आमल जमाल खान |
| आमल चादबिबी | आमल दौलतखान लोधी |
| आमल सादतखान | अमल मलिक अवर यापैकी जागीर रहीम |
| अमल मिया राजा | याचे वेळेस धाकोजी देसमुखी हाती मल्ल |
| कारकीर्दी स्याहाजी जागीर त्रिंबकजी | रंगोजी कडून लेहविली पेस्तर निवाडा करून |
| अमल मोगलाई | रंगोजी दूर केला |
| १ मिरजा आबदुल फता | आपले मिरास |
| १ जानजी कदू अमल खालिसा विसाजी | १ घरठाणा |
| गोविंद सेख धडीचे जो एक साल केले | १ विहीर |
| | १ टाके |
| | १ आबे |

१ अमल अनाजी नारायण सेखदार
१ अमल बिन्हाबनदास
१ अमल मिर्जा मुकीम
१ अमल विसाजी गोविंद सैद बडीचे जोर
येक साल केले
१अमल द्वारकादास
१ अमल मदन मोहन
१ अमल कारतलबखान सिवाजी मोर ( ! )
देऊ आपला भाऊ कथला केला म्हणौन
अमानत केला ता। सन १०६५ सन
१०६४ हिमाईत अमीन घोडोवाने केले
इा सन १०६८ता सन १०७२
ब सन १०७३ साल निमे
२॥ जागीर मिर्जा इभराहम
१ अमल चतरोजी साल
—
३॥

---

## संगमनेर–कुळकर्णी.

ले. ४६९ | श. १५३२ वैशाख शु. ९
इ. १६१० एप्रिल २१

( अष्ट. को. फा. व शिक्का फा. मजकूर )

अज रख्तखाने खुदायेवंत मलीक सर्ज्या मलिकंबर खुर्ला दयाम दौलतहू बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल परगणे संगमनेर बांबी सु॥ सन असर व अलफ बिदानद की वजारतमाब दतो नागनाथ कुलकर्णी ( डावीकडे बहु–दळी फा. शि. ) हाजूर मालुम केले की बाजी पा॥ व त्रिंबक पा॥ मोकदम रया.........ताऊजी सदाफुले व भाऊ भोरड वतन पा॥ कालबाबा व असू ढोण्या व भिऊजी तेली व समस्त राया व दाजी व गोंधल कुलकर्णी का॥ राहाते येही अर्जदास्त बंदगी हजरतीचे पाठविले की आपला थल मौजा संगमनेराखाले पहिले होता त्यास परगणा जरीब जाला ते वेलेसी लाग चावर ५४८।१ केले त्या तरफ नागोजी देसकुलकर्णा चावर २७८८३ पैकी तरफ मजकुरावरी चावर १३॥ तनुरकि केली आणि आपला गाव कहीदीम जमीन जुमला चावर ८०८ होता त्याजवरी चावर १३॥ येकूण चावर ९३॥ केले म्हणवून आपण कमलजी देसमुख व तुका मायदेव देसकुळकर्णी याजपासी होय न होय करावयासी गेलों तेहा उत्तर दिल्हे जे बिरा- बाच्या बनाची जमीन खाले आहे म्हणवून [illegible] जमीन [illegible]

आहे त्यास आपण उत्तर दिधले जे तेथे जे कोण्ही सेत करितील त्याचे वाटोळे होते तुम्ही आपल्या गावावरी जमीन चढऊ नका त्यास तेहि आइकिले नाही म्हणवूनू आपण बंदगी हजरती आलो मुदा मकसूद जाहीर केला जे देसमुख व देसकुलकर्णी आपली आकस करितीती आपली नादणूक त्याखाले होत नाही त्यावरून बंदगी हजरतीचा हुकूम जाला की दिवाणीची शेरणी कबूल करणे तुमचा मौजा आहे तो कसबा अलाहिदा परगणीया सिवाये माहाल करून रजे बरहुकूम आपण सीरणी होन तीन हजार कबूल केले ते दर मीहीन्या होन से ५०० से देऊनू सा महिन्या होन तीन हजार ३००० वसूल करून म्हणऊनू गणेश पाटील बंदगीस व ओलेसी ठेविला होता सा महिने जाले होन पावले नाहीत म्हणऊन गणेश पाटिलास ताकीद जाली हुकूम जाला की हतीचे पाई देणे त्यावरी गणेश पाटिलाने अर्ज केला जे आपण नावाचे पाटील आहो गावामधे कारभार कुलकर्ण्याचा आहे हाली येमाजी कुलकर्णी याचे घरी जयेमंगल घोडा आहे तो लायेक बंदगी हाजरती आहे व रामाजी गोरीयाचे घरी + + + + किमतीचा आहे यैसीया दोन्हीं वस्ता हाजूर आलीयाने होन मजकूर वसूल होतील आणि सेतकरास जीवदान दिल्हेस होईल त्यावरून यमाजी कुलकर्णी व रामाजी गोरी यास तलब केली की घोडा व हिरा हाजूर घेऊन येणे मग यमाजी कुलकर्णी घोडा घेऊनू हाजुर आला आणि रामाजी गोरीयाने हिरा मोकदमापासी दिधला आणि म्हणो लागला की आपण काही हाजूर जाणार नाही, मग तो हिरा तेज पाटील व भोनू भोरडे व आसू ढोण्या व भिऊजी तेली व दाजी कुलकर्णी घेऊन हाजूर आले मग यमाजी कुलकर्णी + + घोडा दाखविला तो बंदगी हाजरतीने खूस केला घोड्याची किमत होन ३००० तीन हजार जाली ते होन येमाजी कुलकर्णी याचे पदरी घातले मग येमाजी कुलकर्णी यास आपण बजीद जालो जे होन आपणासी कर्ज देणे हे होन आपण दिवाणात देऊन शेरणी बेबाख करून गणेश पाटिलास सोडऊन गांवास घेऊन जाऊनु मग तुमचे होन गावी आपण देऊन यावरून यमाजी कुलकर्णी यान होन ३००० तीन हजार आपणास दिधले ते आपण दिवाणात सेरणीबाबती होन ३००० तीन हजार भरिले गणेश पाटील सोडिविला मग हिरा बदगी हजरतीस भेटविला तो हिरा परीक्षवतापासी दीधला तेही त्या हिरियासी खोडी कैफ आहे म्हणऊन जाहीर केले तो कसबे मजकुरीहुन हवालदाराची अर्जदास येऊन पावली की रामाजी गोरी यान हिरा मोकदमाच्या हवाला करून हजूर पाठविला आणि तो लेकरे बाल आपली घेऊन आपले पातशाही टाकून येदिलशाहींचे सरहदेमधे वाईस गेला त्यावरून इतराजी जाली हुकू [म] जाला की हिरियाचा धणी काये सबब पलाला तरी तुम्ही गावास जाऊन त्यास घेऊनु येणे याचा हि हिरा त्यास देउनु मग आपण रजा घेऊन गावास आलो अवघी रयेती मेलऊन कीकती जाहीर केली तीन हजार होनाची पटी करून मागितला तरी आपणामधें काहीं ताकती नाही देशमुखी व देसकुलकर्ण त्या दोहीं वतनाचा हक अदावा जो खाईल तो हे होन देईल यैसा तह करून बदगीस अर्जदास्त लिहिली आहे तरी मेहरवाणी करून येमाजी

कुल्कर्णी यास कसबे मजकुरीची देशमुखी व देसकुल्कर्णाची सनद सादर जालिया गांवांतील कुल कैफती तु टे ली आणि गाव आबाद होईल बराये अर्जदास्त खातिरेश आणून नबर आबादानीवरी देउनु येमाजी बिन बहिरजी इबन केसोजी कुल्कर्णी यास कसबे मजकुरीची देशमुखी व देशकुल्कर्ण मिरासी करून दिधले असे याचा जो गहदम व रो (?) मुशाहिरा भोगभोगवटे चालत आले असतलि तेणेप्रमाणे येमाजी मजकुरास देत जाणे हाली नफर मजकूर सेरणी होन २०० दोनी से भरिले आहेती त्यास इनाम जमीन देसमुखीस चावर १८ येक व देसकुलकर्णास चावर नीम -॥- येकूण चावर १॥ दीड दिधला असे येणे प्रमाणे नफर मजकुरास सनद व तसरीब देशमुखी व देसकुल्कर्णाची देउनु महालास बोहडाविले असे सदरहु प्रमाणे गहदम व रो (?) मुशाहिरा व भोगभोगवटे व हाली इनाम चावर दीड नफर मजकुरासी देणे आणि दर हरसाल खुर्दखताचा उजूर न करणे तुम्ही तालीक घेउनु असल नफर मजकुरापासी राहो देणे † मोर्तबु सुद रुजु सुरनिवीस

तेरीख ७ माहे सफर

बार सूद सुरु सूद

---

ले. ४७० } { श. १५४० ज्येष्ठ व. ५ इ. १६१८ मे २३

नकल

अज रख्तखाने खुदावद मलक आबर दुवाम दौल्तहू बजानेब दाउदखान ठाणेदार का संगमनेर वावी बिदानद सुरुसन तिसा आशर आलफ मोकदम व र्‍यायान कसबे मजकूर आर्जदास्त छ २९ जमादिलावली आली रा छ १७ माहे जमादिलावल तेथे मजमून की कृष्णाजी नरसीह कसबे मजकूर कुलकर्ण सिरजोरीने करितो प्रजावरी बाकी रहात नाही आणि बाकी लाइनी काहाडून फाजील नख्त घेऊन जातो येणेकरून प्रजा रजीस होताती कुले गयाल होताती ना मजकूर काही मिरासीदार नव्हे गैरमिरासी होऊन कुलकर्ण करितो व मसाहती सेती बेरीज आहे ते एक आणि गावात येऊन बेरीज आणीक करितो प्रजेस तेच वख्ती रोखा लिहून देत नाही कारकुनासी सागितले तरी सरजामी करीत नाहीत साल्गुदस्ता रयेतीचे फाजील तहसील कृष्णाजीने नेली आहे ते देविली पाहिजे व कृष्णाजीचे रयेत खुशनुद नाही म्हणोन लिहिले* होते तरी कुलकर्णी गैरमिरासी होऊन रयतीस रजीस करितो व नसल्या बाकी काहाडतो या अमलाची तुम्ही तहकीकी करून वाजबी पुरसीस करीत नाहीत तुमचे ठाणे ते जागा आसता तुम्हास इतकी खबर नाही काये माना आहे आता तमाम आमळ खातरेस

---

† अक्षराचें वळण निराळें. * येथपयतच्या मजकुराचें व याच तारखेचें एक पत्र मलिकंबरानें संगमनेरचे मुकदम व रयत यांस लिहिलें असून ठाणेदारास हकीकत सांगा म्हणजे तो निकाल करील असे आश्वासन दिले आहे.

( आधू ) न सरजामी कीजे रयतीचा दिलासा करून कीर्दी मामुरी होय तो आमल की रयेतीची फिर्याद येऊ न दीजे कोन्हाची कोसीस न कीजे मो सूद
छ सूद ता। १८ माहे जमादिलावर

बार सूद सुरू सूद

---

ले. ४७१ } { श. १५४० भाद्र. शु. १३
इ. १६१८ आगष्ट २३

( फारसी मजकूर )

[१]अज रख्तखाने खुदायेवंद खान मा। सर्के मा। अंबर कुली याम दौलतहू बजानेब कारकुनान पा। सगमनेर बिदानद सु॥ तिसा असर अलफ पंताजि रखमांगद कोकिल कसबे मजकूर हुजूर येऊन मालूम केले जे कसबे मजकुरीचे कुलकर्न आपली मिरास पिढी दर पिढी आहे आपले वडीली नरसो दादो भानजा त्यास यारेदी ठेविले होते तो चालवीत होता त्यासी खुदाई जाली त्यावर त्याचा फर्जंद कृस्णाजी नरसींह आजवर चालवीत होता हाली तमाम रयेती साहेबापासी हजूर येऊन फिर्याद जाली जे कृस्णाजी कुलकर्ण चालवितो मिरासी नव्हे सिरजोरी करून तमाम कसबा रजीस केला मोकदमास मागे घालून सिरजोरीचे अमल करितो म्हणोन मालूम केले साहेबी कृस्णाजी दूर करविला तर मिराम आपली आहे आपनास देववने मालूम जाले हाली पंताजी रखमांगद मिरासी म्हणोन कसबे मजकुरीचे कुलकर्ण दिधले कुगदी देऊन पाठविला असे या पासून कुलकर्णाचे काम घेने कृस्णाजीपासून पेसजीजे कागद वा हिशोब रयेतीच्या मुकाबलियाने घेऊन याचे हवाला कीजे तालीक घेऊन आसल नफर मजकुरापासी असो देणे मो। तेरीख १२ माहे रमजान

---

ले. ४७२ } { श. १५६०—१६००
इ. १६३८—१६७८

श्री

दर बदगी नवाब साहेब

छ अर्जदास्त अज बदगी बदे कमीन बदेगानी बदे हिरोजी दादजी दे ( समु )ख व कृस्नाजी जानो देसपाडिया + + व मोकदम व माहाजन कसबे + + + जुनर व पेठा व देहाये सा। मजकूर मीसाजद
दा। ता। तेरीख १९ माहे रजब साहेबाचे नेक नजरेकरून बखेर सलाबत असे

---

[१] याच आशयाचें एक पत्र ( मिति श. १५४० आश्विन शु. ४ इ. १६१८ सप्टेंबर १३ ) संगमनेर परगण्याच्या ठाणेदाराकडून संगमनेरचे रयत व मोकदम यांस असून त्यात रंताजी रखमांगद याजकरवी संगमनेरचें कुलकर्ण ( कागद देऊन ) घेत जावे असा हुकूम आहे.

बाी साहेब सलामत साहेबाचा परवाना कमीनास सादर जाला तेथे रजा जे हिरोजी कृस्ण कसबे सगमनेरीचा कुलकर्णी हा कुलकर्ण करीत असतां *देवाजी पंतोजी आपले कुलकर्ण म्हणौउनु हुजूर येउनु मालुम केले तरी हर दो नफर यासि समत मजकुरास तुमा (?) नजीक पाठविले आहे तरी तुम्ही बैसोन बरहक मुनसिफी करून याचा निवडियाचा पत्र करून दिधलिया तेणेप्रमाणे खातीर मुबारकेस आणून विले लाउनु म्हणौउनु रजा रजे हुकूम कमीने मजाल्सी करून हर दो वादियापासून राजीनामे आपिले लिहुन घेतले की पा (चजण ?) जो निवाडा करितील तेणेप्रमाणे आपण हर दो जण आइकोन यासि जो हिला हरकती करील तो खोटा म्हणौउनु हर दो जणी लिहून दिधले त्यावरी काजीची मोहर व दाहा जणाच्या साक्षी करून ठेविले त्यावरी आग्रवादी देवाजी पतोजी त्याची तकरीर लिहून घेतली ...चा पछमवादी हिरोजी कृष्ण याची तकरीर लिहून घेतली हर दो जणाच्या तकरीरा खातिरेसी आणिल्या तेथे देवाजी पंतोजीच्या सनदेस मजमून की रयती हुजूर जाउनु फिर्यादी जाली की कृस्णाजी नरसींह मिरासीदार कुलकर्णी नव्हे जोरावरी करितो म्हणौउनु हुजुरून दूरी करून पताजी रखमांगद कोकील मिरासीदार कुलकर्णी आहे म्हणौउनु रयेतीने सांगितले त्यावरून सनद (नफर ?) मजकुराला देउनु कुलकर्ण दिधले नफर मजकूर माहालास येउनु ठाणाची चिठी घेतली ते खुर्दखत व ठाणाची चिठी कमीने मनास आणिलियावरी हिरोजीस पुसिले की तुझी सनद कैसी आहे ते दाखवणे त्यावरून हिरोजी मजकुरे आपली सनद आणून दाखविली तेथे मजमून मिरासी कुलकर्णी यैसा नाही मालुमातीचे खुर्दखत आहे व ठाणाची चिठी नफर मजकुरापासि नाही येणे प्रमाणे मनास आणून कमीन बोलिला की माहालीची व थलीची सडी आणउनु तेणेप्रमाणे हर दो जणाचा निवाडा करून यावरी हर दो वादी राजी होउनु सडीवरी मदार ठेउनु सडी पत्रे लिहिली + + करिता हिरोजी मजकूर राजी नव्हेची नाराजी जाला ते सडीचे कागद मकूफ राहिले यावरी पाचजण मजाल्सी बोलिले की सडी वेगली मुनसिफीदारी मुनसिफी कैसी करावी म्हणौउनु हिरोजी मजकुरास माकुल केले की सडी आणवणे सडी प्रमाणे निवाडा होईल त्यास आपण राजी आहे म्हणौउनु हिरोजीने कबूल केले त्यावरून मागती सडीपत्रे लिहून तयार केली दुसरे रोजी माणूस आणून स्वार करविता हिरोजी मजकूर फडीहून गैर हाजीर होउनु गेला असे यावरून देवाजी पंतोजी कमीनाचा निरोप घेउनु साहेबाचे बदगीस आला असे बदगी रोसन होये हे अर्दास +

---

* या पत्रावर तारीख नाही पण देवाजी पंताजी व हिरोजी कृष्ण या नामावरून या पत्राचा काल श. १५६० ते १६०० चे दरम्यान असावा. वादी प्रतिवादीचे वडीलही श. १५४० त भांडत असल्याचें (ले. ४७१) वरून दिसतें. प्रस्तुत वादी प्रतिवादी (ले. ४७१) मधील वादीप्रतिवादींचे मुलगे असल्याने वरील काळ ठरविणें युक्त आहे.

+ पाठीमागे वाटोळा शिक्का आहे त्यांत ' हीरोजी बीन दादजी हाडे ' ही अक्षरे आहेत.

ले. ४७३ } { श. १६१९ भाद्र. व. १२
इ. १६९७ सप्टे २

( फारशी मजकूर फाटला आहे. )

द बो नरोजी वा नरहर शा गोजाजी गुमास्ते माजुल ( ? ) त्रिमलराऊ व विठलराऊ कोकिल कुलकर्णी का संगमनेर सुबे कुजस्ते बुनियाद सुरु सन ११०७ कारने लेहोन दिधले यैसा जे आपणास माधवराऊ कुलकर्णी का मार बदल मोहसबा साबिक व दफ्तरे १५ पधरा सालासी याबदल घेऊन आले त्यासी आपण दसोजी पाटील का मार यासी हाजीर जमान देऊन खरा जालो येकरार करिता मी कुल दफ्तरे माहासबा साबीक आपले तुहदियाचा व दादो बीरदेऊ आपला भाऊ त्याजपाशी सिरस्ता कागद मतलबी आहेत कुली गुमास्ते मनसुबा देऊन मामला फरूक करून येका महिन्यांत बिला उजूर फारीख करून यासी नवदागर न करून हा मुचलका लेहोन दिधला सही कागद कचे पके कुल बिला उजूर देऊन बिा

तेरीख २५ माहे सफर

सन ४१ जुलूसवाला

गोही ( उजव्या बाजूच्या समासातल्या सह्या )

( नाग.चें चित्र ) कु......ल व रुद्रोजी चानगुली व मल्हारजी खै व सालोजी भाडरे............ना. चि आनदराऊ आा देसमुख पा सुपे शाहिदी सूद ( फारशी शिक्का व त्यांत नांगराचें चित्र ) आजो मल्हार व भगवत विनायक कुलकर्णी का मजकूर ( हें नांव पत्राच्या पाठीवर आहे. )

---

ले. ४७४ } { श. १६५४ माघ. शु. ५
इ. १७३३ जाने. ९

( फारशी वाटोळा शिक्का व फारशी तीन ओळी मजकूर )

आज्ञापत्र समस्त राजकार्यें धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान ता मोकदमान कसबे संगमनेर सुा सलास सलासीन मया अलफ हैबतराऊ याणी हुजूर विदित केलें कीं कसबे मजकूरचे कुलकर्ण आपुले आहे आपले पुतने व गुमास्ते कुलकर्णावरी आहेत त्यासी आपला रुसूम सुरलीत देत नाहीत तरी ताकीद करावी म्हणौन विदित केले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी हक रुसूम व इनाम इत्यादिक असेल ते सुदामदप्रमाणे सुरलीत चालवणे हिला हरकत न करणे हैबतराऊ याचे अवश्यक जाणोन यांचे कुलकर्णाचा हकरुसुमात हरकत न करणे जाणिजे छ ३ शाबान पा हुजूर

---

ले. ४७१ } {श. इ.

यादी माधवराव बिरादर देशमुख आनदराव नाईक देशमुख पो संगमनेर याच्या धाकट्या घराण्यातील असता वडीलपणा आपले वतनाची निमे वाटणी ध्यावी आणि सिका दुसरा करून घ्यावा म्हणोन वाद घालून कज्या उपस्थित करून तकलुबी मालुमाती साधने दाखवितात ती बिरादर धाकटे याचे साधनाचे उपयोगी नाहीत त्याचा तपसील येणेप्रमाणे

१ महजरनामा हाजर मज्यालस सन आर्बा तिसैन तिसा मयाचे साली (श. १५१५ इ. १५९३) लिहिला आहे त्यांत अकरा हजार होनाचा व वतनाचे वांटणीची काही येक संभुत नसता खडोजी बिन कमलोजी बिरादर धाकटे काही दिवस कारभार करीत होते तेव्हां कुभाड करून देशपाडे पो मार याचा गुमास्ता तुको मायदेव म्हणोन होता त्याचा गुमास्ता कोडाजी दामोधर यास हातासी धरून खडोजीने आपल्या साधनाचे उपयोगी पुढे मागे पडेल म्हणोन आपल्या घरीच कोडाजीचे हाते महजर लेहून त्याजवर कोडाजीचे बिकलम घालून महजर करून ठेविला त्यास काही दिवसांनी तुको मायदेव गुमस्ता असता देशपाडेपणाचा वारसा करू लागला सा देशपाडे यांणी तुको मायदेव यास मलिक अंबर याजपासी नेऊन फर्जीत करून देशपाडेपणास खोटा पडला तेव्हा तुको मायदेब याचा गुमस्ता कोडाजी याचे हाते कुभाडाचा महजर घरात लेहून खोट्या गुमस्त्याचे बिकलम घालून मजकूर साधनाचे उपयोगी पडेल म्हणोन करून ठेविला होता तो बिरादर धाकटे याचे साधनांचे उपयोगी नाही यास वर्षे २१६

१ शके १५९३ (इ. १६७१) विरोधी नाम संवत्सरे या साली खडोजी बिन मलजी देशमुख आनंदराव नाईक याचे वडील घराण्यातील देशमुखीचा कारभार करीत असता खडोजीस कामाकाजामुळे महाराजांनी रायगडास नेले होते मागे निमे देशमुखीचे विभागी म्हसके त्यात नागोजी देशमुख याजकडे वडीलपणा याचे धाकटे घराण्यातील भिवजी म्हसका कारभार करीत होता त्याचे चितात की सेलके व म्हसके या दोही तक्षिमात भावाबंदाची वाटणी नाही याजकरिता सेलके याचे तक्षिमेत वाटणीचे कुभाड करावे म्हणजे आपले तक्षिमेत चाल पडेल ऐसा विचार करून संताजी बिन खडोजी सेलके लहान घराण्यातील याचे नावाचा कागद खडोजी बिन मलजी रायगडास असता त्याचे नावे पत्र लिा यांत मार की तुझे बारा गाव वतनी व जमीन चावर येक बिघा साडे बारा हजारास आपण गाहाण ठेविले आहे सोलावे वर्षी खडून घेउ म्हणोन कागद तयार करून त्याजवर आपली नाव निशाणी शिका करून खडोजीची बायको घरी होती तिजला भुलथाप देऊन तिजपासून त्या कागदावर सिका करविला तो कागद भिवजी म्हसका आपल्या साधनास काढितो व माधवराव सेलके ही आपल्या साधनास धरितात. त्यास खडोजी हजर नसता मागे भिवजीने कुभाड करून खोटा कागद करून खंडोजीचे बायकोस भुलथाप देऊन सिका करविला त्यास बारा गाव व जमीन याची वाटणीच कोणी दिल्ही घेतली नसता कल्पित कागद करून साधनास धरितात त्याचा उपयोग नाही त्यास १३८ वर्षे.

१ मौजे पोयेगाव व मौजे ग्रेस येथील सिवेचा कजिया होता त्याचा निवाडा मामलेदार याणी करून पत्र करून गावकरी यास दिल्हे त्याजवर खंडोजीची साक्ष आहे सा पत्र साधनास काढितात त्यास खंडोजी काही दिवस कारभार करीत होता त्यावेळेस पत्रावर साक्ष घातली असेल म्हणोन धाकटे बिरादराचा वडील होतो असा अर्थ नाही तेव्हां ते पत्र वडीलपणाचे साधनाचे उपयोगी नाही यास वर्षे

१ हिसेनामा परमानंद अमीन याचे वेळचा चोहो सिक्याचा आहे तो दरम्यान तकलुफी खोटा कोणी करून दिल्हा नाही सिके खोटे केले त्या पत्रा प्रो चाललेहि नाही असे असता तो हिशेनामा खोटा तकलुबी साधनाचे उपयोगी नाही त्यास वर्षे

१ हिसेनामा दुसरा वगैरे कागद सुभानजी बिन संताजी धाकट्या घराण्यातील कुभांडी होता त्याणे पूर्वी औरंगजेब पातशाहाचे वेळेस नगरचे मुकामी जाऊन तकरीर केली + + वतनाची वाटणी नवीन करून द्यावी आणि खंडोजी देशमुख याणे पनास हजार रुा खाले आहेत ते घ्यावे तेवां सरकारची तलब खंडोजी देशमुखास जाहाली खंडोजीनें तमाम प्रगणे मारचे पाटील जमा करून नगरास नेले तेव्हां चौकसी करून मनास आणिता खंडोजीचे आगी पैका लागू न होय सुभानजी खोटा पडला त्यास कैदेत ठेवावा असे ठरले तेव्हां सुभानजी गैरहाजर जाहाला नंतर खंडोजी देशमुख यास सरफराज करून परवाना दिल्हा की सुभानजी खोटा या भावे परवाना बजिनस आले त्यास सुभानजी कुभांडी त्याणे खोटी पत्रे करून ठेविली ती साधनाचे उपयोगी नाहीत ती पत्रे

१ हिसेनामा दुसरा सन १०६२ (श. १५७४ इ. १६५२) सालचा म्हणोन आहे तो

१ राजीनाम्याची नकल आहे सन १०९९ (श. १६११ इ. स. १६८९)

१ शाहिदीनामा ठाणे कसबे सिनर सन

३ पारसी परवाने अस्तखान वगैरेयाचे वेळचे आहेत

४ कमलोजी देशमुख बिरादर याचे नावे दिवाणच्या हुजती

---

१०

१ मौजे समनापूर पो मार येथील पाटिलकीचा कजिया होता त्याचा निवाडा हकीम सेरा काजी ठाणेदार व देशमुख व देशपांडे पो मार याणी करून त्याचा महजर केला त्याजवर धाकटे घराण्यातील त्याची सही नाव नागर आहे म्हणोन त्या महजराची नकल साधनास दाखवितात त्यास धाकट्या घराण्यातील खंडोजी कारभार करीत होता त्याचे नाव नागर सही केली असल्यास वडीलपणाचे साधनास उपयोग काय त्यात नकल आहे असल कोठे नाही

\+ \+ \+ \+ \+

# सोंधे-सोंधेकर

ले. ४७६ } {श. {इ.

श्री

राजश्री सदासीव नाईक गोसावी यांस

-॥ द अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य—प्रती राजश्री राजाराम छत्रपति उपरि सांप्रत तुम्ही पत्र पाठविले ते पाऊन वर्तमान कलो आले लिहिले कीं आपणाकडील इत्यर्थ करायास रा माधवरायास पाठविलें आहे त्याचे विनंतीप्रमाणें भाषापत्र लिहून पाठविलीयां द्रव्याचा निर्वाह करून देउन ह्मणोन तरी तुम्ही पूर्वी माधवरायासमागमे पत्र पाठविले त्यावरून स्थलाचा व द्रव्याचा निर्णय करून भाषापत्र लिहून देऊन मा। बयाजी विठल व रायाजी रखमांगद यांस तुम्हापासी पाठविले आहे त्याबा पठाणाच्या व साउकरांच्या हुंडिया करून पाठविलीया आहेत त्यास वाइदा चुकोन गेला अद्याप पैका प्रविस्ट जालियाचे उतर आले नाही याकरितां त्या लोकांचा बोभाट जाला आहे तरी ऐसे न करितां केलिया निर्णयाप्रमाणें ज्याचे त्यास द्रव्य प्रविस्ट करून उतर पाठविलें पाहिजे वरकड वर्तमान रा माधवराउ तुमचे हेजीब येही लिहिले आहे त्यावरून कलो-येईल भाषापत्र रा माधवरायाचे विदमाने साउकरापासीं दिल्हे आहे पैका प्राविस्ट होतांच भाषापत्र तुम्हापासीं पाठऊन देतील जाणिजे बहुत लिहिणे तरी तुम्हीं ( बि ) सुज्ञ असा

(बा) श्रीधर्म प्र-<br>
द्योतिताशेष व<br>
र्णा दाशरथेरिव<br>
राजारामस्य मुद्रे<br>
यं त्रिश्ववंद्या+<br>
विराजते

(ब) मर्या<br>
देयं विरा<br>
जते

———

ले. ४७७ } {श. {इ.

श्री

राजश्री सदासीव नाईक सोंधें गोसावी यांसि

-॥द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——प्रति राजश्री राजाराम छत्रपति जोहार उपरि येथील कुशल जाणऊन स्वकीये लेखन करीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते रा माधवराउ यांचे विदमाने प्राविस्ट जाले लेखनार्थ अवगत होऊन समाधान जाले लिहिले कीं पूर्वी निर्णये केलियाप्रमाणें द्रव्य त्यांचे त्यास प्रविष्ट करून भाषापत्र घेतले

---

+ पत्राच्या प्रारंभी उजव्या कोपऱ्यांत कानडी अक्षरांनीं 'भाव सं वैशाख प्रतिपदा तिथिगे वंतु 'असें लिहिलें आहे.

पुढेंहीं उभयेपक्षीं स्नेह उतरोतर चालोन स्वधर्माची अभिवृधी व्हावी हेच अपेक्षा धरितों म्हणौन विशदे लिहिले व कितेक वृत्त माधवरायानीं सांगितले तरी तुमचा आमचा स्नेह कांहीं नूतन नव्हे पूर्वापार तीर्थरूप राजश्री——कैलालवासी स्वामीपासून चालत आहे तेथें काये न्यून पडो पाहतें थैसीयास गोसावीयानी जो निश्चय केला आहे त्यास अंतराये पडों नेदितां दिवसेंदिवस सौहार्द्रता वाढे ते गोष्टी करणे ये विशीचा विशदार्थ निराले पुरवणीस व रा कोनपा नाईक यांचे पत्रीं लिहिला आहे व मध्यस्तांस व माधवरायास सांगितले आहे ते लिहितील त्यावरून कलो येईल तदनुसार निर्वाह केला पाहिजे आम्हापासून केल्या निर्णयास अंतर पडणार नाहीं तुम्ही आपणाकडून सहसा अंतर पडों न देणे (नि)बहुत लिहिणे तरी गोसावी सुज्ञ असा ( मुद्रा व सीमा ले. ४७६ प्रमाणें )

---

ले. ४७८ } {श. / {इ.

श्री

राजश्री सवाई सदासीव नाईक गोसावी यांसि

-।। द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——प्रति राजश्री राजाराम छत्रपति **जोहार** उपरि येथील कुशल जाणऊन स्वकीय लेखन केले पाहिजे विशेष गोसावी यानी राजकारण प्रसंगानिमित्य राजश्री मध्वराउ रखमांगद यांस आम्हापासीं पाठविलें येंही येऊन सायंत वर्तमान विदित केले त्यानंतर बोलीचालीचा मुशकस होऊन भाषांपत्रें दिल्ही द्रव्याचा निर्वाह व्हावा यास्तव मध्वराउ येथे राहिले होते त्यास गोसावी यानी वचनाप्रमाणे द्रव्याचा निर्वाह केला यावरून समाधान वाटले प्रस्तुत येथील प्रसंग येक प्रकार जाला आहे तो अर्थ तुम्हास कललाच असेल यैस्या विशम प्रसंगामधें सर्वस्वें सानकुलता करून स्नेह अभिवृधीस पाववावा हें तुम्हास विहित आहे तथापि हें राज्य देवांब्राह्मणाचे या राज्याचा अभिमान श्री——स आहे तो कल्याण करीलच यांत संदेह नाहीं तुम्हास ही जो उचित पदार्थ असेल तो करून आमच्या अभयुदयाचे विभागी होणे वरकड कितेक वर्तमान येथील मुख्य सामादिकानी तुम्हास लिहिले आहे त्यावरून राजश्री मध्वराउ रखमांगद मुखवचने सांगतील त्यावरून कलो येईल बहुत लिहिणे तरी गोसावी ( नि ) सुज्ञ आसा ( मुद्रा व सीमा ले. ४७६ प्रो. )

---

ले. ४७९) पौ {श. १६१८ आषाढ शु. १५ / इ. १६९६ जुलै ४}

श्री

महादेव (बाळबोधींत)

राजश्री सवाई सदाशीव नाईक सोंधें गोसावी यांसि

-॥ द अखंडीतलक्ष्मीआलंकृत राजमान्य——— प्रति राजश्री राजाराम छत्रपति उपरि तुम्ही मा। बायाजी विठल व रायाजी रखमागद यांसमागमे पत्र पाठविलें होतें तें पाऊन लिहिला अभि:प्राव व उभयेतानी कितेक स्नेहाचे प्रसंग मुखवचनी सांगितल्यावरून त्यासारिखें अंत:करणास आणून त्याचे उत्तर उभयेता मशारुईलेस सांगून त्यांहाती तुम्हास लिहिविलें व आम्ही आपलें उत्तरहि पाठविलें यैसें उभयेपक्षीं उत्तर प्रतिउत्तर पाठवीत असतां मग तुम्ही आपणाकडील भले मनुश रा। कोनेरपंत यांचे विद्यमाने रा। मध्वाजी रखमांगद यांसमागमें निर्वाहपूर्वक सांगून पाठविलें तेंही राजश्री शंकराजी पंडीत सुमंत व राजश्री निलो कृष्ण यांचे गुजारतीने विदित केलें कीं उभयेपक्षीं पूर्वापर स्नेह सारोधार चालोन आला आहे व पुढेंही उतरोतर चालावा यैसियासी पंजमहाल देश दुर्गादि आपणांस मोकरर करून पारंपरा चालावें यैसें निर्वाह करून भाषापत्र द्यावें यासी देऊं करार केलें मखता होन प्रल्येघटी २२२०० बावीस हजार दोनसे नेम करून लिहून पाठविलें यावरी यासी मान्य करून सदरहु पंजमाहाल देशदुर्ग तुम्हास आम्ही आपुले मनःपूर्वक भावसंवत्सरीं मोकरर करून दिल्हे बी॥

| | | |
|---|---|---|
| ता। आंकोले देहाये देखील कोट व महेंद्रगड १ | ता। कडवाड देहाये देखील कोट १ | ता। सिवेश्वर देहाये देखील कोट १ |
| ता। कदरें देहाये देखील कोट व मधुरगड १ सिंदीगड १ | ता। अडव देहाये देखील लंग | ता। खोलगड देखील खोलगांव १ लंग |

येकून माहाल ५ पांच व कोट ४ च्यार व गड ४ च्यार यासी नख्त होन प्रलय घटी बावीस हजार दोनसे घेऊन तुम्हास सदरहु माहाल ५ व कोट ४ व गड ४ दिल्हीं आहेत तुम्ही आपले वौशपारंपरेने अनुभऊन सुखरूप असणें तुमचे देश विलायत सोंधें देहाये देखील हुडवा वगैरे मुलूक तालुका बंकापूर व आम्ही क्रियापूर्वक दिल्हें माहाल पांच व कोट च्यार व गड च्यार यैसें तुमचे असे सदरहु विलायेतीस आम्हांकडून उपसर्ग होऊ देणार नाही यासी दरसाल पैके आम्हास देणे तरी हालीं तुम्ही यवनासी देत आहा त्यास भग्न करून मग तेंच द्रव्य आम्ही घेऊन या वीतरीक्त तांब्रांचे कबजातील राज्य तुम्ही

बांधून घेणे त्यासी दरसाल तुम्ही काये द्रव्य देणे करार कराल तेच आम्ही आपुले सामराज्य वैभोवादि तें द्रव्य तुम्हापासून घेणारास भग्न करून तेच प्रा दरसाल द्रव्य आपण सालेसाल घेऊं तेही मुलूक तुम्हासच चालउन देऊं शत्रूचा उपसर्ग तुम्हास जालियाने त्याविषई आपली फौज पाठऊन उपराला करून स्नेहासि कधी अंतर पडणार नाही क्रियापूर्वक दिल्हीया वचनासी या लिहिलेमधें काहीं अंतराय पडेल तरी आम्हास आपले श्री ची आण असे अंतःकर्णपूर्वक या प्रसंगासी श्रीचा बेल व कसेची माल व रोटी काढून पाठविलें आहे तें घेऊन तुम्ही याच प्रा स्नेह चालऊन दिवसेंदिवस अभिवृधी करणे (नि)बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा
( मुद्रा व सीमा ले. ४७६ प्रो. )

पौ धाता सं आषाढ सु॥ १५

---

ले. ४८०

पौ { श. १६१९ वैशाख शु. ६
{ इ. १६९७ एप्रिल १६

श्री.

वाराणशि (बालबोधींत)

राजश्री सदाशिव नाइक सोंधें गोसावी यांसि

-॥द अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य—— प्रति राजश्री राजाराम छत्रपति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन कीजे विशेष राजश्री कृष्णाजी भास्कर यांसी श्री यात्रेस जावया आज्ञा होऊन रवाना केले आहेत हे तुमचे देशातून जातील तरी तुम्ही यांस मदत आपणाकडील लोक देऊन सुरक्षीत आपले सरहद पावेतों पावते करणे याविशई अंतर पडो न देणें हे कार्य आम्हांस अगत्य असे ऐसं जाणोन लिहिलेप्रमाणे मशारूनइलेस आपले सरहदपर्यंत सुरक्षीत पावते करणे जाणिजे बहुत लि॥ तरी (नि)सुज्ञ असा.
( मुद्रा व सीमा ले ४७६ प्रो )

पौ ईस्वर वैशाख सुद्ध ६

---

ले. ४८१

पौ { श. १६२० पौष शु. १०
{ इ. १६९९ जाने. १

श्री.

बहुधान्य संवत्सर पुश्य शु. १० मी
( कानडी अक्षरें )

१ राजश्री सदाशीव नाईक सोंदे गोसांवी यांसि

द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य —— प्रती राजश्री राजाराम छत्रपति उपरि सांप्रत कटे फौजेनिसी स्वार होऊन आम्ही कर्नाटक प्रांतास जात

आहों या प्रांतीचा कुल मखतीयार राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांवरि देऊन ठेविले आहेत व तुमचें राजकारण यांकडे दिल्हें आहे तरी तुम्हीं आपला हेजीब यांजपाशीं पाठऊन देणें हे तुम्हाकडील जो तह रह करून देतील तेणेंप्रमाणे आम्ही चालऊन व प्रयोजन प्रसंगेंकडून पंडित मशारनुले तुम्हास जमावाविसीं लिहितील ते समई तुम्हीं स्वारांचा व हशमाचा जमाव पाठऊन देत जाणे हर येक कार्यभागाविसीं लिहीत जातील तें चालवायास अंतराये सर्वथा न करणें हे तहरह जो करितील तो आम्हीच केला येसें मानून यांसीं अनकूलतेने वर्तत जाणे जाणिजे बहुत लिहिणे तरी (नि)सुज्ञ असा (मुद्रा व सीमा ले. ४७६ प्रो)

---

ले. ४८२ } {श. १६२४ वैशाख व. १०
इ. १७०२ मे १०

श्री

श्रीमहादेव श्रीसुबया

राजश्री सवाई सदासीव नाईक सोंधे गोसावी यांसि

द श्रीमंत् सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——स्नेहपूर्वक हिंदुराउ घोरपडे ममलकतमदार रामराम उपरि येथील क्षेम जाणून गोसावीयानी आपले स्वानंद वैभव लिहून पाठविले पाहिजे सांप्रत रा। रंगो त्रिमल यांसमागमे पत्रिका पाठविली होती त्यावरून व मारनिलेनी कितेक स्नेहाभिवृधीचा प्रसंग सांगितल्यावरून सर्व भावार्थ कलो आला मागें चंदीस असतां समई माहाराज कैलासवासी राजश्री——स्वामीचे संनिधेसी रा। कोनेरपंतांचे विद्यमाने मल्वाजी रखमांगद या बराबरी पत्र लेहून पाठविलें होते तेथे त्याने राजश्री शंकराजीपंत सुमंत व राजश्री निलो कृष्ण व आमचे गुजारतीने दर्शन घेऊन पत्र प्रविष्ट करून सर्व वर्तमान श्रुत केले (पहा ले. ४७९) व सांगितले कीं उभयपक्षीं स्नेह चालोन आला आहे पुढेंही दिवसेंदिवस आधिकोतर सख्यत्व वाढवावा घांटांखालील आकोलें वगैरे माहाल पांच व कोट ४ व मौजे देखील गड ४ इनाम करून देऊन वौंशपरंपरा चालवावयास अंतर न होये सारिखे क्रियापत्र लेहून द्यावे म्हणोन विनंती केली त्यांसि राजश्री कैलासवासी स्वामीयानी मनास आणून मान्य करून इनाम करून दिल्हेचे महाल व कोट व मौजे देखील गडहाये बितपशील (ले. ४७९ प्रो.) येणेप्रमाणें माहाल ५ पांच व कोट ४ च्यारी व मौजे देखील गड ४ च्यार इनाम करून दिल्हे आहे वौशपरंपर अनभवणें या वेगली विलायेती सोंधा देहाये देखील हुडवा वगैरे मुलूक तालुका बंकापूर ऐसे तुमचे असे सदरहू विलायतींस आम्हांकडून उपसर्ग होउ देणार नाही या वितरीक्त तांब्राचा देश व घाटावरी व घांटाखाली जे काये देश संपादाल व त्या देशास्तव येवनासी जे द्रव्य प्रतिवर्षी द्यावयाचे करार कराल त्यास आपले सामराज्यादि

तांब्र भग्न करून त्यासी देणें द्रव्य मग आपण घेउ तेंहि देश तुम्हास चालऊन शत्रूचा उपसर्ग तुम्हास लागलियां त्याविशीं आपली फौज पाठऊन उपराला करून स्नेहास कधीच अंतर पडणार नाहीं क्रियापूर्वक दिधलिया वचनास या लिहिलियामधें कांहीं अंतराये पडेल तरी आम्हास आपले श्री महादेवाची आण असे अंतःकर्ण पूर्वक या प्रसंगास श्री——च्या बलाची माला व रोटी पाठविली असे घेऊन तुम्ही स्नेहाभिवृधी करून चालवणें म्हणउन दिल्हे भाशापत्राची तालीक पाठविली ते पाहोन अभिप्राव कलों आला गोसावी याचे कार्य भागासी राजश्री——कैलासवासी स्वामीने भाषापत्र लेहून दिल्हियाप्रमाणे आम्हीं क्रिया पत्र लेहून द्यावी म्हणोन तरी जे काये राजश्री ——कैलासवासी छत्रपति स्वामीने तुम्हास क्रियापूर्वक पत्र लेहून दिल्हे आहे तेच क्रिया आमची आहे त्याचप्रमाणे सदरहु पांच महाल व कोट च्यारी व मौजे देखील गड च्यार ४ तुम्ही आपले वौशपरंपरा अनभवणे या वेगलें तुमचे देश विलायती सोंधे व देहाये देखील हुडवा वगैरे मुलूक तालूक बंकापूर व घाटावरी घाटाखाली तुमचे कबजातील यास आम्ही आपल्याकडून उपसर्ग होउं देणार नाहीं पुढें तुम्ही घाटावरी व घाटाखाली तांब्राचे कबजातील जो देश संपादून घ्याल ते सुखीनें तुम्हासी सदरहु लिहिले प्रमाणें चालवून देऊन तैसेंच घाटावरी व घाटाखाली तुमचे सरदेचे विलायेतीचे देशक वगैरे कोण्ही येऊन नाही ते क्षुद्र आम्हापासी सांगितलीयां आम्ही त्यास आसिरा देणार नाहीं तांब्राचा व इत्यादिकांचा उपद्रव तुम्हास जालिया आपले तर्फेने फौज पाठऊन उपराला करून व छत्रपतीचे शाहीचे लोकांकडून तुमच्या देशास उपद्रव होउ देणार नाहीं या लिहिलियास अंतराये पडिले तरी आम्हास आमची कुलस्वामी——ची आण असे अंतःकरण पूर्वक पाहिले येक पत्र लेहून दिल्हें आहे आतां हीं हे पत्र लेहून दिल्हे असे त्या प्रसंगास श्री——च्या बेलाची माला व रोटी पाठविली असे घेऊन तुम्ही स्नेह आभिवृधी करून चालविलें पाहिजे‡ चित्रभानु संवत्सर वैशाख बहुल दशमी भानुवासर सुहूरसन इसने मया अलफ छ २२ जिल्हेज बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा हे विनंति

लेखन
मर्यादा

पो चित्रभानु संवछर जेष्ठ शुध १०

---

‡याच स्वरूपाचें एक दुसरें पत्र असून त्यांत शेवटीं जो निराळा भाग आहे तो पुढें दिला आहे.

चित्रभानु संवत्सर कार्तिक शुध त्रयोदसी सुहूरसन सलास मया अलफ छ १२ जमादिलाखर हे विनंति

पौ चित्रभानु संवछर पुश बा ३ ... ... बार बा मध्वराउ पूर्वप्रमाणे हिंदुरायाचे क्रियापत्र

ले. ४८३ {श. १६२७ आषाढ व. १२
इ. १७०५ जुलै ६

श्री सुबराज

राजश्री सवाई बसवालिंग राजे सोंधे गोसांवी यांसि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य—श्री हिंदुराउ घोरपडे ममलकत मदार रामराम उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केले पाहिजे विशेष राजश्री——स्वामीचा व तुमचा स्नेह पूर्वीपासून चालत आला असतां कितेक दिवस तुम्ही कालोचित बुधीने वर्तो लागलेस यास्तव राजश्री——स्वामीचे आज्ञेप्रमाणें तुमचे देशास उपद्रव देऊन तुम्हापासून आम्हास द्रव्य घेणे लागले ऐसीयास सांप्रत तुम्ही आपले हेजीब रा। देवजी विश्वनाथ हुजूर पाठऊन आपणाकडील तहरह करून देशास उपद्रव वारिला पाहिजे म्हणोन राजश्री——स्वामी संनिध विनंति केली त्यावरून राजश्री——स्वामी कृपाळु होऊन तुम्हाकडील तहरह करून प्रतिवर्षी द्रव्य द्यावयाचा निश्चय केला बिता।

किता भाषापत्र

घाटावरील सोंधे विलायेत
पूर्वी देखील ता। हुडवा
वगैरे मुलूक देखील
बंकापूर १

घाटाखालील देशदुर्ग
राजश्री स्वामीनें चंजीचे
प्रसंगी दिल्हे
१ ता। आंकोले दा। कोट
व महींद्रगड
१ ता। कडवाड दे।
कोट
१ ता। सिवेश्वर दे।
कोट
१ ता। कदरे दे।
कोटगड
१ ता। अडवाट
१ खोलगड खोलगाउ
१ सिंदीगड
———
७

तांम्राकडून देश तुम्ही इजारा करून घेतला आहे.

ता। सुपे देहाये देखील
१

ता। खेजरवाली देहाये देखील
१

ता। चंद्रवाडी देहाये देखील
१

ता। हेमाडबारसे देखील देहाय
१

ता अग्रहार देखील देहाये मौजे काकोडा १

१

महाल पाच व मौजे येक यासंमधे प्रतिवर्षी रुपये १००००८

येकून पूर्वील सोंधे विलायेती
दो तो हुब्बा वगैरे मुलूक
तालूक बंकापुरु राजश्री
स्वामीने चंजीचे मुकामी
दिल्हे घांटाखाले गड
च्यार व कोट च्यार व
महाल पांच मौजे येक
त्यासंबंधी प्रतिवर्षी
रुपये २५०००८

श्री राजाराम
+ + +
परः । सुनस्य
मुद्रा षण्मुख
स्य विराजते

येकून रुपये पंचतीस हजार करार करून तुम्हास भाषापत्रे लेहून दिधली आणि आपले सेनेसंमंधे कोण्हाचा उपसर्ग लागो न द्यावा सदरहु देशास तोसीस न व्हावी ऐसा निश्चय केला. ऐसीयासी तुम्ही हा कालपर्यंत राजश्री स्वामीसीं विरुधतेने वर्तत होतेस यास्तव आम्हीं तुमचे देशास उपसर्ग देऊन तुम्हापासून प्रतिवर्षी रुपये १७०००८ सतरा हजार घेत आलो त्यास हाली तुमचा तह हुजूर जाहाला यास्तव राजश्री स्वामीनी आम्हास आज्ञा केली कीं सोंधेकरापासून प्रतिवर्षी सतरा हजार रुपये तुम्ही घेता ते न घेणें म्हणोन तरी तुम्ही राजश्री स्वामीसी रुजुवात करून हुजूर द्रव्य निर्वाह करीत असता आम्हीं प्रत्यकवादे तुम्हास उपसर्ग करावा द्रव्य घ्यावे ऐसे नाही तरी हुजूर निश्चय केलियाप्रमाणे पंचतीस हजार रुपये प्रतिवर्षी राजश्री स्वामीचे सेवेसी प्रविष्ट करीत जाणे आम्ही आजीपर्यंत तुम्हापासून सतरा हजार रुपये घेत आलों त्याचा तगादा अतःपर तुम्हास आम्ही लावीत नाहीं सदरहु सतरा हजार रुपये याउपरी तुम्ही आम्हास देत नव जाणे आम्हाकडील वरातदार जे पहिले तुम्हाकडे गेले आहेत त्यास आम्ही ताकीद रोखे पाठविले आहेत ते त्यांस देणें आणि हे पत्र पावलिया आगोधर जे तुम्हीं त्यास दिल्हे असेल ते असेल या उपरी तुम्ही यास एक रुका न देणे त्यास निरोप देणें ते उठोन येतील आम्ही राजश्री स्वामीसी निष्ठेने वर्तोन केले तहप्रमाणे निर्वाह करीत असता आम्हाकडील येक जरा उपसर्ग तुमच्या देशास होणार नाहे येविशी समाधान असों देणें. तुम्ही केल्या तहास अन्यथा केलिया जे राजश्री स्वामीची आज्ञा होईल तैसा तुमच्या देशाचा परामर्ष करावा लागेल (नि) रा छ २६ रबिलोवल मुहूर सः

सांत मया अलफ बहुत लिहिणे तरि तुम्ही सुज्ञ असा कृपा असों दीजे हे विनंति

पार्थिव संा ( कानडी अक्षरें )

---

ले ४८४ पॉां { श. १६३९ आषाढ शु. २.
इ. १७१७ जून २९

श्री

राजश्री सवाई बसवलिंग नाईक सों ( धे ) गोसांवी यांसि

-॥द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य——श्रो। गंगाधर त्र्यंबक कृतानेक आसीर्वाद उपरि अत्रत्य कुशल जाणोन स्वकीये लेखन केलें पाहिजे विशेष सांप्रत राजश्री भानजी बलाल हेजीब याणें पत्रे पाठविली त्यावरून जो प्रसंग जाला तो व पुन्हा बहुता प्रकारे रदबदल करून बहुतां प्रेत्ने गोसांवी यांसि वर्तमान कलावें म्हणोन पत्रें पाठविजेसें केले ते आद्यंत वृत्त मध्यास्तांस व रा भानजी बलाल हेजीब यांसि लिहिलें आहे त्यावरून तुमचे उभयतां सबंधीक लिहितील त्यावरून अवगत होईल गोसांवी यांचे लिहिल्या-प्रमाणे दत्वष्टीचा परिहार करून तत्संबंधीक अगर्दीच इलाखा तोडिला गोसांवी यांकडील कोण्ही प्रमुख आले म्हणजे विशेष सारश भरावें येसें योजिलें असतां गोसांवीयानी तितके आमचे श्रम निरर्थक करून उफराटें विरुध करून घेतलें हे गोष्टी काय समजोन केली हें न कले बरें याउपरी तऱ्हीं विवेक व्हावा येसें चित्तीं असेल तरी कितेक अर्थ रा गोपाल + + या बराबर सांगोन पाठविला आहे तो चितास आणून तद्नुरूप अविलंबें सर्व समर्थक निर्वाह होये तें केलें पाहिजे नाही तरी आम्हांवरी बोल ठेवावा येसें नाहीं रा भानजी बलाल हेजीब यांसी÷ हुजूर यावयाची आज्ञा जाली आहे त्यांस सत्वर रवाना केलें पाहिजे वरकड सविस्तर भानजी बलाल सांगतील व तुमचे उभयेता लिहितील त्यावरून कलेल वि जाणिजे बहुत काय लिहिणे

(वा) श्री
शिवप्रातिसुधा
पूर्णत्र्यंबकेंदोर्महो-
दया रघुनाथार्णव
भुवा मुद्रा ज्योत्स्ना
भिवर्धते

(अ)लेखना
वधिर्ज
यति

पो। हेमलंबी संवछर आशाड शु २

---

÷ येथें ' यांसि ' या शब्दांतील ' सि ' या अक्षरा वर प्रथम अनुस्वार दिला होता तो खोडला आहे.

ले ४८५ }                                                    पौ { श. १६३९ श्रावण शु ५
                                                                { इ. १७१७ जुलै ३१

श्री

राजश्री सवाई बसवलिंग नाईक सोंधें गोसांवी यांसि

-॥द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——स्नो गंगाधर त्र्यंबक सुमंत कृतानेक आशीर्वाद उपरि अत्रत्य कुशल जाणोन स्वीय लेखनें संतोष पावविले पाहिजे विशेष स्वकीय वार्तिकारांसमागमें पत्र प्रेषिलें तें प्रविष्ट जाले पत्रार्थ अवगत जाला राजश्री ——स्वामींचे सेवेशी पत्र पाठविलेंत बहुता येत्ने चित्त प्रसंन्न करून प्रविष्ट केलें आद्यंत वृत्त निवेदिलें त्यावरून जाला प्रसंग तो पहिलें उभयेतां कडून लिहिविला होता त्यावरून अवगत जालेंच असेल तदुत्तर कितेक विक्षेप प्राप्त जाले होते तथापि तिताकियाचा परिहार करून उत्तरें पाठविलीं आहेत सारांश राजश्री——स्वामीस तुमचा पूर्ण अभिमान आहे आम्हास तरी यापेक्षा विशेष काय आहे कोणेविशई अंतर पडो देतों यैसें नाही गोसावीयानी राजश्री भानजी बलाल हेजीब या समागमे राजश्री हिंदुरायाबाबत बाकी राहिला यैवज व साल मजकूरचा देखील हुजूरचा व अंतरजेचा यैवज यैसा अति सत्वर पाठविला पाहिजे. राजश्री——स्वामींची स्वारी याच दिवसांप्रत प्रसक्त जाली आहे याकरितां त्वरा कीजे हिंदुरायांकडील उपसर्ग लागेल म्हणोन म्हणिजेल तरी ते विषई जे बलक्टी करावयाची ते केली आहे त्यांसी व त्यांसमागमींचे सरदारांस न्यायनिष्ठुरवादें जें......करणे ते केली आहे त्याविरहित राजश्री आपाजी सुरोज जिवाजी सिंदे रामराव यांसीही पत्रें पाठविली आहेत किंबहुना समयासी खासा राजश्री—स्वामीच त्या प्रांते येऊन उपसर्गपरिहार करणार यदर्थी किमपि संदेह चित्तांत नाणितां लिहिलेप्रमाणें द्रव्याची रवानगी केली पाहिजे अतःपर ही नसती आलोचना करून द्रव्यास विलंब करिजेल तरी आम्हावरी शब्द ठेविला न पाहिजे हा अर्थ व वरकड सविस्तर राजश्री भानजी बलाल यांसी लिहिला आहे ते सांगतील व तुम्हे उभयता लिहितील त्यावरून कलों येईल (नि)सुज्ञा-प्रती विस्तार काय लिहिणे बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा ( मुद्रा व सीमा ले. ४८४ प्रो. )

पौ हेमलंबी संवछर श्रावण शुध ५

---

ले. ४८६ }                                                    { श.
                                                                { इ.

श्री.

राजश्री सवाई बसवलिंग नाईक सोंधें
गोसांवी यांसि

-॥ द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य——स्नो॥ गंगाधर त्रिमल सुमंत आशीर्वाद उपरि अत्रत्य कुशल श्री——कृपाकटाक्षवीक्षणें वर्धिष्णु जाणून स्वीय

कुशललेखनें संतोषितांतःकरण करीत असिलें पाहिजे विशेष गोसावीयानीं सांप्रत राजश्री भानजी बलाल हेजीब हुजूर आले यांसमागमे व तदनंतर वार्तिकासमागमें पत्रें प्रेषिलीं ती प्रविष्ट जालीं आपण केल्या नियतप्रमाणें वर्तत असतां व पुढें ही कोणे विषई अभ्यंतर पडणार नाहीं म्हणून आपले प्रामाणिकतेचा व निर्वाहकतेचा अर्थ विषदें लिहिला व मुखतः मारनिलेनीं निवेदिला व गोसांवी यांकडील देवजी विश्वनाथ व रामाजी शिवराम याणी सांगितला तो सर्व ही कलोन राजश्री स्वामींचे सेवेसी विदित केला त्यावरून राजश्री—स्वामी परम संतोषी जाले तरी गोसावी प्रामाणीक निर्वाहक तैसेच आहेत चालत आले विवेकास अन्यथा होईल हें काय घडो पाहतें हालीं सीसाला द्रव्य पावलियाचें उत्तर प्रेषिले आहे प्रविष्ट होईल द्वैत्यष्टिचा परिहार केला असतां राजश्री हिंदराउ वारंवार लिहितात म्हणौन तरी त्यांस यर्तद्विषई उपसर्ग न करावा म्हणून निर्वाहरूप सांगावयाचें रीतीनें सांगितलें आहे प्रस्तुत ही राजश्री स्वामीनें यतद्विषईंही पत्र प्रेषिले असें त्यास सहसा अंतर पडणार नाही येविषई आपलें पूर्ण समाधान असो दिल्हे पाहिजे राजश्री जिवाजी सिंदे व यसाजी मोहिते याणीं देशास उपसर्ग देऊन बहुतच नाश केला म्हणून तरी त्यांणीं ऐसी हे गोष्टी करणे अनुचित जाणोन त्यांस मुजरद हुजुरीयांसमागमें न्यायनिष्ठुरवादें आज्ञापत्रें सादर केली आहेत या उपरी ते ऐसी गोष्टी करणार नाहीत आम्हापासून गोसावीयाच्या कार्यास सहसा अतर होणार नाहीं वरकड सविस्तर अर्थ राजश्री भानजी बलाल यांसी सांगीतला आहे व सांगतील व गोसांवी याकडील उभयतां लिहितील त्यावरून कलेल*, राजश्री आपाजी सुरो व जिवाजी सिंदे व रामराऊ यासि संस्थानचे साह्यतेविषई जे आज्ञा कर्तव्य ते केली आहे व हालीं ही पत्रें सादर केली आहेत समयोचित त्यास जे लिहिणें ते लिहून सांगोन पाठवणें बहुत लिहिणे तरी गोसावी ( नि )सुज्ञे असे

(वा) श्री शंभुछत्रप
ति हर्षनिदान
रघुनाथसुत
तीमाजी पंडित
मुख्य प्रधान

( लं ) लेखन सीमा
समुल्लसति

———

* गिरजोजी यादव याने बसवलिंग यांस एक पत्र लिहिले आहे त्यांत येथपर्यंतचा मजकूर असून पुढील मजकूर व गिरजोजीचा शिक्का जास्त आहे.

श्री
(कु.ब.)कऱ्हाडादि
महालानां सर
देशमुखस्य हि ॥
गिर्जोजी यादवस्यै
षा मुद्रा मूधोजि
जन्मनः

बहुत लिहिणें तरी गोसावी (नि) सुज्ञ असेती

(कु) लेख
नावधि
मुद्रा

ले ८४ } पौ {श. १६३९ श्रावण शु. ५
{इ. १७१७ जुलै ३१

श्री

राजश्री सवाइ बसवलिंग नाइक सोंधे गोसावी यांसि

-॥द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य—श्रो गिरजोजी यादव राम राम उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिलें पाहिजे विशेष प्रस्तुत गोसांवीयानी वार्तिकासमवेत पत्र प्रेषिलें ते प्रविष्ट होउनु लेखनार्थवडुन चित संतोषातें पाविलें ऐसेच सर्वदा पत्रप्रेषणी संतोष पावविला पाहिजे या नंतर संस्थानास राजश्री हिंदुरायांचा उपसर्ग लागतो त्याचे परिहाराविषई विशदें लिहिलें व गोसावी यांजकडून उभयेतानाही सांगितलें तो अर्थ व राजश्री स्वामीस पत्रलेख केला होता तो अर्थ विस्तारें निवेदन केला ऐशास संस्थानास कोण्हेविषई उपसर्ग न लागावा चालत आला आहे स्नेह अव्यात चालावा हे अवशकता धरिजे ते परंतु......दोन अंतरें पडिली तेण्हेकडून राजश्री स्वामीनी बहुतच चितात येक प्रकार मानिले होतें त्यास विनंति करावयाचे रीतीने करून प्रस्तुत पत्राची उत्तरें व सरदारांस पत्रें पाठविलीं आहेत त्यावरून कळो येईल ऐशास रा हिंदुरायाबा यैवज निर्वाह करून देऊन राजश्री भानजी बलाल हेजीब यांचे स्वाधीन करून शीघ्रवत त्यांची रवानगी केली पाहिजे तैसेच तहवा व अंतरजेबा यैवज साल मजकूरचा येणे त्याचा निर्वाह करून देऊन पाठविजे वरकड कितेक अर्थ राजश्री भानजी बलाल यांसि लिहिला आहे व ते सांगतील व तुम्हाकडील उभयेता लिहिताल त्यावरून कळो येईल (नि)बहुत लिहिणे तरी गोसावी सुज्ञ असेति ( मुद्रा व सीमा ले ४८६ च्या टीपेप्रो. )

पौ हेमलंबी संवछर श्रावण शुद्ध ५.

---

ले. ४८८ } {श. १६४० वैशाख व. २
{इ. १७१८ जून १६

श्रीसुवराज

राजश्री सवाइ बसवलिंग राजे सोंधे गोसावी यांसि

द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——श्री हिंदुराव घोरपडे ममलकत मदार रामराम सुहुरसन समान असर मया आलफ येथील क्षेम जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष गोसावी याच्या संस्थानाकडून तहपैकी राजश्री स्वामीनी सन तिसा असरापासून प्रति वरुषी आम्हाकडे रुा १४००० चौदा हजार रुा द्यायाचे विसीं तुम्हास पत्र पाठविलें आहे तरी मदरहू चौदा हजार रुपये तिसापासून प्रतिवरुसीं

राजश्री रामाजी भास्कर हेर्जीब यांच्या विद्यमानें देत जाणें तुमच्या स्नेहास आम्हापासोन सहसा अंतर पडणार नाही छ २६ जमादिलाखर बहुत लिहिणे तरी गोसावी सुज्ञ असा (नि) हे विनंति ( सीमा ले. ४८२ प्रो. )

पौा विलंबी ज्येस्ठ व १४ सोमवार

---

ले. ४८९ } {शा. इ.

श्री.

श्री सुबराज.

राजश्री सवाई बसवलिंग राजे सोंधे गोसावी यांसि

द सकलगुणाआलंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——श्रीां हिंदुराऊ घोरपडे ममलकत मदार रामराम उपरी येथील क्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष फोंडे पंचमहालीचा तह पेशजी सन अर्बा मध्यें राजश्री कृष्णाजी अनंत याचे विद्येमाने रुपये ५०००० पनास हजार रुपये तह केला त्यास फोंडे प्रांते जमाव गेला ते समई चंद्रवाडीस उपद्रव लागून नाश जाला याबदल सोंडी व नागावा देखील मस्त गुा राजश्री माधवराऊ रखमांगद हेजीब रुपये ५००० पाच हजार बाकी निवल तह रुपये ४५००० पंचेतालीस हजार जाले त्यापैकी जमा येन दिमत मजकूर व राजश्री कृष्णाजी अनंत याजकडे रुपये २००२० येन हुजूर आम्हाकडे यावी रुजु हिसेब तपसीलवार आलाहदा असे

२४९८० जमा स्वारी गुा राजश्री कृष्णाजी अनंत याजकडे पावले आहे त्यास माहालेनी पेशजी कागद पावलियाचे दिल्हे असतील ते येकंदर रद आहेती हाली येक पत्र पावलियाचे दिल्हे असे

---

४५,०००

येकून पंचेतालीस हजार रुपये पावले असेती तहापैकी मजुरा असे बाकी रुपये ५००० पाच हजार राहिले त्याचा निर्वाह करून दिल्हे पाहिजे छ १५ जिल्हेज बहुत लिहिणे तरी (नि) सुज्ञ असा ( सीमा ले. ४८२ प्रो )

---

ले. ४९० } { श. १६५२ चैत्र व. ३
{ इ. १७३० मार्च २६

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५६ साधारण संवछरे चैत्र बहुल त्रीतीया गुरुवासरे क्षात्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणी राजश्री सरदारानी व पागा व शिलेदार

श्री राजा शाहु नरपति हर्ष निधान बाजीराव बळाळ मुख्य प्रधान

(वा) श्री आई आदीपुरुष श्री राजा शाहु छत्रपति तस्य श्रीनिवास परशुराम प्रतिनिधी

व कमावसिदार सजमीदार माहालानहाय वगैरे राहा ... ... यांसी आज्ञा केली ऐसीजे संस्थान सोंधे येथून घोडे वगैरे हराजिनस हुजूर रवाना करितील त्यास ज्याचे हदेमध्ये येतील त्यास बरोबरी बदरका देऊन आपले हदेतून पोहचाऊन देत जाणे कोणी मुजाहीम न होणे ताकीद असे जाणिजे (नि) लेखनालंकार

(ष) मर्या-
देयं रा-
जते

रुजु संमत सुमंत सां सां मंत्री सरकार

बार सूद सुरू सूद बार बार बार बार

---

ले० ४९१ } { श. ?
{ इ.

श्री

राजश्री विठोजी सर्ज्याराउ घाटगे गोसावी यांसी

छ अखंडिलक्ष्मीअलंकृत राजमान्य———प्रति उपरि संस्थान सोंदे येथून घोडे वगैरे हर जिनस हुजूर येत आहे तरी तुम्हीं मार्गी मुजाहीम न होणें आपले हदेंत आलियांवरी बराबरी बदर (का) देऊन पुढें पोहचाऊन देणें जाणिजे (नि) बहुत काये लिहिणे

(ष) मर्या-
देयं रा-
जते

बार सुरु सूद बार बार बार बार

---

ले. ४९२ | श. १६५३ इ. १७३१-३२

श्री

राजश्री सवाई बसवालिंग नाईक राजे सोंधे गोसावी यांसि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——श्री भानजी बलाल हेजीब दिा महाराज राजश्री——छत्रपति स्वामी शरणार्थी विनंति उपरि हुजूर देण्यासमंधे येणे यैवज पैकीं पावले गुा राजश्री दासोपंत होन सवनुरी विरोधीकृत संवछर

२०००८ हणमंत नाईकाकडून देविले
१०००८ मार्गसीर सुा द्वादसी चिठी १
येकून होन
१०००८ पुष्य सुा द्वादसी चिठी १
येकून होन

——

२०००८

५००८ परतकालीचे मुकामी देविले ते पावले माघ बा पंचमी गुा दासोपंत व तमणाच्यार्ये ताा रामजी नाईक
५००८ किता चिठी बा फाल्गुण मासीं गुा दासोपंत तमणाचार्ये
२०७८ रामरायास परभारे पावले कार्तीक बा पक्ष गुा दासोपंत ताा माहालदार
६८ परिधावी संवछर जेष्ठ सुा ८ मी रामरायाकडील अफराद असामी २ मांसी

——

३२१३८

पैकीं वजा अंतरुजेकडेस ताा तानाजी बलाल होन सवनुरी
५००८ किता पावले
३००८ हणमंत नाईकाकडून देविले
१००८ फाल्गुण मासचे चिटीपैकीं पावले गुा दासोपंत व तमणाचा ( र्य )

——

९००८

येकून नउसें होन वजा होतां हुजूरच्या देणे समंधास पावले होन सवनुरी २३१३८ दोन हजार तिनसें तेरा वराई पावले हे विनंति

---

ले.४९३ } { श. १६७२ चैत्र व. ३० इ. १७५० एप्रिल २५

श्री.

श्रीसुब्रम्हण्य

राजश्री सवाई हुमडी सदासीव राजे सोंधे गोसावी यांसि

सकलगुणालंकर्ण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——स्नेो दौलतराऊ हिंदुराऊ घोरपडे रामराम येथील क्षेम जाणून स्वकीये लेखन करणे विशेष सुक्रनाम संवत्छरचा मामला राजश्री गंगाधर राम व सिवाजी शंकर यासी सागोन पाठविलें असता गोसावी याकडून ऐवजाचा वसूल घेऊन आला नाही त्यावरून मारनुले उठोन हुजूर आले तेव्हा राजश्री नारो राम सुभेदार व आपाजी राम हेजीब यांनी शुक्रनाम संवत्छरच्या यैवजी लोकांचें हवाले घेऊन कसबे घातलेवरून प्रमोदनाम संवत्सरचा मामला माजी सुभेदार व हेजीब याचा दूर करून हली उभयेंता मारनुलें यांसी सांगोन पाठविले असेती तरी गोसावी याणी सदरहू सुक्रनाम संवत्छरचा यैवज तूर्त याजे गुजारतीनें वसूल देऊन पैके पावलियाचे कबज घेणे माजी सुभेदार हेजीब याजकडे येक रुका वसूल न देणें छ २९ जमादिलावल सुा खमसेन मया अलफ बहुत काय लिहिणे

सुब्रह्मण्य पदां
भोजभृंगसितधा ग
जस्य हि मुद्रा श्री
घोर्पडाख्यस्य नृसिं
हस्य विराजते

मारत
व मुद्र

---

ले. ४९४ } {

नि (श्री) सुब्रह्मण्य

राजश्रीं सवाई हुमडी सदाशीव राजे सोंधे गोसांवी यासि

द सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य—स्नों दौलतराव हिंदुराव घोरपडे रामराम उपरि येथील कुशेल जाणून स्वकीये लेखन केलें पाहिजे विशेष संस्थानचा

मामला राजश्री गंगाधर राम व सिवाजी शंकर यांस सांगितला होता तो दूर करून हली राजश्री नारो राम यांस सुभा व रा आपाजी राम यांस हेजिबी सांगोन पाठविले आहेत तरी शुक्लनामाचा ऐवज पावला नाही म्हणोन रा सिवाजी शंकर यांणीं हुजूर येऊन सांगितले अशास संस्थानचा ऐवज पूर्वी पावत होता काये तो कम होत होत सोला हजारावर आणिला सेवट तीर्थरूप राजश्री दाजी साहेबाचें आगमन जालेसमई राजश्री रामाजी मंगेश यांचे विद्यमाने दोन हजार कम करून चवदा हजार रुपये साल ताा तीन कंदा यानें द्यावें बाकी ठेऊ नये जिनस वगैर म्हणो नये असा करार असतां शुक्लनामाचा वसूलच नाही तेव्हा करार कोठे राहिला असें जाहलिया स्नेह कसा चालेल सांप्रत उभयेतास मामला देऊन पाठविले आहेत तरी करारप्रो शुक्लनामाचा ऐवज झाडा करून देऊन पुढें साल मजकुराचा मामला सुरलीत चाले तें करणे यासही अभयंतर जाहालिया उभयपक्षींचा करार मदार कसा चालेल कलो तसा प्रसंग योजावा लागेल संस्थानचा व या घराणियाचा घरोबा विशेषाकारे चाले तें केलें पाहिजे वरकड अर्थ राजश्री वीरभद्रया व राजश्री मनीवर्ती सिवया यांस लिहिला असे ते अक्षरशा तुम्हांस सांगतील तदनरूप ध्यानास आणोन ऐवजाचा मार्ग करून स्नेह सारोधार चाले तें करणे बहुत काय लिहिणे ( मुद्रा व सीमा ले. ४९३ प्रो )

---

ले. ४९५ } { श. १६७२ ज्येष्ठ शु.७
इ. १७५० मे ३१

श्री.

श्रीसुब्रम्हण्य

राजश्री सवाई इमडी सदासीव राजे सोंधे गोसावी यांसि

द सकलगुणालंकर्ण आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य——स्नों दौलतराउ हिंदुराउ घोरपडे रामराम उपरी येथील कुशेल जाणोन स्वकीय लेखन करणे विशेष संस्थान मजकूरचा मामला पेशजी राजश्री गंगाधर राम व सिवाजी शंकर यासी सांगून पाठविलें होते त्यास दूर करून हली राजश्री नारो राम सुभेदार व आपाजी राम हेजीब यासी सांगोन पाठविलें असेती तरी गोसावी यानी उभयेता मारनुलेच्या गुजारतीनें शुक्लनाम संवतसरची बाकी व प्रमोद नाम संवत्छर दुसाला यैवजाचा वसूल देऊन पैके पावलियाचे कबजे घेणे प्रमोदनाम संवत्सर जेस्ट सुध सत्पमी सुा इहिदे खमसैन मया अलफ छ ५ रजब बहुत काय लिहिणे ( मुद्रा व सीमा ले. ४९३ प्रो )

---

ले.४९६ } {

श्री.

सवंदे संस्थान राजे याणी राज्य केलेची वंशावळी पूर्वी हस्तनापूर संस्थानचे काशपी मैत्रयें जशा केलाद रायमाचे वंशस्त श्री वीरभुकराय संस्थानी राज्य चालवीत असतां त्यांकडून बंकापूर पावेतों पश्चिम प्रांती माधवया ह्मणायाचा राज्यभार चालवीत असतां हंपी विरूपाक्ष देवराधक आनिगुंदी संस्थानचे राजे वीरप्रताप सदाशीव रायरु त्याचे चिरंजीव रंगराजय देवरु हे राजे त्याचे चिरंजीव श्रीमन्महामंडलेश्वर तिरमळ राजे त्याचे चिरंजीव श्रीमनांडलेश्वर वेकटार्दि महाराज याहीं राज्यश्रीचा भार चालवीत असतां त्याचे तोडमानः चक्रवर्ती स्वामी याचे वंशज चंद्रगिरी येथ असणार वेंकटपति राजे यांस फौज देऊन सौंदे गेरसप सवनूर बंकापूर सिमेस ठाणे घालणेविसीं हे पश्चिम दिशेस पावून दिलें नंतर हे देशचे पालेगार यांचा तपशील बंकापुरास माधवका पाळगार ह्मणायाचा

१ गौरसपेत ज्यने जौरादेवी ह्मणायाची स्त्री
१ बुद्रीमधें देवबाकी ह्मणायाचा पालेगार
१ अंडीगत दोलबलाल ह्मणायाचा पालेगार
१ सवंदे प्रांतीं चंडसेन ह्मणोन लोक्वर जातीचा पालेगार
१ सुपे प्रांतीं पुरंदरसैन कोलवर पालेगार
१ कुदटरकुंतल नगरास जैन गोपतौंड मला ह्मणायाचा पालेगार

१ एकून ७ सात येणे प्रमाणे पालेगार असत होते वेंकटपति राजे याणी फौजनसी बंकापुरा येऊन बावीस माहालास बाणे घालून त्याउपर सोंदे वावेतांगारें सपे कगायेत असलचे पालेगारास मोडून सिले सिकेस सुद्धां आपले ठाणे घालून सिर्सेतच दपटणांत किल्ला बांधून घेऊन आलेगुर्दी याचे आज्ञाधारक होऊन वेंकटपतिनायक याचे चिरंजीव रामराजे त्याचे चिरंजीव वज्रवेडर त्याचे चिरंजीव देवराजेंद्र याप्रमाणे चार ४ पित्र्युयापरियंत चालून आले यानंतर देवराज याचे चिरंजीव आरप्यस नाइक व कन्या आरसा देवी ईस आजीवूदी संस्था वेंकटपती महाराजे यांचे नातवास देऊन सोयीरगत जाहाले नंतर अनेगुदी राजे यानी हे आरसप नायक यास पट्टाभिषेक करून राज्य नंदगिरी यांस घालोन दिलें येणेप्रमाणे राज्यभार चालवीत असतां याचे चिरंजीव रामचंद्रनायक यांस राज्याधिकार जाहला हे रामचंद्रनायक कांहीं राज्यभार चालवून सवंदेंत बळीपूर येथें कोटकिला बांधून सोंधेमध्यें राहात होते त्याचे चिरंजीव रघुनाथ नायक यांस राज्यभार जाहला हे रघुनाथनायक कांहीं लिंग धारण दीक्षा घेऊन राज्य प्रतिपाळण करीत असतां याचे चिरंजीव मदुलिंग नायक जन्म होतांच त्यास राज्यभार चालवीत असतां इज्यापूर पादशाई याकडून नबाब फौज घेऊन येवून बंकापूरचे बावीस माहालांस त्याणें घातले त्यानंतर हें सोंवदेंवर्ती सीमा राखून घेऊन राहिले असे.

पुरवणी २

त्यानंतर त्याचे चिरंजीव सदाशिव राजेंद्र यासी राजभर जाहाला त्यांसि हळे सदाशीव राजेंद्र याही हूलेऊर किल्ला मोडून नवी मेटें गासूरगुडी गदे येथ किल्ला बांधोन राहिले होते विजापूर पादशाई यास घेऊन बंकापूर कडील बावीस म्हालप्रमाणें इंदुरहाळि,आरसीगेरहळी १ बुगीनचेरीहळी १ नुलगुंदहळी १ अंडिहाळि १ येकून ४ समंद बेरीज रुपये १५०१ वुंडावणी भातक जरा बाबत रुपये १०० जातां बाकी १४०१ गुतके करून घेवून व घाटाचे राज्याआलीकडे राहात होते त्याचे चिरंजीव बसवलिंग राजेंद्र यांसि राज्यभार जाहले नंतर कांहीं दिवसानंतर कंचार कलपयानवरू यांसि फौज देऊन अंकोले पंच महाली जावून ठाणी घालावीं म्हणून आज्ञा दिली अज्ञेप्रमाणे कलपनांवरु फौजेनिशीं आंकलेस जाऊन महेंद्रगड १ सोंव्हेश्वर सिंहिगड उपनाम कुर्मगड १ कडवाड कोसीकहरें येथ मधुरगड १ खोलगड १ येकुण किले ६ हस्तगत करून ठाणे घालून त्यानंतर पंच माहाल आणि स्वाधीन करून घेऊन तसेच चार वर्षानें चार फोडतो वडिलास मोगल यांचे ठाणें होतें अंतराज महाल फोंडें किल्ला मर्धनगडसुधां कलपेयानवरु याणी फौजेनिशी जावून कोटास वेडा देऊन किल्ला घेतला त्या गावांस आपली हिकमत चालवून आपली फौज किल्लेस रखवाली ठेवून तेथून सुपें पंच महालीं मोगल यांचे ठाणें होतें त्यांचें शासन करणे तासुंदेस टेवून मोगल याचे ठाणे त्याचवर्षी मारून बुडविलें नंतर आपली शासन चालया वर्तमान करून आपली ठाणी बसवून कलपय्यनवरु यांहीं फौजेनिशीं सोंदे मुक्कामास आले नंतर कांहीं दिवस राज्य चालवून राहिले होते हत असता शाहु छत्रपति म्हणावया याणे आपली फौज बांधून या प्रांतात मोहीम जाहलीमुळें सत्क होऊन फिरून गेले नंतर मोकामी भानजी बल्लाळ देवजी विश्वनाथ हेजीब यां मार्फतीने चंदी मुकामास राजवट चालवून जे आपले स्वाधीन आहेत ते तालुकेचां गुतगा रुपये तपसिलाप्रमाणे सोंदें प्रांतांत आंकलें पंचमहालसुधा२५००० वर घाटाचीं सोंदें दिला खंड देतील तालुका बुडवें वगैरे बंकापूर आंकले माहाल १

पुरवणी ३

पंचमहाल बाबत महेंद्रगड १ आंकलें पंचमहाल माहेंद्रगड १ सिव्हेश्वर कोटसुधा १ अडबट माहाल १ सिंदीगड उपनाम कुर्मगड, वडवड महाल किल्लासुधा १ कदरामाल १ मधुरगडसुधा १ खोलग्राम खोलगडसुधा १ एकून ७ समंदी खंडणी रुपये हजार २५००० सुपें तालुक पंचमहाल सुधा खंड रुपये हजार १०००० किता माहे ठाणी ६ यास तपसील खंडेकार बाळी चंद्रवाडी हेमाडबारसी अष्टप्रहार कांकोडें एवूण सहासमंधी खंड रुपये दाहा हजार व अंत्रुज माहाल मर्धनगड फोंडेंकोटसुधां रुपये हजार १०००० एकूण रुपये ४५००० हे रुपये वर्षप्रतिवर्षी देणेच्या करमर हेजीब मशारनुले याणी खंडणीचे पैका देऊन राज्यभार पावून देऊन राहात होते त्याचे चिरंजीव इमडी सदाशीव राजेंद्र यांसी राज्यभार जाहले त्याणीं हे खंडणांचा पैका देऊन राज्य चालवीत असतां बाहदर नबाब साहेब याची फौज उठले फोंडेस जावूंस गेले त्यांचे चिरंजीव सवाई बसवलिंग राजेंद्र

यांस फोंडे मुकामी पट्टाभिषेक जाहाला बहादर नबाब याणी आनंदानसें सिवरामराव विद्यमाने सवाय बसवलिंग राजेंद्र याणी आपणाकडे दलवाई वीरभद्रेया यास पटणास बाहादर साहेब यांकडे पाठवून आपलें राज्य दलवाई वीद राज्यमान्यें राजभार करून चालवीत होत होते ते दलवाई कालाग्नीने जाहाले नंतर राज्यबाहदर नबाब यांचे ताबीन करवून आले याप्रमाणे ठावूक असलेची लिहिली हकीकतः शालिवाहन शके १६१६ भाव सवंत्सर कार्तिक शुद्ध १ दा ( इ. १६९४ आक्टो ९ ) रोजीं वेंकटपति राजेंद्र याणी फौज घेऊन येवून सोंवदेंस ठाणे घातलें.

हिकडे सदाशीव राजेंद्र याणी शालीवाहन शके १६४२ शार्वरी सवंछर भाद्रपद शुद्ध १४ दंसी रोजी (इ. १७२०सप्टें ४) लिंगधारण करून घेतलें.

---

## सोंधेकरांची बखर.

लें० ४९७ } {

श्री

स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके १०१६ येक हजार सोला भाव नाम संवछर कार्तिक शुध १ दा शुभदिनी श्री मधुकेश्वर माहारुद्र आराधक सोमवंशोद्भवजातस्य काश्यपगोलोत्पन्न श्री महाराजराजाधिराजपूजित माहाराज श्री तोडेमान चक्रवर्ति व्यंवटपति राजेंद्र सोंध्यास धर्मसिंहासनाधीश्वर राह········सदरहु संस्थानाधिपत्यास सिंहासनारूढ होऊन क्षत्रियधर्मप्रतिपालनाने वंशोद्भव जाहलेचा विवर ऐसाजे. पूर्वी हस्तिपुर संस्थानी काश्यपगोत्री यजुःशाखावलंबित कदम राजेंद्र यांचा व राजश्री वीरराजेंद्र नामाभिधान यास पश्चिम देश बंकापूर तागायेत राज्यभार चालवीत असतां प्रतिनिधी राजश्री माधवांक नामाभिधानी यांस सर्वाधिकार पश्चिम दिसेचा देऊन बंकापुरात मामलतेनसी मालक करून राज्याधिकार चालवीत होता ततो देव विरूपाक्ष देवाचे आराधना आनेगुंदी संवस्तानचे राजे माहाराजश्री वीरप्रताप सदासिव राजेंद्र याही व याचे चिरंजीव श्रीमन्महामंडलेश्वर तिर्मल राजेंद्र व त्याचे कुमार व्यंकटाद्रि महाराजेंद्र याहीसह साम्राज्यपदवैभवानंदेकरून राज्यभार चालवीत असतां सदरहू पश्चिमदेश बंकापुर तागायत राज्याधिकार चालविणार इत्यादिका कडून सदरहू आनेगुंदी संस्थानास खंडणीची बेरीज पेसजीस देत होते ती बेरीज कांहीं वर्षे न पोचविली करितां ते·:····राज्याधिकार यांस तंबी पोहचऊन तो तो देश स्वसुंदरेचे मिलापास घेऊन संस्थानचे निशाणेखालीं आणाव्या याप्रकारें निश्चय करून येक दोन खेपा फौजेचे जमाबंदीचे बलकटीनसी थोरथोर सरदारास सदरहू पश्चिम प्रांतांचे देश हस्तगत करणेस ... ... लढाई चालविली. परंत देशाधिकारी प्रतिनिधी वगैरे पालेगार समस्त येकवटून आपापले फौजेची जमयेत चढऊन कोटकिलेचा व जंगलाचा कुबल आश्रय बलकटेश धरून ······चे सरदाराव व फौजेचे समूहावर कापट्यपणाची मार्गगिरी व······ लढाई चालविलीवरून फौजेसह सरदाराची मोड होता परत माघारे· म्लानवदन होऊन स्वामींचे सन्निधानी पोचतां श्रीमन्मंड

लेश्वर राजेंद्र याही परम आवेशांत येऊन तत्काल सभा करून समस्त कुटुंबिक स्वजन पूज्य मान प्रभु इत्यादिकांची आलोच्यना समान घेऊन भगिनीकुमार तोडमान चक्रवर्तीचेच वंशज चंद्रगिरीमध्ये थोर औदार्य व शौर्यवान असत आहेत. त्यास आमंत्रणयुक्त आणऊन गौरविलें असतां स्वमातुलस्थानी जयश्री लभ्य करतील हा निश्चय करून स्वकुटुंबिक जनामधील बुद्धिवान ऐसे सरदारास योग्य ती सामोग्री देऊन आमंत्रणपत्रासह चंद्रगिरी संस्थाना पाठऊन श्रीमन्महाराज त्र्यंकटपती राजेंद्र यांसि आणऊन सभास्थानी बहुमानादि शब्दें गौरवून सदरहु शत्रूचे पारपत्याचा प्रश्न करितां युक्तीची उत्तरे प्रतापशील तत्काल दिलीं. ती श्रीमन्मंडलेश्वर याही श्रवण करून संतोषातें पावले आण लागलेच फौजेची सिद्धता करून मनोल्हास पूर्वक रणरंगीक वर्मेसह आशीर्वाज्ञा देऊन स्वारीचे प्रस्थान करविले. त्या बरहुकूम क्षत्रियधर्माधिकारी स्वपराक्रमानें पूर्वी जसे सद्धर्मवान राजे न्यायेच प्रवर्तत होतेस (तसा) हा प्रसंग महाराजश्री त्र्यंकटपति राजेंद्र याही फौजेचा समूह आपले आवेशावर आणून सुमुहूर्तानें जयकार देऊन चालीकरितां फौजेत रणदुंदुभीचा विजयघोश चालून पश्चिम दिशेस उपक्रमिलेचे देशांत सामोरा होऊन प्रमाण करितां अनेक तरेचे शुभशकुन श्रीप्रसादें जाहालाचेही उत्तम हुशारीस देऊन पश्चिम दिशेस बंकापूर स्थानी कुंबल जागा लक्षून स्वारीचे ठाणे बसविले. आण तेच क्षणीं देशाधिपति प्रभु, प्रतिनिधि वगैरे पालेगार या समस्तांस युद्ध समरंगणाचे प्रसंगास सामोग्रीने येणेंस पाचारणी केली त्याची नावनिशी. श्री वीरभूप राजेंद्र याचा प्रतिनिधि, पश्चिम प्रांतात अधिकार माधवांक नामाभिधानी १ गेरसपे इजेनजोर म्हणावयाची अमलदारी बायको १. उद्रिदेव बलाल म्हणावयाचा पालेगार १. सुपे प्रांतात पुरश्चरसेन म्हणावयाचा पालेगार १. कुपटु कुतल ग रा स जैन गोपगौड मल्लाल म्हणावयाचा पालेगार १. ऐसे सत्याधिपति स्वकीय फौजेचे समाबंदीचे बळकटीनें राज्याधिकार चालवीत होते. त्यास रणांगणाचे लाभार्थ युद्धगिरीची आमंत्रण पोहचण्यापूर्वी येक दोन खेपा जय पावले. त्या ठाई डौलानें गर्क होऊन जमयेत तयार करून पुढा सरसावतांच महाराजश्री त्र्यंकटपतिराजेंद्र याही आपले फौजेचे सरदारांसी रणरंगीक हुशारीचे मेजवानगिरी देऊन सर्वांस येकंदर गौरऊन ज्या ज्या जागांर मशा निले शत्रूचें फौजेचा समूह व... ... होते ते कोठे किले... ... कुंबल जंगलाचे राईत आण मैदान रणभूमिकेस इत्यादि लक्षून त्या त्या प्रमाणें मारगिरीचा प्रयोग म्हाणिजे कोटाविले वर तोफा जंगलामधें हातनाम बाण त्रिकमठे वगैरे शस्त्रें व उढालभूमीकेचे जमयेतीवर घोडेस्वाराचा हल्ला या तरेने जिकडे तिकडे सागरतुल्य फौजेची पसरणी करून निर्वाणपणे हल्ला करितां, जैसी समुद्राते नदी मिलतां पूर्व गुणाते लय पावती तेच न्याये, सदरहु उपक्रमिलेचे अधिपती, व पाळेगार सह सत्याधिपति दि प स नदीसारिखे फौजेसह विरून गेले. आण कितियेक फरारी जाहले ते दशदिशाप्रत परिणामास पावले याप्रकारें श्रीप्रसादे रणांगणामधे जयभाग येतां फौजेंत आनंदवाद्याचा गजर करून जयश्री होतांच ते ते राजवाडेचे स्थानी व सिवाई उपक्रमिलेचे प्रांतामधे २२ बावीसहि म्हालात ठाणी निशाणा सह बसवून मुख्य जागा स्लिसीमधें त्र्यनपटणास मोठा

कुबल ऐसा किल्ला व कोट नूतन बांदावलास आणउन सिवाइ तेच म्हालांत सुमुहूर्ते सिंहासन स्थापून लागलाच अमृतसिद्धियोग सिंहासनारूढाचा पूर्वक साधून घेतां समस्त नगरीक जनानीं मनोल्हादपूर्वक जयकार केला. त्यानंतर स्वारीचे प्रयाण कांहीं फौजेनसी विजयनिशाण लाऊन श्रीमन्डलेश्वर महाराजेंद्र याचे संनिधानी पोहचून सिरी संपादिले राज्याचा जयभाग स्वामीचरणीं अर्पण करितां महाराजेंद्रस्वामी मातुळ याही परम आनंदभरित होऊन अमोल्य ऐशा जडजोहारीक वस्तांवर्छे मशारनुले याचे माहाराजश्री त्र्यंकटपती राजेंद्र याही परत सोंधा संस्थानी येऊन सदरहु सिंहासनारूढ असून महाराजश्री मातुल याचे मुद्रेखाली राज्यभार चालविला. नंतर यास चिरंजीव महाराजश्री रामचंद्र राजेंद्र नामाभिधानी कुमार होते. त्याणीही प्रौढ बुद्धीत येता कांहीं समय राज्यभार चालविला.त्यानंतर त्यास महाराजश्री वज्रवडेर नामाभिदानी कुमार होते त्याणीही प्रौढबुद्धीत येता कांहीं समय राज्यभार चालविला तो त्यासही चिरंजीव महाराजश्री देवराजेंद्रनामाभिधानी होते. त्यानीही याचप्रमाणें राज्यभार चार पुरुषपरियेंत निर्विघ्नप्रकारे सदरहू राज्य सोंधाधिपती याही सद्धर्मपणें चाल्वीत असतां सदरहु उपरींचे राजेंद्र यास चिरंजीव राजश्री आसिप नाईक व कन्या असी देवी म्हणून ऐसी उभयता कन्या कुमार सुलक्षणवान परम धर्मशील जाहली. त्यास कांहीं समई श्रीमन्मंडलेश्वर याणी अवलोकून त्याणे गुणग्राह्य करून व स्ववंशजाचे ते...क्षुन ती कन्या आपले नातवास विवाहपूर्वक आणून आपली नात मशारनिले राजश्री. राजेंद्र आसिपनाईक यास परम थोर उत्साहानें विवाह करून देऊन तत्काल दुसरा विवाह सिरी पुर्वजांनीं संपादिलेचा कुली पाश्चिम दिशेस सोंधा महालांत खालीं करून वसु द त र कृतराज्याभिषेक सिंहासनारूढ पुजापाट बांधून राज्यीं शोभविला. त्यासमई समस्त देशांत महालों महालीं येक मास पर्यंत आनंदोत्साह समस्त प्रजेनें चालविला. याप्रमाणें सर्व राज्य-प्रजेस सद्धर्मपूर्वक आनंदभरित प्रतिपालीत असतां पुढा दल्ऊर नाम ग्रामांत मोठा कुबल ऐसा एक कोट नूतन बांधून कांहीं फौजेची जमाबंदी तेथे ठेऊन वरकड ठाणेचे जागाही खबरदारी करून पुढील साधनाचा प्रसंग कल्पीत असतां त्यास कुमार राजेंद्र रघुनाथ नाईक ऐसे नामाभिधानी याहीं फार प्रबल सुबुद्धिमान होते त्याणी प्रौढ वयाते पावले, हें पित्यानें लक्षून राजश्रीया कृतपटाभिषेक केला तो त्याणी परम सत्धर्मपणें प्रज्यासह राज्य प्रतिपाळ करून स्वकीय क्षत्रिय वंशाचा कुलस्वामी श्रीमधुकेश्वर महारुद्र देवाची आराधना येकनिष्ठ भावे प्रेमपुरःसर सदोदीत करीत असतां श्रीसदासीव अवतार मानवी तनुजें सत्पुरुष येऊन मशारनिले राजेंद्र रघुनाथ नाईक यास कृपामृतरसाचे दर्शन देउन प्रसनोदय भाव दाविला ती मूर्ती दिव्य तेजोमय ऐसी मशारनिले राजेंद्र यास दर्शनलाभी असतां जो आनंद जाहला तो लेखनास येत नाही याप्रकारें आनंदभरित होतां त्याचा भक्तिप्रेमा पाहून तत्काल मस्तकावर वरदहस्त ठेऊन लिंगधारणादि शिवदीक्षा दिधली आण देव गुरु यांही अदृश्य जाहले ऐसे समुहूर्ते महाप्रसादपूर्वक लिंगधारणदीक्षा अंगिकारून तेच ि वशीं दीक्षेत स्वकुटुंबिक स्वजनास आणउन परम सत्धर्मपणें राज्यभार चालु लागले. त्याचे पोटी कुमार जन्मोदयास आले. त्यास मधुलिंग

असे नामाभिधान प्रकट करून प्रौढ होता राज्यश्री स्थापिलें तों मशारनिले मधुलिंग नाईक याही काहीं काल राज्याधिकार चालवीत असता, समय लक्षून, विजापूर बादशाहा याकडून नबाब बहाद्दर याणी थोर फौजेनिशी पश्चिम देशाचे महालात येऊन बंकापूर तागायेत उपक्रमिलेचे २२ बावीसही महालात आपली ठाणीं बलाविलीं; तों बादशाहीचे फौजेची जोरी उत्कृष्ट असें लक्षांत आणून मुख्य सोंधानगर व बाकी महाल मात्र फौजेचे रखवालीनिशी खबरदारीने रक्षून राहिले. आणि शत्रूचें पारिपत्य करावे तर स्वकीय फौजेचा समूह बळकट असूस पाहिजे, या अर्थी पुढील साधनाचे बंदोबस्तीवर असतां मशारनिले मधुलिंग नाईक यास सुपुत्र जन्मोदयाते आला. त्यांस इमडी सदाशीव राजेंद्र ऐसे नामाभिधान उघड करून असतां कांहीं कालीं मशारनिले महाराज श्री इमडी सदाशिव राजेंद्र यांहीं स्वल्पवयांतच सुबुद्धिमान प्रबल तो पित्यानी सर्व सुलक्षणें समजांत आणून राज्यपाठ मशारनिले राजेंद्र यांस देऊन मुद्रासुधां स्वाधीन केली तो समस्त देशजनास आनंदोद्भव जाहाला. उपर हळेऊर नामक ग्रामांत जुना किल्ला असलेचा मोडून नवीन पेठ गोसरगुंडी म्हणायाचे जागा नूतन मोठा किल्ला बांधून फौजेची रखवाली ठेऊन मोगल याणे पूर्वी २२ बावीस महालांत ठाणी बसविलीं आहेत ते महाल स्वाधीन करावयाचे हेतु धरून प्रथमतः बादशाही याकडील वजीर नबाब बहादर यांसी सल्ला सामो(प)चार केला. तों त्याणी तेच गोष्टी मान्यता दिली. परंतु कांहीं पेसजीस बादशाहाचे संस्थानास यावी लागेल म्हणता महाराजश्री इमडी सदासीव राजेंद्र याही चित्तांत आलोचना करून बादशाहीची बळकटी जोर आहे पेक्षां पुढां हरएक कामास दोस्ती असावी, ऐसा निश्चय करून सिरी२२बावीश महालापैकीं इग्राम आसींकेर ग्राम १, उगीन कर्रा ग्राम१, येकून चारी ग्रामासंमंधी बेरीज रुपये १५०१ पंधासे एक वसूल पैकीं उगवणी बाबत वजा रुपये १००, वजा जातां, १४०१, ऐसे ग्रामसमंधीचा वसूल विजापूर बादशाहीचे संस्थानास पेसजीस करार करून देतां सिरी २२ बावीसही महालांतील ठाणीं बादशाही निस्पत मशारनिले याणीं उठवून स्वस्थानीं परत गेले. तों महाराजश्री इमडी सदाशीव राजेंद्र याहीं सिरीं महालांत स्वकीय फौजेची रखवाली ठेवून कुली राज्यभार पूर्व प्रकारें चालवूं लागले. त्यानंतर कांहीं दिवसीं हजरत दिलीश्वर बादशाह याहीं विजापूर संस्थानासह हस्तगत करून सर्वाधिपत्य होणेचा योग होत आला. ती कीर्ति दिगंतरीं प्रसर जाहले समई मशारनिले महाराज इमडी समीप राजेंद्र याणीं सखोल बुद्धीनें आलोचना करून कांहीं जामियत तयार करून सुमुहूर्ते स्वारीचें प्रस्थान काढून हस्तनापूर दिल्ली संस्थान शहरीं मुक्काम ठराउन मशारनिलें दिलेश्वर बादशाही यांचे दर्शन लाभाचा योग इछून, स्वारी आगमन केले म्हणावयाची परवानगिरी बादशाहीचे संनिधानीं सबळमार्गे लावितां बादशाहीं याही बहुमान पुरसर मशारनिले राजेंद्र यास दर्शन देऊन समक्ष एकमेकांच्या गोष्टी होतांच बादशाहाही यांणीं मशारनिले राजेंद्र याजवर फार प्रीतिभावना मानून संतोषातें पावले. आणि साहा मासपर्यंत मशारनिले राजेंद्र याची स्वारी संनिधानीं ठेवून घेऊन हरएक प्रसंगी दर्शन देऊन प्रीतिपूर्वक भाषण चालवून पुढां मशारनिले राजेंद्र

याची सद्धर्मबुद्धी व बहु सौंदर्यवान ऐसी सर्व लक्षणें राजलक्ष्मीशोभित ऐसी स्वमान्यतेस आणोन राजपूजित व राज्यदौलतीचे भूषणास ब्रीदावलीचे भोग निर्विघ्नप्रकारें आचंद्रार्क पर्यंत भोगून अन्यास ते उपभोगास देणेंस योग्यता असे; या प्रकारें सनद सादर करून त्यावर कनकभरित वरदकराचा पंचागुलीसह हस्तमुद्रा सिरोभागी प्रतिष्ठून अमोलिक ऐसी वस्त्रें व जडजोहार अलंकार सर्व ब्रीदावलीसह देऊन आज्ञा देऊन आनंदयुक्त सोंधा संस्थानीं आगमन केलें. नंतर मशारनिले राजेंद्र यांस बसवलिंग राजेंद्र नामाभिधानी सुपुत्र जन्मोदयाते येऊन परमानंद होतां कांहीं वर्षी प्रौढ वयावर येऊन प्रताप, बुद्धी लक्षांत आली. राज्याभिषेक मशारनिले सदासीव राजेंद्र याही राजश्री बसवलिंग राजेंद्र यासीं केला. त्यानंतर त्याणी पूर्ववत सद्धर्मपणें राज्याधिकार चालविता कांहीं कालीं फौजेची जमयेत चढवून वगैरे लढाईची सामोग्री बळकट तयार करून संस्थानचे सरदारापैकीं कारकुनी शूरत्वाचा कल पयानवरू दलवाई यासी फौजेची जमाबंदी देऊन, वस्त्रेविडे देऊन, आंकोले, पंचमहाल वगैरे तलकोंकण महाल काबीज करून स्व-ठाणीं बसवावयाकरितां आज्ञापून प्रेरिलेचे आज्ञेबमोजीब मशारनिले कलपयानवरू याणीं फौजेसह स्वारी करून सर केलेचे म्हाल बितपसिल. कोंकण देशपैकीं महेंद्रगड १ कद्रेमधुरगड १ व खोलगड याप्रमाणें कोट व किले कुबल स्थानी शत्रू बळकटीनें फौजेनिशी असत होते. यास पारपत्य करून ते ते गडावर लढाईचा चढाव करून दारुण मारागिरीचा प्रयोग करितां अमलदारांस फौज कांहीं जण फरारी जाहले. ते क्षणीं सह करून सदरहु मुक्कामीं ठाणीं वसबून मशारनिले राजेंद्र सोंधा संस्थानाधिपति याचे नावीं निशाण चढवून जयकार केला. आणि जागोजागीं ते महालांत फौजेची रखवाली ठाणे निसी उ ठ पुढा आणखी लढाईची सामोग्री व फौजेची जामियत बळकट जाऊन, मोगल यासी तपे अंत्रुज वगैरे महालानी स्वठाणी बसऊन काबीज करीत होते. तो प्रांत सह करणेचा भाव धरून सदरी फौजेसह मशारनिले आरुणाणी स्वारी करून प्रथमता मर्दनगडाचे किलेवर जोरावारीनें वेढा देऊन एकाएकी हल्ला करिता २२ बावीस रोज पर्यंत किल्लेतून व महालाचे कोटावरून शिपाई मैदान भूमिकेचे कुबल जागेनिसह मोगल याचे फौजेनें अतिशय निर्वाणपणें लढाई चालविली. परंतु श्रीईश्वरप्रसादें मशारनिले नवरु याचे फौजेची युद्धगती चपल होऊन मोगल याचे फौजेचा मोड जाहला. तो बावीसावे दिवशीं परम जोरानें तोफा वगैरे मार प्रबल करून हल्ला येकसरा करून मर्दनगडाचा किल्ला व फोंडें महालचा कोट सही करून विजयध्वनिवाद्यांचा गजर लाऊन सोंधा संस्थानाचे अधिपति राजेंद्र यांचे नावी आरक्तवर्णी निशाण चढऊन ठाणी बसाविली. शिवाय गावीं ठाणेचे जागा फौजेची रखवाली बसऊन कुली महाल काबजातीत आणिला. आणि प्रजेस स्वस्थतेचा कौल देऊन नंतर सोंधा संस्थानी येऊन महाराजश्री राजेंद्र यांचे संनिधानाचे दर्शन घेऊन सदरहूचा जयभाग समर्थन करून सविस्तर युद्धगतीचा प्रसंग निवेदन केला. तो स्वामी याही फार संतोषाते येऊन तत्काल जाहागिरेची सनद व वस्त्रे देऊन गौरविला. यानंतर महाराजश्री इमडी बसवलिंग राजेंद्र याणीं आणखी युद्धाची सामोग्री

व फौज देऊन सुपे पंचमहाल काबीज करणेचे निश्चयानें मशारनिलेनवरू या आज्ञा देतां फौजेची जमाबंदी घेऊं लागला. विजयमुहूर्तानें प्रयाण करून सुपे प्रांतांत मुकाम केले. ते ना दीतां याचींच ठाणीं आहेत तो सदरहु प्रकारें युद्ध प्रारंभून कोटावर हल्ला करिता ताम्र याचे फौजेची जोरावारी होऊन मशारनिले कलपयानवरू याचे फौजेचा मोड जाहला. तें वर्तमान सोंधा संस्थानी श्रवण होता, राजेंद्र स्वामी याही तत्काल त्वरा करून दुसरा सरदार मल्याप्पनाइक नामाभिधानी यास नेमणूक करुन दीडशे तोफा व साहा सहस्र फौजेचा जमाव देऊन प्रेरितां, रातबेरात चाल करून मशारनिले पइ याचे फौजेंत कुमक देऊन कुली जमयत एकवटून ताम्र यावर निर्वाणपणें शहामत करितां चौथे रोजीं ताम्रयाचा मुख्य अमलदार पडतां फौजेचा मोड होऊन परागंदा जाहले. ते क्षणीं जयकारें कोट सर्द करून जंगलांतही कुबल जागे रचून ठाणी बसविली होतीं ती रचना मोडून कुली प्रांत स्वाधीन केला. आणि प्रसेस स्वस्थतेचा कौल देऊन उभयतां सरदार सोंधा संस्थानी महाराजेंद्र खावंद यांचा चरणदर्शनलाभ घेऊन सदरहूचा जयकार समर्पण केला. तेव्हां माहास्वामी यांही परम उल्हासपूर्वक इनाम व तसरीफा देऊन उभयेतां सरदारास गौरविलें. याप्रकारें उपक्रमिलेचे महाल आंकोले, सिवेश्वर, वगैरे गड व किले व अंत्रुज मर्दनगड आदिकरून व सुपे पंचमहाल इत्यादिक प्रांत सोंधा संस्थानचे मुद्रेखाली आणून निःशत्रत्व सद्धर्मशीलपणें वरघाटावरील कुली देश व संस्थानाखालील उपक्रमिलेचे प्रांत प्रतिपालन बहुत वर्षें राज्यकारभार चालविला. तेव्हां फोंडे महालांतील देसाई वगैरे इनामदार याणी सोंधा संस्थानी महाराजश्री यांचे संनिधानी हाजर होऊन प्रार्थना केलेप्रमाणे पूर्वी हजरत बादशहा याही दिलेल्या इनामा जाहागिरी भूमिका पावून देऊन सवाई आणखीही मेहरवानगी होऊन इनामें देऊन समस्तास पाळण केलियानंतर शाहू छत्रपती महाराजश्री, मराठे प्रभु, याणी आपले फौजेसह प्रतिनिधी अमलदार सोंधा संस्थानचे प्रांतावर जोरावर पाठविले. ते सोंधा तालुकेत येऊन फौजेचे ठाणें बसवितां सोंधा संस्थानाधिपती याणी शत्रूचे जमायतीचा डौल पाहिलेत, युद्धप्रसंगास···ना ठाणे ऐसा विचार लक्षांत आणून त्यांजकडे सल्लेची राजवटी चालविली. तो त्यास मान्य होऊन मशारनिले छत्रपति प्रभु या तर्फे भानजी बल्लाळ व देवजी विश्वनाथ हेजीब याणी सोंधा संस्थानीं येऊन भाषापत्राचा करार केला ऐसाजे. सोंधा प्रांतावर घाट देश समंधी रुपये २५००० पंचवीस हजार, सुपे तालुके समंधी रुपये १०००० दाहा हजार, फोंडे अंतरुज वगैरे माहाल समंधी रुपये १०००० दाहा हजार येकूण ४५००० पंचेचाळीस हजार रुपये पेसजीस शाहू छत्रपति यांचे संस्थानास प्रतिवर्सी चालवावे. त्यांत मुद्दा नमूद केला कीं दुसरा हरयेक शत्रु सोंधा संस्थानावर चढून आला असतां पराभव करणेंस लागेल ती ( मदत ) करून शत्रु पराजय करून संस्थानचे अधिपत्य निर्विघ्नप्रकारें अनुभऊन देऊं ह्मणायाचा शपथ भाषापत्रांत करार करून देऊन मराठे याणी आपली ठाणी उठऊन संस्थानीं आगमन करावें; तों सोंधा संस्थानचे अधिपत्यांत सदरहु कुली देश चालत असतां मशारनिले महाराजश्री यास सदाशीव राजेंद्र

नामाभिधानी पुत्र जन्मोदयात आला. त्यास राज्याभिषेक केला. नंतर याच प्रकारें राज्यभार चालवीत असतां कांहीं वर्षें गुजरलीं. तदनंतर नबाब बहादर यांनी पट्टण वगैरे माहाल थोर थोर संस्थानें काबीज करून चालत असतां सोंधा संस्थानाधिपती यावर कांहीं मात्सर्य भावार्थ सुलतान यास समजावितां सबळ फौजेची जमाबंदी करून ४०००० चालीस हजारच समूह येकंदर सोंध संस्थान काबीज करणेचा प्रसंग मशारनिलें राजेंद्र यास कळतांच मशारनिले सुलतान याजकडे रदबदली चालवून सदरहु नेमिले फौजेची तहकुबी करून लाविली. आणि + + विचारें स्वफौजेची बळकटी करणेस युद्धाची सामोग्रीसह तयार करुंस प्रारंभून इकडे सदरहु भाषापत्राचे अन्वयाबरहुकुम राजे मराठे छत्रपती याचे, पाठऊन कुमक मागितले प्रसंगी शिपायास मुकुर जाहाले; तो सुलतान याचा तर पराजय करणेस स्वफौजेचे जमाबंदीने होत नाहीं; करितां हजरत बादशाहा पुतुर्गेज याचे संस्थानी पूर्वस्नेहाबमोजीब राजवटी चालऊन कुमक मागितली असतां देणेस निशा दिला परंतु तत्काल मिळत नाहीं. ऐशी दिरंगता दिसण्यांत आल्यावरून पुढील भविष्यार्थ समजात आणून, देशकालवर्तमानावर नजर दऊन परमविश्वासनिधि म्हणायाचा किता बाहजरत बादशाह यांणी वागवीत आहेत, पेशां पुढा सर्वार्थी पूर्ण विश्वासपूर्वक सोंधा संस्थानास कुमक असावी करितां तारीख फिरंगी २४ माहे जून सन १७४२ शके १६६४ आषाढ ३ हे मितसि भाषापत्र सोंधा संस्थानातर्फे सरदार वकीलीचा कृष्णराव नामाभिधानी १

( पुढें गहाळ )

---

## बोकडबागकर प्रतापराव मुख्यसरदेसाई यांचे कागदपत्र.

ले. ४९८ | श. १६१५ चैत्र शु. १३
इ. १६९३ एप्रिल ८

( फारसी मजकूर )

अज सरकार मुस्तफाबाद उरुफ दाभोल ताहां मुतसद्दीयांनी व देशमुखांनी व देशपांडेयानी व मोकदमांनी व खोतानी व कमाविसदारांनी जकायतहाय व बकालानी बालेघाट वगैरे घाट व आदाकारांनी व मुजरेयानी देहाय तपे अंतरुज व माहालानिहाय मामले फोंडा सुहुरसन सलास तिसैन अलफ बिदानंद चुं हजरत अलमगीर सलामत दखणावरी मोहीम फर्माविली ते वख्ती जागा जागा जमीदाराही हुकुम ज्याहामतो सादर जाहाला कीं गनीमावरी फौजा तैन जाहाल्या आहेत त्यांस सामील होऊन मेहनत करून मुजरा करून घेणें फौजदार कदरहाल सरंजामी करावे म्हणोन त्यावरून जुबदेतुल अमासील वल यकरान दुल्बा प्रतापराउ सरदेसाई मामले मजकूर येहीं पादशाही

कामावरी येकिन पेश करुन मामले मजकुरी जबरदस्तीनें गनीम होता त्यावरी आपला फर्जंद नागोजीराउ जमावानसी पाठउन गनीम चौगीर्द साकीजा केला व खासा मशारनुले पेशवा जईस कम घाटमाथा येउन मुलाकात घेऊन गनीम मारुन काढावयाची तरतूद करुन किले घ्यावयास फौजे बराबरी सामील होऊन बहूत कस्त केली व गड किला कबज जाहलेवरी विलायतीची लावणी संचणी बमेहनत करुन अबादानी करविली व लस्कराबराबरी राजापूर-तलग मसलत केली व दरीवख्त मामले मजकुरी गनीम आला ते वख्ती हमराहा असोन कस्त केली या सबब मारनुलेचा करीना वारीसदारामधे बडे मोख्तसर ऐसे कलो आले नमक हलाली दौलतख्वाई जाहीर जाहली त्यावरुन मेहरबान होउन मिरास सरदेसगत व नाडकर्ण हक लवाजिमा व पटीपछोडी इनाम देह व बागायत व जिरायत व समाइक याचे निम खेरीज सिकस वारीसदारानी राउ मारनुले व बनाम खासा राउ मारनुले व फर्जदानी नागोजी-राउ व रामाजीराउ व मुतालीक मुकुंद सेणवी बागायत व जिरायत व जकायतपैकी हक बरहुकुम फर्मान व सनद अदलखानी व भोगवटा किा अदलखान चालिलेप्रमाणे दुमाला करुन दिले असे

| | | | |
|---|---|---|---|
| | | बेरीज | |
| नकद तीन हजार | इनामगांव व बागायत व जिरायत | | |
| साहासे सत्याणव | व जकायतपैकी | | |
| रुपये दाहा आणे | बीजमाल बि॥ | इनाम व हक खासा | |
| बितपसील | उपज रुपये २१५१॥- | व फर्जदानी व मुता- | |
| ३०७६॥= बीजमाल हक | पैकी निमे राउ मार- | लिकानी उपज रुप- | |
| सरदेसगत व ना- | नुले रुपये १०७५॥।-॥ | ये २९८१।-॥ दोन | |
| डकर्ण रुपये ६१५३।- | एक हजार पंच्याहतर | हजार नवसे एक्यासी | |
| पैकी निमे राउ मार- | रुपये साडेबारा आणे | रुपये साडेचार आणे | |
| नुले | आरा | आरा | |
| ६२१८ इनाम खासा व | ठिकणे | ठिकणे | कलमे |
| फर्जदानी व मु- | बागायत | बागायत | दोन २ |
| तालीक | व जिरायत | व जिरायत | गांव |
| ४३०८ दस्तपैकी | चालीस | चौऱ्यासी | भाटी |
| १९१८ खेरीज हस्त | ४० | ८४ | एक |
| —— | पैकी निमे | | १ |
| ६२१८ | | | |
| ३६९७॥= | | | |

——

मजकूर साहेबास मुकासा० महाली कारकून ताजे खुर्दखताचा उजुरू करूं लागले आपले इनाम आपेल दुमाले करीत नाहीत तरी साहेबी नजर० कारकीर्दी रुस्तुमेजमा सन सीतामध्यें जैसे चालिले आहे तेणेप्रमाणे इनाम अजरामऱ्हमत केलिया साहेबाचे ज्यानइनामास द्वा देऊन गरीब गुरिबास आटारोटी घालून सबावाचे काम आहे सदरहू इनाम बिलाकुसूर मऱ्हामत केली पाहिजे व सरंजाम होय म्हणुऊनू मालुम जाले बाराये० मोरेश्वर गोसावी सेकिन क्षेत्र मोरेश्वर यास इनाम अजरामऱ्हामत बदल लंगर अटारोटी फकीरफुकीराना दरोज लाहारी हुर्मजी दोनी २८ जागा माहासूल व जरीबे व जकाती व हरएक दस्तबाब कसबे मजकूरपैकी बा। खुर्दखत रुस्तुमेजमा व फर्मान हुमायून दिधला असे कारकीर्दी रुस्तुमेजमा सन सीतामध्यें जैसा भोगवटा रुसकाती चालिले असेली तेच प्रमाणे दुमाले कीजे त्याचा मुकासा अमानत केलियावरी ते तरीखेपासून भोगवटा तुटली असेली त्याचा उजुरू न कीजे सदरहू इनाम हुजरून अजरामऱ्हमत केला असे येक जरीयाचा कुसूर न कीजे पेशजी इनामाती केली आहे ते दुरी करून इनाम मऱ्हमत केली असे बिलाकुसूर दुमाला केले असो दुमाले कीजे पेस्तर याची फिर्यादी येऊं न दीजे औलाद० दर हर० तालीक० सदरहू इनामास मुसलमान अगर हिंदू ० तादानद रुजु सुरनिवीस तेरीख १४ माहे रबिलावल

---

ले. ५२६ | श. १५६८ फाल्गुन.
इ. १६४७ मार्च

श्री.

(फा.वा.शि. व मज.)

(फारशी वाटोळा शिक्का)

अजर० खुदा० खान आली० खान रणदुलाखान खु० ब० कार० देस० आदि० तपे पांच मा० मुरंजन उ। कलियान सु। सबा आर्बैन आलफ मोरेश्वर गोसावी स्थानक मोरेस्वर हुजुरु० आपणास इनाम देणे खान रुस्तुमे जमासाहेब बा। खु। आजरामऱ्हामत सन खमस आर्बैन आलफ दरोज लारी हुरमुंजी एकी १ जागा तपे चोण मामले मा। बा। महसूल व जरीबे जकाती व हरएक दस्तबाबपैकी दिधला बद्दल आटारोटी गरीब गुरुबा दिधला खु। घेऊनु आपण माहालास गेलो माहाली खु। दाखवुनु माहालीचे भोगवटे खु। घेतले ते घेऊनु तपे चोणेसी गेलो बा। खु। तसरुफाती होवी तलग अखेर साल जाले ते साली काही भोगवटा पा। पडले नाही दुसरे साली तसरुफाती होवी तलग माहाल साहेबास मुकासा अर्जानी जाला साहेबाचे कारकून माहालास आले त्यासी बोलता साहेबाच्या ताजा खुर्दखताचा उजूर करु लागले यावरी आपण साहेबाचे बंदगीस ताज्या खु। बदल आपला मुतालीक पाठविला होता आमा साहेबाचे खु। जाले नाही आपण रजीस होऊनु स्थानक मोरेस्वरास गेलो साहेबाचे बंदगीस यावया ताकत जाली नाही आपण खुदातरस आहे सदरहू इनाम खु। देवाविलिया ते घेउनु त्याचा आटारोटी गरीबगुरुबास वांटून

देऊन सबाबाचे काम आहे तरी साहेबी नजर० सदरहू इनाम अजरामऱ्हामत दरोज लारी हुरमुजी एकी १ आहे तेणेप्रमाणे मोकर केली पाहिजे दरीबाबे खुा होये म्हणौन मालुम जाले तरी मोरेस्वर गोसावी स्थानक मोरेस्वर यासि इनाम अजरामऱ्हामत बाा आटारोटी गरीबागुरुबा दरोज लारी एक हुरमुजी १ जागा तपे चोण मामले माा महसूल व जरीबे जकाती व हरयेक दस्त जागा पैकी बाा खुा खान रुस्तुम जमा साहेब दिधले आसे तेणेप्रमाणे दुमाल करणे कारकीर्दी खान रुस्तुमे जमा व साल गुा भोगवटा जाला नाही याचे उजूर न कीजे सदरहू इनाम अजरा मऱ्हामत दिधले आसे दुमाले कीजे जरीयाचा उजूर न करणे औलाद० दर हर० तालीक० यासी मुसलमान आगर हिंदु० मोर्तबसुद ( षट्कोनी मोर्तब )

रुजु सुरु

निवीस

तेरीख माहे सफर

---

ले.५२७ } { श. १५६९ वैशाख शु.५
इ. १६४७ एप्रिल २८

( शिवाजीचा 'प्रातिपद' शि. )

अज र०रा० सिवाजी राजे दाम०व०हुदे०व मोक० मौजे लेर्णा बाराऊ करडीयाची पाा सुर्पे बि० सुहूर सन सबा अर्बैन अलफ दरीविले मोरेश्वर गोसावी सोकिन मोरेश्वर हुजूर० आपणाम्र इनाम जमीन चावर सुल ( तानी ) येक दर सवाद मौजे मजकूर बाा फर्मान हुमायून व खु ( र्दखत ) वजिरानि कारकीर्दी दरकारकीर्दी देखील मह० व तमाम ल्वाजिमे व वेटी व बेगारी व फर्मायेसी + + ( बेले ): कटी व जंगपटी व पायेपोसी व मेजवानी व मोहीमपटी व खर्चपटी व तेजीपटी व कानुनी व कदीम व जर्दाद व तूप व फसेली व सादिल्वार व हकल्वाजिमे देसाई व सेटे व बाजे कुल० नकदी व यैनजिनसी भोगवटे व तसरुफाती चालिले आहे भोगवाटेयाची खुर्दखते फितरतीकरिता आपणापासुनु गेली या बद्दल कितेक साल भोगवटा तुटला आहे हली मौजे मजकूर साहेबास मुकासा० माहाली हुदेदार ताजिया खुर्दखताचा उजूर करिताती दरीबाब नजर० सदरहू इनाम दुमाले करावया हुकूम फर्माविला पाहिजे बिनाबरा० मोरेश्वर गोसावी यासि इनाम जमीन चावर सुल्तानी मेत येसू रेयेती (येथे पूर्वीप्रो इनामाचे वर्णन) देखील पेश अजी बाब जली असेली ते पेस्तर जे बाब होईल ते देखील दुमाले केली असे महाली भोगवटे व तसरुफाती ( वाजे ) रानी कारकीर्दी दर कारकीर्दी जैसे चालिले असेली तेणेप्रमाणे मनास आणोनू दुमाले करणे दर हर० तालीक घेऊनू मोर्तबु सुद

तेरीख २ रुजु सुरु ( निवीस )

रबिलाखर

---

ले. ५२८ } { श. १५६९ ज्येष्ठ शु. १
{ इ. १६४७ मे २७

( फारसी मजकूर )

अजर० खुदा० खान आली० १ खान आजम रणदुलाखान दुयाम० व० कार० ( फा. व देस० व आधि० तपे पाच मा० मुरजद उा कल्याण बि० सुा समान शिका ) आर्बैन अलफ बा मोरेस्वर गोसावी सो क्षेत्र मोरेस्वर हुजूर० आपणास इनाम बा लगर आटारोटी फकीरफुकीरा गरीबगुरुब दरोज लारी हुरमुजी येकी १ जागा नख्त व जरीबे जकाती व हरयेक दस्त जागा तपे चोण मामले मजकूर पैकी देणे अजरामऱ्हामती बा सनद रवा आहे दरी बाब ताकीद खुा येकदोनी साल गुा सादर आहेती आमा माहाली कारकुनी बा सनद सरंजाम करून जागा सरस नेमुनु देऊनु सदरहू इनाम लगरखैरातीचे काम चाली लाविले नाही म्हणौनु तरी मोरेस्वर गोसावी क्षेत्र मेरेस्वर यासी इनाम बा लंगर आटारोटी फकीरफुकीरा गरीबगुरब दरोज लारी हुरमुजी येकी १८ सदरहू जागा तपे चोण नख्त मा व जरूबे व जकाती व हरयेक दस्तजागापैकी अजरामऱ्हामती बा खुा सनद सादीर असौन दरी बाब येक दोनी ताकीद खुा सादर आसतां सरंजाम होत नाही याचा काये माना आहे आता खुर्दखत देखताच इनामदार माइलेचा सदरहू इनाम दरोज लारी हुरमुजी येकी सदरहू लिहिले जागा पैकी बिलाकसुर रोज बरोज आदा करीत जाणे खैराती लंगराचे काम आहे हरगीस लंग पडो ने दीजे येक रुका गैर आदा राहो ने दीजे व पेस्तर याची घडी घडी फिर्यादी येऊ ने दीजे कुल इनाम कमज्याजती मिम्न करून माहालास खुा आगर इशारती सादर जाली तरी याच्या इनामास इस्कील व उजूर करणे वाजीब नाही बेकुसुर याचा इनाम सदरहू लारी हुरमुजी येक साल बसाल समुर्दा लारी रोज बरोज आदा करीत जाणे यासी सदरहू लारीस येक सरस जागा महालीहून तपे चोण पैकी मोडून करून देणे हे देणे खुदा जरूर रजा आहे यास रंजीस न कीजे औलाद० दर हर० तालीक० यास जो कोण्ही इस्कील० पा हुजूर रा कारकून मोर्तबु सुद (वा. मो.)

| | |
|---|---|
| रुजू दफतर | रुजू सुरू |
| खास | निवीस |
| तेरीख २९ | माहे |
| रबिलाखर | रबिलाखर |

वार

---

ले. ५२९ } { श. १५६९ आषाढ
{ इ. १६४७ जून जुलै

( फा. वा. शि. )

अदाथाजी ! इजत असा ( र ) बाजी कार० मा० इसलमाबाद उरफ भिवडी सुा समान अर्बैन अलफ + प्रज उकी दरिविला खुर्दखत हजरती नबाब किबलगाही हे

बुसादत जाले......... मोरेस्वर गोसावी सा क्षेत्र मोरेस्वर यासि इनाम रो ( जि ) ना हुरमुजी लारी ३ बा फर्मान खुा रुस्तुमे जमा + मामले मजकूर रवा असे बिा

कसबे भिउडी बा महसूल व जरीबे व जकाती व हरयेक बाबे पैकी लारी १

पा कोरकोडा बा मा व जरीबे व जकाती व हरयेक बाब पैकी १

ता मुरगाड देऊपे मा व जरीबे व जकाती व हरयेक बाब पैकी लारी १

येणे प्रमाणे सदरहू इनाम अजरामऱ्हामत केले असे कारकीर्दी रुस्तुमे जमा दर साले सन सीत मधे भोगवटा तसरुफाती चालिले असेल तेणेप्रमाणे दुबाला केले असे दुबाला कीजे म्हणउनु तरी इनाम सदरहू मोरेस्वर गोसावी याचे दुमाले केले असे मी उ म (ग) ला सा हजरत होनुपैकी सीस्त प्रमाणे आदा कीजे असल खुर्दखत माहालास पाठविले असे तालिक० दरी बाब अज ई फिर्यादी येऊ न दीजे ता आज तेरीख माहे जमादिलाखर

---

ल. ५३० } {श. १५६९ मार्ग शु. ७ / इ. १६४७ नोव्हें. २३

अज र० रा० सिवाजी राजे दाम० ब० कार० ता कऱ्हेपठार पा पुणे बि० (सुा ) ( रवा सुद ) समान अर्बैन अलफ दर्सावले श्री मोरेस्वर गोसावी सेकिन मोरगाउ ता मजकूर हुजूर० आपणास इनाम दर सवाद मौजे मजकूर चावर निमे-॥- देखील नख्त० व खर्चपटी व पायेपोसी व सेल्बैल ता ठाणे व ता देहाये दिल्हा आहे तेणेप्रमाणे चालत होता दरम्यान सन खमसा कारणे मौजे मजकुरीचे हुदेदारी व मोकदमी इस्कीळ करून सेल्बैल व मोईन सादिल्वार निा ठाणे व गावखर्च तुटपटी व हकदार व तूप कानूचे व पटीचे व हुमायून पटी व बेले खेडच्या पाटियाची तकसीम मागत होते म्हणौन सदरहू हकीकती मा दादाजी-पंत सुभेदार त्यासी गोशगुजार केली त्यावरून पंडित माइलेने सनद दिधली होती कीं मौजे मजकुरीचे अज कासेस सदरहू इनाम बाद देऊन वरकड कासेवरी पटीकरून गावांची उगवणी करीत जाणे कुलबाब पटीया माफ केल्या असेती पेस्तर नव्या होतील त्या साला-बाद माफ केल्या असेती इनाम सेत घरवाहो करितील अगर प्रजेसी लावितील त्यासी वेठी बेगारी हरयेक बाबे येक जरीयाची तसवीस न देणे म्हणोन सनद दिधली होती तेणेप्रमाणे ता साल गुा तसुरफाती चालिली हली साल मा कारणे सदरहू ठाण्याबाबे व गाव निा पटिया नख्त व येन जिनस पटीकरून इनामतीच्या सेतावरी पटीची ता घातली आहेत दरी-बाब सरंजाम होये बिनबा रा० सदरहू इनाम देखील नख्त० व खर्च पाटिया व पायपोसी व सेल्बैल ता ठाणे व ता देहाये दो मोईन सादिल्वार बाबहाये निा ठाणे व गावखर्च तुटपटी व हकदार व तूप कानू व खा व हुमायून पटी कडबे व वेठी व वेगारी व बाजे पटिया हाल व पेस्तर कुल० दिधला असे ता साल गुा सदरहू प्रमाणे चालिले असोन साल मजकुराकारणे इस्कील करणे काये माना आहे हली एक जरीयाची तसवीस न देणे

दर हर० औलाद० पेस्तर फिर्यादी येऊ न देणे असेली श्री मोरेस्वर गोसावी या पासी परतून देणे मौजे मजकुराचे मोकदमे हली पटी घातली आहे त्याची तसवीस न दणे पेस्तर यासि येक जरीयाची तसवीस लागो न दणे सदरहू इनाम मौजे मााचे अजकासेपैकी अजी बाद देऊन बाकी कासेवरी पटी + + जाणे तालीख मोर्तब सुदु ( ष. को. )

रुजु सुरु
नीवीस

तेरीख ६ माहे जिलकादि
जिलकादी

रुजु सुरु सुद

---

ले. ५३१ } { श. १५६९ पौष शु. १ इ.१६४७ डिसे.१६

( प्रतिपद् मु. )

*अजर० रा० सिवाजी राजे दाम० ताा मोक० मौजे मोरगौ ताा कऱ्हेपठार पाा पुणा बि० सुाा समान अर्बैन अलफ अर्दास छ २० जिलकादी राा छ २८ मीनहू मजमू की साहेबाचे रजे बरहुकूम राजश्री मोरेस्वर गोसावि यासि इनाम सेत नाा वाट वटगौ थल थोपटीयाचे कास रुके १ राा गोसावि याचे दुमाले केले देखील नख्त० गला व कडबा + + + कुल० सदरहू इनामती आज कास सालबाद देउनू येक जरियासि तसवीस लागो नेदू म्हणोन लिहिले मालूम जाले सदरहू इनामास येक बब इस्कील न करणे खुाा प्रमाणे दुमाले करणे तालीक० मोर्तब सुद (ष. सी )

रुज सुरु
निवीस

तेरीख २९ माहे जिलकादी
जिलकाद
रुजू सुरु सुद

---

*याच तारखेचीं, मजकुराचीं व शिवाजीनेंच मोरेश्वर गोसाव्यांस दिलेलीं आणखी २ पत्रें आहेत त्यांचें सार पुढें दिलें आहे.

| अधि. व अधिकार-प्रदेश | गाव व जमीनीचें वर्णन |
|---|---|
| १ मोक मायेवाडी ताा कऱ्हेपठार पाा पुणें | मायेवाडी -॥- चावर थल वागटेंभी कासरुके ६ प्रज माहाराजी कनकोजी जगथाप |
| २ " नायगाव " | नायगाव थळ परीटधुणें -॥- चावर टके -।६ प्रज नागोजी तुकोजी बोरकर |

ले. ५३२ } { श. १५६९ पौष शु. १
इ. १६४७ डिसें. १६

[ शिवाजीचा अष्टकोनी अस्पष्ट शिक्का ]

अज र० रा० सिवाजि राजे दाम० ब० कार० ता कऱ्हेपठार पा पुणा बि० सुा
रवा समान अर्बेन अलफ अर्दास छ २५ जिलकादी रा छ २८ मिनहू मजमून की
सुद साहेबाचे रजेप्रमाणे राजश्री मोरेश्वर गोसावी यासि इनाम मौजे मोरगौ
थोपटियाचे पटीपैकी जमीन कास रुके ८७ साता दुमाले केले व मौजे मायेवाडी चावर गज
शरायेनी निम प्रज मल्हारजी जगथाप थल वागटेभीपैकी जमीन पोलाज चावर निम -॥-
येकुनु कास रुके ८६ सा दुमाले केले व मौजे मायेगौदेऊ चावर गजशरायेनी निमे थल
परीटधूण मिा रुके -।६ पैकी मधील पाची चावर निमे -॥- येकुनु कास रुके ८६ प्रज
नागोजी बोरकर दुमाले केले असे सदरहू इनाम सेतावरी अवल सालापासुनु साल्मजकुरीची
पटीची ता अर्जी असेली ते दुमाले करणे म्हणौनु रजा तरी इनाम सेतावरी पटीची तकसीम
आली होती ते दुमाले केली

मौजे नायेगौ टके मौजे मायेवडी

८॥।८॥ ५॥।

येकुनु टके १०॥८॥ दाहा व आठ बतिस रुके दुमाले केले म्हणौनु लिहिले मालुम जाले
पेस्तरहि त्याचे सेतावरी पटी येईल ते पाडेवारी कुलबाब त्यांचे दुमाले करणे छ २९
जिलकादी मोर्तब सुदु ( अस्पष्ट ष. सी. )

तेरीख २९ माहे जिलकादी रुजु सुरु
जिलकादी रुजु सुरु सुद रुनिवीस

---

ले. ५३३ } { श १५६९
इ. १६४७-१६४८

( शिवाजीची प्रतिपद् मु. )

अजर० रा० सिवाजि राजे साहेब दाम० ब० कार० व देस० पा पुणे बिदानद
सुा समान आर्बैन आलफ बाो राजश्री मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर हुजूर० आपणास
इनाम देणे माहाराजाचे दर + + ......... गजसरायेनी चावर येक येकूनु कास रुके ८७
ता कदीम इनामपटी गोयाजी थोपटे यासेजारील वरील पटी वाट नजीक
मौजे मा। जमीन गजशरायनी निम -॥- वडगाउ थल थोपटपैकी जमीन चावर
येकून रास + + नीम (-॥-) येकून कास रुके ८३॥
येणेप्रमाणे माहाराजे दिधले आहे तेथें आपण + + करोनु कीर्दी करोनु तेथील धाने निघेल
ते ब्राम्हणमुखी घालून महाराजासी कल्याण चितोन व सदरहू इनामामधे आपण विहीर
पाडोनू सागे सबाजी लाऊनू व केली व आबराई व बाजे झाडझाडोरा रा + + झाडे लावुनू
बागाइत करून तेथे जे उतपन होईल ते सर्वोत्तमास अर्पून महाराजास आसीरवाद

देऊनू तरी येबाबे खुर्दखत दीधले पाहिजे + + + हरयेक बाब तोसीस व मौजे मजकुरीची तोसीस न लगे यैसे केले पाहिजे व मौजे मजकुरीचे हुदेदार व मोकदम आपला इनाम कुलबाब कुलकानू दुमाले असोनू सेलबैल + + + सादिलवार व हकदार निा ठाणा व सेव व गावखर्च व तूटपटी व तूप व कडबा कानूचा व सुदर ठाकूर व गवता व बाब ताकल व मौजे मजकुरी अज बेरीजहून जाजती खडणीया होत आहेती व हुजरून ज्या नव्या पटिया होत आहेती त्याची तकसीम [आ] पणापासी सेतावरी मागताती तरी आपणापासी सालाबाद सदरहू पटी व आवाजेवा कुल दुमाल० केला पाहिजे म्हणौउनु मालुम केले बराये० आणौउनु राजेश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरेस्वर यास इनाम बदल धर्मादाउ हुजरून अजरामऱ्हा [म] ती दर सवाद मौजे मोरगाउ पाा मजकूर [येथें वरीलप्रमाणें इनामाचा तपशील] येणेप्रमाणे कुल० दिधले आहे तैसे राजश्री घरी चाकर व बैल ठेऊनू घरवाहा जिरात करितील आगर सदरहू इनामामध्यें विहीर पाडूनु बागाइत करितील साग बजी व केली आबराई व बाजे झाडझाडोरा व फुलझाडे लावितील तेथे जो उपन निपेन तो कुल हुजरून याचे दुमाला केला आहे तुम्ही ठाणाहून एक जरियाची तसवीस लागू न देणे व काो मजकुरीचे गावसमधाची एक जरियाची तसवीस लागू ने दणे व यास इनाम कुल० दिधला असोनु मौजे मजकुरीचे हुदेदार व मोकदम यापासी सेलबैल व मोइन सादिलवार व हकदार निसबत ठाणा व पेठ गावखर्च तूटपटी व तूप कानूचे व सुदर ठाकूर व बाब नवकल व गवत व वेठ व मौजे मजकुरी अज बेरेजेहून जाजती खडणी होन आहेनी व हुजरून जा पटिया होत आहेती (अपूर्ण)

---

ले.५३४ | श. १५६९<br>इ. १६४७-४८

देणे बाा रम × × × × ×
खुर्दखत

( प्रतिपद मुद्रा )

... ... ... सिवाजी राजे दाम० ब० कार० व देश० पाा पुणे बि० सुा समान अर्बैन अलफ वाा... ... स्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर हुजूर० ... ... यासि गाई दाहावीस आहेती तेणे करून......ब्राह्मण अतीत अभ्यागतास पावते ......गाईस चारावयास रान नाही हमशाई गा......गेलीया गुराची निगा होत नाही + + अतीत ब्राह्मणास पावणार नाही माहाराज गोब्राह्मणाचे प्रतिपालक आहेती गाईचा प्रतिपाल केलिया बहुत पुण्य आहे यैसीयास आपला × × दर सवाद मौजे मजकुरी आहे त्यास सेजारी मुतसील पटी पडी नाा वाट वडगौऊ कास रुके ८३ आहे अमा नाकीर्दी पडिली· आहे साल मजकुराकारणे प्रतापेस उखते प्रजेस लाविले आहे महाराज कृपाळू हो...सदरहू पटी इनाम दिधलिया गाईचा प्रतिपाल करून कल्याण चितून दरीबाब सरंजाम होये

बिनाबरा० मोरे [स्वर] गोसावी याच्या गुरास × × नरसपत पडी सेत (दरसवाद मौजे मोरगौऊ) माईलेच्या इनामतीच्या सेता नजीक वाट वडगौऊ कास रुके ८३ तीन थल थोपटियाचेपैकी इनाम दिल्हा असे तेथे गुरे चा.........याचा उजूर न करणे सदरहू थोपटीयाची पटी कास रुके ८३ तीन यावरी + सा रयेतीने इस्ताव्याने सेत लाविले आहे तेणे............दरहरसाल देत जाणे पेस्तर + काम पुरवल्यावरी सदरहू पटीवरी नख्त बाबे लागरे जे हिसेत्रे जे येत जाईल तेवढाला महसूल तूप व कडबा व वेठी व बेगारी व बाबहाये बीा स इनामतीचे कुल० रयेतीस मजुरा देऊ गोसावी यास येक जरियाची तसवीस नेद्णे सदरहू पटी इनामती (आज माहे)साले द देणे सेताची हद०...... खुर्द० औलाद० तालीक० मोर्तब सुदू(मर्या. सी.)

रुजू सुरु
निवीस

---

ले. ५३५ } { श. १५७० भाद्र० शु. १५
इ. १६४८ आगष्ट २३

( प्रतिपद् मुद्रा )

अज र०रा० सिवाजीराजे दाम० ब० तिमाजी बापूजी तरफदार तरफ कन्हेपठार पाा पुणा बि० सुाा तिसा अर्बैन अलफ मोरेश्वर गोसावी सो श्री यासि मौजे नायेगौ व मौजे माये (वाडी) अजरामन्हामती इनाम आहे खुर्दखतप्रमाणे साल गुाा कुल० दुमाला पडिले असोनु सालमजकुरी सिस्ती केलि यार्चा तकसीम याचे प्रजेवरी आली ते तरफदारे तहसील केली म्हणोनु हुजूर माल्लूम जाले तरी साल गुाा प्रमाणे कुलबाब याचे दुमाले करणे उचापती केली असेल ते फिराऊनु दीजे पेस्तरहि याचे इनामासि येक जरा तसबीस नेदणे पडिले पान त्याचे दुमाला करणे मोर्तब सुद

तालीक० मोर्तब सुदु रुजू सुरु
तेरीख १३ माहे साबान. निविस

---

ले. ५३६ } { श. १५७०
इ. १६४८-४९

अज र० रा० सिवाजी० राजे दाम० ब० कार० व देस० पा पुणे सुाा-तिसा अरबैन अलफ बो राजेश्री मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर हुजूर० माहाराजे आपणासी ++ अजरामन्हामती जमीन चावर गज शरायेनी येक १८ येकुनु कास रुके -।- बारा ताा मायेवाडी प्रज मल्हारजी जगताप थल मौजे नायेगाव देवाचा प्रज नागोजी बोरबागटेंभीपैकी जमीन गजशरायेनी नीम कर स्थल परीट + + पैकी जमीन चावर येकुनु कास रुके ८६ गजशरायेनी नीम -॥- येकून कास रुके ++

येणेप्रमाणे माहाराजे अजरामन्हामती दिधला असे ते खुर्दखती मजमू की चालती

कास प्रमाणे जे याचे प्रजेवरी + + ळ ते दुमाले करणे यैसे असोनु महार्ला कारकून देहाये मजकुरीचे जमीन कुळी याचे अज कासेवरी नक्तबाब वाटणी + व कासेवरी आलें तें दुमाले करुनु दस्तमलिक खर्च लिहिला चाल्ती कासप्रमाणे आपणासी जो अदा जाला त्यासी जमीन + + णी प्रमाणें बेरजि मजुरा देउनु वरकड बाकी आपणांवरी काढिली तरी हे देणें महाराजाचे आहे आपण सर्वोत्तमाचे + + करूनु सर्व काळ माहाराजास कल्याण चिंतितो माहाराजे कृपाळ होऊनू मौजे मजकुरी चाल्ती कास सालाबाद लावगण जैसे जे गावामध्यें होत जाईल ते आपले प्रजपासीं सदरहू कासेची उगवणी होत जाईल नक्तबाब नक्तयाती व + देसमुखपटी व खर्चपटी व पायेपोसी व भेटी मोईन सालदिलवार व पाडेवारी व हक-दार व तेर्जापटी व मोहीमपटी व सुदर ठाकूर व गवत व बेटे व खर्चखेरीज पुढे ज्या पटिया सालाबाद होतील त्या गाव निसबती व ठाणे निसबती + व कीर्दी लावगण प्रमाणे गावामध्यें उगवणी जैसी कासेवरी होते तेणेंप्रमाणे आपले कासेवरी ताा येईल ते आपले दुमाले कुली ( केली आहे ) बाकी आपणावरी काढिली आहे ते माफ केली पाहिजे म्हणौनु मालुम केले मालुमाती खातिरेस आणौनु राजेश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरेस्वर यांस इनाम हुजरुनु अजरामऱ्हामती ( येथें वरच्यासारखा इनामाचा तपशील ) येणेप्रमाणे देखील नख्तबाब कुल सदरहू बाब निसबती ठाणे व निसबती देहाये देखील बाजे पटिया पेस्तर व हाल होतील त्या कुल देहाये मजकुरी कीर्दी लावगण सालाबाद होत जाईल ते कुल दुमाले करणे म्हणौनु खुर्दखत सादर असोनु तुम्ही ऊजूर करूनु जमीन कुलि यावरी अज कासेवरी वाटणी करुनु जे नख्त आले ते दुमाले केले वरकड बाकी गाव निसबती दिला तरी खुर्दखती रजा यैसी असोनु तुम्ही दरम्याने अमल यैसे करणे हे तुम्हांस कोणे फर्माविले होते यावरूनु काये + +आतां खुर्दखत अहडतेचे देहाये मजकुरी सालाबाद जैसे कीर्दी लाव-गण लागले टपेचे हिसैब होत जाईल ते + + याचे कासेवरी पडले पानाची बेरीज बैसेली नख्तबाब कुल व सेलबैल व सरदेशमुखीपटी व मोईन सादीलवार व + + पाडेवारी व बाजे कमाविस व सुदर ठाकूर व तैवज व गवने व वेठे व पटिया हाल व पेस्तर गाव निसबती ठाणे निाा देहाची + + ईल ते याचे दुमाले करणे दस्त मलिबे झडतीस कीर्दी लावगण प्रमाणे जे बैसेली तेणे प्रमाणे खर्च लिहिणे व साल गुाा देहाये मजकुरीवरी जमीन दुमाला अज-कासेवरी वहाणी करूनु हिसेब केला आहे त्या हिसैबयावरी गावनिसबतीने बाकी काढिली होती ते यास माफ केली असे याच्या नावे खर्च लिहिणे व देहाये मजकुरी अज कास जुमला आहे यासी सालाबाद लावगण करू + + तुटत असेल उरले कासेवरी उगवणी करीत असाल तेणेप्रमाणे याचे कासेवरी येईल ते दुमाले करणे जे जमीन + + मध्ये लावगण करिता तुटत असेल त्या खेरीज नख्तबाब कुल देहाये मजकुरी होऊन पुरवणी करूनु देत असाल त्या + + पुरवणी येईल ते तकसीम याचे कासेवरी येईल ते हुजरून दुमाले केली असे तुम्ही दुमाले करणे. व मौजे नायगावु येथील कुणबी गोसावी याच्या इनामास हरकती केली की अज-कास रुके ८६ त्यामध्ये कीर्द रुके ८३ यैसे म्हणती म्हणौनु मालूम केले तरी हुजरूनु काली पोलीज कीर्दी जमीन मऱ्हामती केली असे यैसे म्हणौनु दरम्यान उजूर करूनु इनामास खलेल

करणे काय रुजु त्यास ताकीद केली पाहिजे आतां खुर्दखत अहडतेचे गोसावी यास इनामकीर्दी काली रुके साहा दिधले आहे तेणेप्रमाणे दुमाले करणे इनामामध्ये कीर्दी करिता रुके ८३ नाकीर्दी राहिली रुके ८३ × × हाली खालीसा सेत प्रजेची वहाती कास त्यामध्यें रुके ८३ देऊनु कीर्दी लावगण रुके साहा दुमाले करणे एक जरी याचा उजूर नकरणे पेस्तर फिर्यादी येऊ नेदणें दर हर० औलाद० सदरहू इमानास हिदू० व मुसल्मान० तुम्ही तालिक० वेठी बिगार आवा जेवा कुल दुमाले करणे याचे प्रजेशी शेतांसी तुम्हांसी कांही निसबही नाही गांवा खेरीज असे इनाम निमेची खेश त्याचा उजूर न करणें गोसावी यांस + राइनाम मन्हामती केला असे तुम्हीं सारा इनाम दुमाले करणें उजूर न करणे मोर्तबु सूद ( ष. मो. )

रुजू सुरू

निवीस

---

ले. ५३७ } {श. १५७० इ. १६४८-४९

( 'प्रतिपद्' मुद्रा )

अजर० रा० सिवाजी राजे साहेबू दाम०ब० कार० व देश० पा पुणे वि० सुा तिसा आर्बे ( न ) अलफ मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर येही वदल गार्ह्याच्या + + + मौजे मोरगावी तेथे सेत महारुख कास रुके ८६ मुतलख पडी आहे ते ई + + वीयाने केली होती तरी हे देवाचे दास यास इस्तावीयाचे + केले न पाहिजे अंजी सबब इस्तावा माफ करून साल मजकुरा कारणे त्या मुतलख पडी कास रुके ८६ येकून मख्ता होनु १ खडला असे तेथे राजश्रीची गुरे चरतील त्याचे वाटे नव जाणे सालाबाद दिधले असे होनू येक मौजे मजकुरी महसुलात याचे नावे धर्मादाऊ म्हणौन लिहीत जाणे सालाबाद येणेचप्रमाणे चालवणे हरसाल तालीक व मौजे मजकुरी गुरावरी पाल घालावयाची खेसी आहे तरी गोसावी याची गुरे पडीमधेच चरतील त्यास पाल माफ सालाबाद असे तुम्ही यास येक जरीयाची तसवीस न देणे व त्या क्षेत्री ब्राह्मण स्थाई (क) व आगातुक यापासी गुराचे पाल मागताती म्हणौन मालूम केले तरी तुम्ही मौजे मजकुरी रदे हुदेदारास व मोकदमास लिहिजे की पाल माफ असे मालाबाद यास न घणे ब्राह्मणाचे वाटे नव जाणे ह (र) येक बाब येक जरा फिर्यादी अलीयानें तुम्ही जाणा म्हणौन खुर्दखत लिहिणे ( नि ) मोर्तब सुदु (मर्या० सं. ष को.)

---

ले. ५३८ } {श. १५७१ अ आषाढ व. १३ इ. १६४९ जून २७

( फा. शि.वा. )

अज र०अलीशानखान अफजलखान माहमदशाई खुली० ब० कार०वा देस०वा आधि० मा० पातशबाद उरफ चऊल वि० सुा खमसैन अलफ दरिविले मोरस्वर गोसावी सो स्थानक मोरेस्वर हुजूर० आपणास बा इनाम गरीब गुरबाची आटारोटी बा खुर्दखत मलिक

सेद वा मोकासाईयानि माजी रोजिना लारी २८ दोन्ही दरसवाद कसबे चऊल महसूल वे जरिबे व जकाती व हरयेक दस्तबाबपैकी दरोज रवा अस्त हाली मामले मजकूर साहेबासी मोकासा० साहेबी नजर० सदरहू इनाम दुबाला फर्माविले पाहिजे म्हणून मालूमो जाहले मेबायेद के सदरहू इनाम रोजिना लाहारी दोनी दरसवाद कसबे चऊल महसूल व जरिव जकाती व हरयेक दस्तबादपैकी बीमोजिब खुर्दखत रस्तुमजमाप्रमाणे भोगवटा व तसरुफाती कैसे सालाबाद चालिले आसेल त्याणेप्रमाणे दुबाला करून चालवीजे दर कारकीर्दी नबाब भोगवटा चालिले आसेल त्याचे उजूर न कीजे बऔलाद० दरहर० तालीक० पा हुजूर सदरहू लाहरी हुरमुजा बा खुर्दखत रस्तुजमा आसे बा भोगवटा चालवणे

तेरीख २६ जमादिलाखर

सुरु सुद

पो छ १९ रजब

---

ले. ५३९ } { श. १५७१ श्रावण शु. ९ / ता १६४९ आगष्ट १

( फा. मजकूर )

अज र० खुदा० खाने अजम आलीखान काजी साहेब खलद० ब० कार०व देस० व अदि० कसबे कल्याण व तपे अंबरनाथ मा मुरजन सुा खमसीन

( फा. शि. ) अलफ दारिविला मा अनाम मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरस्वर हुजूर० आपणास इनामबदल धर्मादाऊ आटारोटी गरीबगुरबा दरसवाद का मजकूर जागा जकाती बदर मा बा फर्मान व खुर्दखत मुकासाईयानी सालाबाद लारी १८ येक आहे यासि कारकीर्दी हजरती काबिला कुसूरकीची राईण मोईन करून दिधली ते ता कारकीर्द काजी साहेब चालत आहे हाली साहेबास मुकासा० खुर्दखत मऱ्हामत केले पाहिजे मालूम जाले मोरस्वर गोसावी क्षेत्र मोरस्वर याचा सदरहू इनामपैकी बा मोईन काजी साहेब लारी -।- पाऊका दुबाले केली आसे तुम्ही माहाली बा फर्मान व खुर्दखत मुकासाई यानी व भोगवटा व तसरूफात कारकीर्दी दर कारकीर्दी ता हजरती काजी साहेब खातिरेसी आणून जैसे चालिले आसेल तैसे चालवणे दरहर०तालीक०पा हुजूर रा आलखिान नवाब + मोर्तबसुदू ( ष. मो.)

तेरीख ७ माहे शाबान

---

ले. ५४० } { श. १५७१ भाद्र. व. ११ / इ. १६४९ सप्टेंबर २२

( अस्पष्ट 'प्रातिपद्' मु. )

अजर० रा० सिवाजी राजे दाम० ब० कार० पा पुणे बि०सुा खमसेन अलफ रा० मोरेस्वर गोसावि लिहिले आहे जे ; जुरुनु इनामदाराचे बाबे माहालास खुर्दखत आले आहे

त्यावरुनु ठाणाहुनु इनामती अमानत केले आहेती आपल्या इनामती गावगना आहेती

| | |
|---|---|
| मौजे मोरगावी चावर गजशरायेणी २ येकून कास रुके ।१८० | मौजे मायेवाडी चावर गजशरायेणी -।।- निमे यो कास रुके ८६ |
| मौजे नायेगौ चावर गजशरायेणी निमे यो कास रुके ८६ | बाग बिघे २० |

येणेप्रमाणे आहे तरी कारकुनास दुमाले करावयाची सनद देविली पाहिजे म्हणौउनु लिहिले आहे तरी हे देवाचे दास घरी अनछत्र आहे अजरामन्हामती आपले देणे आहे तरी याचा इनाम मोकला केला असे जैसी पेसजी सनद सादर आहे तेणेप्रमाणे सदरहू कासेबरी जे पडिले-पान येईल ते दुमाले करणे तालिक० ( ष. सी. )

तेरीख २४ रुजु सुरु

रमजान निवीस

सुरु सुद

---

ले. ५४१ } { श. १५७१ भाद्र. व.११ इ. १६४९ सप्टें. २२

( प्रतिपद्. मु.)

अज र० रा० सिवाजी राजे दाम० ब० हुदे० मौजे लोणी बाराउ कराडियाची पाा सुपे बि० सुाा खमसैन अलफ राजश्री मोरेस्वर गोसावी यांस इनाम मौजे मजकुरी आहे चावर १ येक बाा भोगवटा व तसरुफाती ताा साल गुाा चालत आले असेल त्याप्रमाणे दुमाले करणे उजर न करणे तालीक० ( ष. सी. )

रूजु सुरु
निवीस

---

ले. ५४२ } { श. १५७१ माघ शु. ११ इ. १६५० फेब्रु २

अज रे० खुदा० खान अली० खान अजम रुस्तुमे जमा खुली० ब०कार०व देसमु० व ( फारशी शिका ) अदि० मा० इसलामाबाद उरुप भिवडी बि० सुाा खमसेन आलफ दरी-विले मोरेश्वर गोसावी थानक मोरेश्वर हुजूर० आपणांस मामले मजकूर इनाम बदल धर्मा-दाउ बाा खुाा अजरामन्हामती राा इाा दरसाल सन खमस अर्बैन अलफ छ १७ मोहरम दरोज लाहारी हुर्मुजी ३ तीन दर सवाद बि॥

कसबे भिवडी जागा महसूल प्रा कोरकडा जागा महसूल व ताा मुरबाड जागा महसूल व व जरीबे व जकाती दर दस्त जरीबे व जकाती व हर एक बाव व जकाती व हरयेक दस्त

बाबपैकी दरोज लाहारी हुर्मुजी एक १ — दस्तबाब पैकी लाहारी हुर्मुजी एक१ — बाब पैकी लाहारी हुर्मुजी १

येणेप्रमाणें बाा खुाा राा मोअजम व बाा फर्मान हुमायून रवा आहे दरम्यान मामले माा मुकासा तगीर जाला होता मागुती साहेबास हली मुकासा० माहाली कारकून ताजा खुाा उजूर करितात‍ी नजर० खुर्दखत मन्हामती होये म्हणौनु मालूम जाले बराये० इनाम बाो मोरेश्वर गोसावी थानक मोरेश्वर यासि दरोज ( पुढें वरील प्राा इनामाचा तपशील ) बाा फर्मान हुमायून व खुाा राा ड्डाा जैसी तसरुफाती आमचे कारकीर्दीस चालिले असेली तेणे प्रमाणे चालवीत जाणे उजूर इस्कील न कीजे औलाद० दर हर० तालीक० पाा हुजूर मोर्तब सूद (ष. सी.) रुजु सुरुनिवीस

तेरीख १० सफर

---

ले. ५४३ } { श. १५७१ / इ. १६४९-५०

( 'प्रतिपद्.' मु. )

अजर० रा० सिवाजी राजे दाम० ब० कार० प्राा इंदापूर बि० सुाा खमसैन अलफ राजश्री——गोसावि यासी साल मजकुरा कारणे पेसजी ( इ ) नाम जमीन चावर दोनी रोज मुरा १८६

मौजे काझड १ — मौजे सलगौ चावर १ — जकाती माहाल

येणेप्रमाणे दिल्हे· आहेती तरी सदरहू दोही गावी हाली दर चावरे जे मोईन करुनु धारा बाधोनू नख्त ( ष्ट ? ) क हाण केले आहे त्याप्रमाणे बेरीज जे होईल ते झाडा करुनू देत जाणे रोज मुरा १८६ प्रमाणे बाधला आहे त्याप्रमाणे सालाचे पैके जे होतील त्यास येक रुका उणा न देणे दरसाल सदरहु लिहिलेप्रमाणे देत जाणे ( ष. सी. )

या खुर्दखताची तालीक०

---

ले. ५४४ } { श. १५७१ / इ.१६४९-५०

( प्रतिपद्. मु.)

अज र० राजश्री सिवाजी राजे दाम० ब० कार० व देस० पाा सुपे बि० सुाा खमसैन अलफ बाो राजश्री मोरेश्वर गोसावी क्षेत्रमोरे(श्व र) हुजूर० आपणांस इनाम बाा धर्मादाऊ दर सवाद मौजे पणदरे पाा माा जमीन गजशरायेनी चावर येक १८ येकून कास रुका ८१ येक कीर्द काली पोलीज प्रज + + जी धणगर मुजेरी मौजे माार थल से + + पैकी देणे फर्मान हुमायून व खेलोजी राजे व बाजी राजे घोरपडे बाा खुाा सन खमस आर्बैन अलफ देाा मह० व सेलबेल व सरदेशमुखपटी व मोईनी सादिल्वार व पाडेवारी व हक-

दार व खर्चपटी व पायेपोसी व बाबे जमा व भेटी व तेजीपटी व मोहिमपटी व बेलेकटि व जंगीपटी व कुल० नकदी० व कलमी० व इस्मी० व तूप व कडबा व खरीफ वेठी व रबी बेगारी व फर्मासी व आवाजेवा कुल० ता ठाणे व ता देहाये दिधले आहे तेणे प्रमाणे ता (सा)ल गुा चालिले आहे हली मौजे मा महाराजार्सा मुकासा० महाली ... खुर्द-खताचा ऊजूर करिताती तरी सदरहू इनाम मन्हामती करुनू खुर्दखत देविले पाहिजे म्हणौन मालूम जाले तरी राजश्री मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर यासि इनाम बदल धर्मादाऊ दर-सवाद मौजे मा जमीन कीर्दी काली पोलीज चावर गजशरायेनी १८ येक येकुनु कास रुका ८१ प्रज गोयाजी धणगर मौजे मा स्थल सेत ( पुढें इनामाचें वरील प्रो वर्णन ) दिधले असे तेणेप्रमाणे ता साल गुा चालिले आहे तेणेप्रमाणे मन्हामती केले असे तुम्ही दुमाले करणे. कारकीर्द माजी फितरतीकरिता भोगवटा सारा जाला नसिला तरी त्याचा उजूर न करणे हाली मौजे मजकुरी चलती कास सालाबाद कीर्दी लावगण जैसे होत जाईल तेणे-प्रमाणे याची कास कीर्द रुका ८१ येक त्यावरी मौजे मजकुरी जे खडणी होत जाईल व सदरहू पटीयाची तासीम व हाल व पेस्तर ज्या पटीया निा ठाणे व निा देहाये होत जाती याची तासीम पडले पाने जे येईल ते हुजूर दुमाले केले असे तुम्ही कुल दुमाले करणे व तूप व कडबा व गला खरीफ व रबी व तगट राजाहिसा जो येईल तो बादे दुमाले करणे वेठी बेगारी फर्मासी आवाजेवा बाजे पडी झडी कुल हुजुरुनू राजश्रीचे दुमाले केले आसे तुम्ही दुमाले करणे मौजे मजकुरी आजनाह व र ग गुरांवरी पाल करुनू उगवणी करीत त्याची तासीम याचे प्रजेच्या गुरांवरी जे येईल ते हुजुरुनू याचे दुमाले केले आसे तुम्ही दुमाले करणे दर हर० औलाद० तालीक० सदरहू इनामास हिंदु० व मुसलमान० सदरहूप्रमाणे देणे हरयेक तसवीस लागो न दीजे पेस्तर खुर्दखताचा उजूर न कीजे यांचे प्रजेसी तुम्हासी कांहीं निसबती नाही (नि) मोर्तबसुद ( मर्या. सी. )

रुजु सुरु
नवीस

———

ले. ५४५ } { श १५७२ चैत्र
{ इ. १६५० मार्च-एप्रील

अज० र० खुदा० खान अलीखान खान अजम रुस्तुमेजमान खुर्ली० द० कार० व देस० व अदि० मा० इस्लामाबाद उरूफ भिवडी बि० ( ख ) मसैन अलफ (फारर्शी शिका) मोरेस्वर गोसावि सा थानक मोरेस्वर हुजूर० इनाम देणे साहेबाचे दरसाल सन खमरू अर्बैन अलफ बा खुा × × × दरोज लाहारी हुर्मुजी ३ जागा बिा

× × भिवडी लारी १ पा कोरकडा लारी १ कर्याती मुरबाड लारी १ + + + + चालिले आहे साहेबाचे खुाप्रमाणे आणणे फर्मान हजीर × × दरम्यान नबावास महाल

जाला होता त्याचे तगेर होऊनू महाल साहेबास......आपण स्वा बदल हुजूर येऊनु साल मजकुरीं साहेबाचे खुर्द ×× त्या खुर्दखताप्रमाणे कारकून अमल करीत नाहीत. बडे खान साहेबी ×× चालिले नाही. म्हणऊनू उजूर करून दुमाले लारी तीस करितीसना दरीबाब सरजाम ×× ऊनू मालुम केले तरी बडे खान साहेबाचे वख्तीचा हा इनामचे न व ×× आमचे अजरामऱ्हामती देणे आहे यैसे खुर्दखतचे खोलूनू लिहिले ×× खानाचे कारकीर्दीचा उजूर करिता यैसें नादान कारकून अजब ××× फ आहे आता रसीदन खुर्दखत बा सीस्त इनामदार साले हलीं×××× करणे येक जरा उजूर अगर इस्कील केलीया ताकीद होईल ××××× इनामदारापासी परतुनू दीजे पा। हुजूर + मोर्तबसूद.

रुजुसुरुनिवीस.

माहे रबिलाखर

---

ले. ५४६ | श. १५७२<br>इ. १६५०

( फा. शि. फा. म. )

अज र० खुदा० खान अलीशान खाने अजम रुस्तुमे जमान खुर्लो० ब० कार०व देस० व आदी० मा० इसलामाबाद उरूफ भीऊडी बि० सु॥ इहदे खमसैन अलफ (फा. शि.) मोरेस्वर गोसावी मु० क्षेत्र मोरेस्वर हुजूर० आपणास इनाम बदल आटा रोटी व फकीरफकिराना दरोज लारी हुरमुजी तीन

| | | |
|---|---|---|
| कसबे भिऊडी रोज लारी हुरमुजी येक १८ | ता। मुरबाड देऊपे दरोज लारी हुरमुजे १८ | पा। कोलादा दरोज लाहारी हुरमुजी येक १८ |

जांगा माहासूल व दरिबे व जकाती व हरयेक दस्त जागापैकी रवा आहे साहेबास मुकासा आर्जानी जालियावरी साहेबाचे बदर्गास मालूम केले साहेबी नजर येनायेत फर्माउनू सदरहू इनाम मऱ्हामत करून ताजा खुर्दखत मऱ्हामती केलीयावरी ते खुर्दखत माहालास पाठविला कारकुनास दाखविला कारकुनी सालापासून खुर्दखतप्रमाणे सनदा करून दिधलियां सालासपाच माहे गुदरले आपणास येक रुका पावला नाही माहाली कारकून म्हणतात की कसबा व जकातीस जागा नाही व महसूलास दरिबे जागा नाही हुजुरून जागा नेमून खुर्दखत घेऊनू येणे तेणेप्रमाणे आदा करून व पा। कोरकाडाचे हुदेदार म्हणतात की हसनखानास मुकासा दिधला आहे त्याचे खुर्दखत घेऊनू येणे त्यावरी इनाम चालवून तरी आपण फकीर खुदातरस रातीदेस खुदायेतालाची जिकीर करुनू गरीबगुरीबास आटारोटी घालून साहेबाचे ज्वानइनामास दुा देतो हे सबाबेचे काम आहे सरजाम करुनू हुकुमी जागा देऊनू आपला इनाम आपणास बिलाकुसुर रोज दरोज आदा करविला पाहिजे म्हणौऊनू मालुम जाले बराये० मोरेस्वर गोसावी यास इनामबदल आटारोटी गरीबगुरबा

दरोज हुरमुजी लाहारी तीन ३ तीन बी ता ( येथें पूर्वी प्रो इनामाचा तपशील ) जागा माहाल व जरिबे व जकाती व हरयेक दस्त जागा रद आहे तेणेप्रमाणे इनाम हुजुरून मऱ्हामत करून ताजा खुर्दखत दिधला तेणेप्रमाणे तुम्ही माहाली यासि सनदा करून दिधलिया सालास पाच माहे गुदरले मशारुनइलेस येक रुका पावला नाही म्हणतातीं कसबे भिउडीस जागा नाही हुजरून जागा नेमून आणने तेणेप्रमाणे देऊनू तरी यांचा जागा खुर्दखते माहासूल व जरीबे व जकाती व हरयेके दस्त जागा आसोन मशारूनइलेचा इनाम आदा करीत नाही रजास करणे घडीघडी फिर्यादि हुजू(र) येऊ(न) देणे याचा काये माना आहे आता खुर्दखत अहडताच बा खुा इनाम सदरहू जागा मोईन आहे तेणेप्रमाणे इनामदार मा दरोज लारी ३ तीन कसबे मा व मुरबाड व पा कोरकड सदरहू जागा रद आहे तेथे कसबे भिउडी माहालास जरिबे व जकातीपैकी हुकुमी जागा करून देऊनू दरोज इनाम अदा करणे माहासूल व दरीबे व जकाती बंदर व लोणारे येथील बेरीज तनखा आगर हरयेक बाब बा! खुा अदा कीजे व तपे मुरबाडेस जागा बा खुा देऊनू आदा कीजे पा कोरकडा तेथ हुदेदारी इस्कील केली आहे की आपले साहेबाचे खुर्दखत आणने तरी त्यास मुकासा हुजरून खेरीज इनाम दिधला आहे इनामासी त्यास काये बजीद आहे आता तुम्ही माहालीहून हुदेदारास ताकीद करून देवीत जाणे घडीघडी फिर्यादी येऊ नेदणे इनाम बा खुर्दखत व फर्मानी जागा जो लिहिली आहे तेणेप्रमाणे आदा करीत जाणे उजूर न कीजे औलाद० दर हर० तालीक० परवानगी हुजूर (नि) मोर्तबसूद ( ष. मो. )

रुजू
सुरुनिविसि

---

ले. ५४७ } { श. १५७२ इ. १६५०

(फा. शि.)

अज र० माहाराज राजश्री शहाजी राजे दाम० ब० कार०·व देस० पा सुपे बि० सुा (फा. वा. शि.) इहिदे खमसैन अलफ बाो मोरेस्वर गोसावी साो मोरेस्वर हुजूर० आपणास इनाम जमीन चावर अव्वल गजशराई येक चावर दर सवाद मौजे पणदरे देखील मह० व जमे० व साईर० खर्चपटी व पायेपोसी मेजवानी सेलबेले बेलेकटी व जंगपटी मोहीमखर्च व हक सरदेसमुखी कुल० नकदी इस्मी० कलमी० कलम को ता व क व डि या येणेप्रमाणे खंडोजी व बाजी घोरपडे येही बा फर्मान हुमायुन आपले खुर्दखत दरसाल सन खमस अर्बैन अलफमधे अजरामऱ्हामती करून दिधले तेणेप्रमाणे तागाईत सन तिसा चालिले यावरी सन खमसैनाकारणे पा मा साहेबास मुकासा अर्जानी जालियावरी सालगुदस्ता येउनु साहेबाचे खुर्दखत घेतले नाही याकरिता साल गुा भोगवटा तसरुफाती जाली नाही हाली माहाराज धर्मपरायेण आहेती सालगुदस्ताचा उजूर दुरी करून खुर्दखत देविले पाहिजे व साल मजकुरी कुल इनाम अमानत करणे म्हणौनु येकंदर माहालास खुर्दखत सादर आहे

त्यावरून सालमजकुरीहि आपला इनाम अमानत केला आहे हेहि इस्कील दुरी केली पाहिजे दरी बाब खुर्दखत होये मालूम जाले तरी मोरेस्वर गोसावी सो मोरेस्वर यास इनाम जमीन चावर १ येक दर सवाद मौजे पणदरे देखील सदरहू बाब हाये बा फर्मान हुमायून व बा खुा खंडोजी बाजी घोरपडे तागाईत सन तिसा भोगवटा व तसरुफाती जाली असेली तेणेप्रमाणे च हालीहि चालवणे उजूर न करणे साल मा येकदर खुर्दखत इनाम अमानत करणे म्हणौनु सादर आहे त्यावरून साराहि इनाम अमानत केला असेली त्याचा उजूर न करणे व सालगुा तसरुफाती जाली नाही त्याचाहि उजूर न करणे तागाईत सन तिसा भोगवटा तसरुफती जाली तेणेप्रमाणे च हाली तुम्हीहि कुलबाब कुलकानुसी चालवणे दर हर० तुम्ही तालिक० पा खा जैनाखान पीरजादे मोर्तबुसुद [ फा. ष. सी. ]

---

ले.५४८ } { श १५७२ इ.१६५०-५१

(फा. शि.)

अज र० माहाराज राजश्री शाहाजी राजे (दाम)० ब० व देस० पा पुणे वि० +++ इहिदे खमसैन अलफ बो राजश्री मोरेस्वर गोसावी सो क्षेत्र श्री (हु)

फा. शि जूर येऊनू मालूम केले जे आपणास इनाम जमीन चावर -॥- नीम गज-शराइनी मौजे मोरगौ देखील न (ख्त)० व खडपिटी व पायेपोसी सेल-बैल देखील ठाणे व ता देहाये कुल० बार खुर्दखत छ ११ जमादिलोवल हरसाल सन तिसा सलासीन अलफमधे माहाराजे अजरा मऱ्हामती केला आहे तेणेप्रमाणे ताा सन तिस्सा आरबैन अलफ तसरुफाती जाली साल गुा सन खमसैनामधे सदरहू जमीन नाकीर्दी पडिली होती. अजी सबब साल गुा तसरुफाती जाली नाही. सालमजकुरा कारणे सदरहू जमीन नाकीर्दी केली तो साहेबाचे खुर्दखत छ ११ जमादिलाखर महालास सादर जाले की कुल इनामती अमानत केली असे एक रुका तुम्ही कोण्हास न देणे यावरून कारकुनी कुल इनामती अमानत केली त्याबराबरी आपलाहि सदरहू इनाम ××× मानत केली आहे तरी साहेबी मेहरबान होऊनू सदरहू ×× इस्कील करून आपला इनाम आपले दुमाले केला पाहिजे दरिबाब सरजाम होये मालूम होये मालूम जाले तरी राजश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र श्री ××× नाम जमीन चावर निम दर सवाद मौजे मोरगऊ सदरहू बाबा ताा सन तिस्सा अर्बैन अलफ ×× ती जाली असेली ते मनास आणौनु. तेणे (प्रमा)णे हलीहि चालवणे उजूर न करणे साल गुा तसरुफाती जाली नाही त्याचा उजूर न करणे ॥ [तालीक०] हरसाल० साल मजकुरी इस्कील सादर आहे त्याचा उजूर न करणे पा खा जैनाखान परिजादे (नि) ( मोर ) तबू सुद

---

ले.५४९ } { श. १५७५
इ. १६५३

अजर० राजश्री सिवाजि राजे साहेब दाम० ब० कार० देस० पा इदापूर वि० सुा अर्बा खमसैन अलफ मोरेश्वर गोसावि मुकाम क्षेत्र श्री हुजूर० आपणास इनाम अजरा मऱ्हामती देणे माहाराजाचे बाा खुाा सन खमसैन जमीन चावर २ दोनी दर सवाद बी ताा मौजे काझड चावर १ व मौजे सेलगौ चावर १ देखील मह० व सैल बैल व सरदेसमुख पटी व पायेपोसी व बाजे पटी मोहीमपटी व गजपटी व बैलेकटी व हकदार व पाडेवारि व तूप व कडबा व बेठीबेगारि कुल० दिल्हे आसे हाल व पेस्तर पटी होईल ते दुमाले करणे व बादे दारंद रोजमुरा हर माहाल ज सा दीं पाा मजकूर दरोज टांकसाली टके १८६ येक टका साल्के येणेप्रमाणे दिल्हे ताा साल गुाा चालत आले आहे साल मजकुराकारणे माहाली कार० तरी माहाराजे ताजे खुर्दखत देविले पाहिजे म्हणौनू मालुम केले बिना बरा० मोरेश्वर गोसावि मुकाम क्षेत्र श्री यासि इनाम अजरामऱ्हामती बाा खुाा सन खमसैन ( येथें इनामाचे पूर्वीप्रो वर्णन ) दिल्हे असे हाल व पेस्तर पटी होईल ते दुमाले करणे, बादेदारद रोज मुरा हार माहल जकाती पाा मजकूर टाकसाली दरोज १८६ नव ससगाणीया येणेप्रमाणे इनाम आहे ताा साल गुाा चालत आले आसेली तेणेप्रमाणे चालवणे दर हर० तालीक० ( मर्या० )

'श्री शिव नरपति
हर्ष निदान साम
राज मतिमत प्रधान

रुजू सुरु
निवीस

—————

ले.५५० } { श. १५७५
इ. १६५३

( फा. मजकूर )

अज र० खुदा० मुला आजम मुला आहमद खुली० ब० कार० व देस० व आधि० साा तल कोकण व माहालानिहाये बि० सुाा आर्बा खमसैन आलफ माा आनाम-मोरेस्वर गोसावी मोकाम मोरेस्वर हुजूरू० आपणासी इनाम बदल लंगा आटा रोटी गरीब गुरबा मुकाम मजकूर दरोज हुरमुजी लारी ७ सात जागा महासूल व जरिबे व जकायेती व हरयेक जागा

(फा. शि.)

मामले इसलेमाबाद
उाा भीऊडी उाा कली-
याण लारी ३ हुाा
काा भीवडी पाा कोर-

मामले मुरजन उाा कलीयान लारी हुर-
मुजी २

१ कसबे कलियाण लारी

जकाती लारी        कड लारी
१        १
का मुरबाड        १ ता॥ चोण लारी
लारी १        -॥- का बदरापूर लारी
-॥- पा जाबोला लारी

मामले पादशाबाद        ——
उा चवूल लारी        १
हुरमुजी        २        ——
२

येणेप्रमाणे बा॥ फर्मान व खुर्दखत वजिरानी कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटा व तसरूफती ता॥ सन इसने चालिले आहे यावरी तल कोंकण साहेबासी मोकासा० हाली कार० आपण हागीर आहे हे खैरातीचे काम आहे साहेबी आपणासी खैर मराहमत करून माहालासी खुर्दखत देविले पाहिजे म्हणौऊनु मालूम केले बराये० मा॥ आनाम मोरेस्वर गोसावी मुकाम मोरेस्वर या॥सि इनाम बदल लंगर आटारोटी गरीब गुरबा मुकाम मोरेस्वर या॥सि इनाम बदल लंगर आटारोटी गरीब गुरब मुकाम मजकूर ( यापुढे पूर्वी प्रो॥ इनामाचा तपशील )

येणेप्रमाणे बा॥ फर्मान हुमायून व खुर्दखत वजिरान कारकीर्दी दर कारकीर्दी ता॥ सन ईसने चालिले आहे ते (णे) प्रमाणे मोकरर करून दुमाले केले आसे दुमाले कीजे आवलियाद० दर हर० तालीक० (नि) मोर्तबू सुदू

रुजू सुरनवीस

——

ले.५५१        {शा. इ.

(शिवाजीचा अस्पष्ट शिक्का)

अज र० राजश्री सिवाजी राजे दाम० ब० कार० व देश० पा॥ पुणे बि० सुहूर सन ति + + ळफ बा॥ राजश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरेस्वर हुजूर० माहाराजे आपणासि इनाम अजन्हामन्हामती जमीन चावर गज + टके १८ येकून कास रुके -।- विता॥

मौजे मायेवाडी प्रज मल्हारजी जगथाप थल वागटेभीपैकी जमीन × गजशरायेणी निमे येकून कास रुके ८६

मौजे नायेगाऊ × प्रज नागोजी ( भा ) बोरकर × परीट धुण जमीन चावर -।- गज शरायेणी ० — — —कास ×

पा॥ मजकूर येणेप्रमाणे माहाराजे अजन्हामन्हामती दिधला असे खुर्दखती मजमू की चालती कास प्रमाणे जे याचे × पडिले पान येईल ते दुमाले करणे यैसे असोनु माहाली कारकुना × देहाये मजकुरीच्या जमीन कुली याचे अज कासेवरी नख्त ( माहासूल ) करून आपले प्रजा

व कासेवरी आले ते दुमाले करून × माहाली कार × चालती कास प्रमाणे आपण जो अदा × × जमीन कुली याचे वाटणी प्रज बेरीज मजुरा देउनु वर × बाकी आपणावरी काढिली × × माहाराजाचे आपणास + तमाचे बास अनुस्टान क × काल कल्याण चितितो माहाराज दायाळु होउनु मौजे मजकुरी चालती कास सालाबाद कीर्दी × व गण जेसे गावामधे + ईल जे अपले प्रजपासी सदरहू कासेची उगवणी होत जाईल × बाब नख्तयाती व सेलबैल व सरदेसमुखीपटी खर्चपटी पायेपोसी व भ × व मोईन सादिलवार व पाडेवार + व हकपटी भेटी व मोहीमपटी बाबा ता + ल सुदर ठाकूर व (ग) वत व वेठे व खर्च खेरीज पुढे ज्या पटिया सालाबा × होतील त्या गावनिसबती व ठाणे निसबती × ची जे ता कीर्दी लावगणप्रमाणे गावामधे उगवणी जैसी कासे होईल तेणेप्रमाणे अपले कासेवरी ( होतें तेणे प्रमाणे ) तक्सीम येईल ते अपले दुमाले कुल केली पाहिजे बाकी आपणावरी काढि × + + पाहिजे म्हणोन मालुम केले मालुमाती खातिरेसी अणौन राजश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र मोरेस्वर यास इनाम ( माहाराज ) अजरामऱ्हामती जमीन ( येथें पूर्वी प्रा॰ इनामाचा तपशील) देखील नख्तबाब कुल सदरहू बाबा निसबती ठाणे व निा देहाये देखलि बाजे पटिया हाल व पेस्तर होतीळ त्या कुल देहाये मजकुरी कीर्दी लावगण सालाबाद होत जाईल ते कुल दुमाले करणे म्हणोन खुर्दखत——सादर असोनु तुम्ही दरम्यान (हुजरून ) दूर करून जमी+

———

ले. ५५२ } {श. {इ.

वेदमूर्ति राजश्री मोरेश्वर गोसावी प्रति राजश्री शिवाजी राजे दंडवत उपरी तुम्ही पत्र पाठविले तेथे आसिर्वादपूर्वक वचन लिहिलें ते कळो समाधान जाले त्या उपरि वृतीस काही विक्षेप पडिला आहे म्हणून लिहिले तरी येथे वर्तमान कळले नाही राजश्री मोरोपंत प्रधान यासी पत्र लिहिले असे ते मनास आणून जे चालिले असेल ते चालवितील अतर पडणार नाहीं जाणिजे (मर्या. सी.)

———

ले. ५५३ } {श. १५७६ {इ. १६५४

श्री.

( अजर० ) राजश्री सिवाजी राजे साहेब दाम० ब० कार० × × पा इदापूर बि० सुा (म साम खमस खमसैन अलफ सबाजि सौ × ( मोरेश्वर ) गोसावी से (कीन) राजमतिमत् × × × हुजूर० माहाराज गोसावीयासि इनाम अजऱ्हामऱ्हा मती दिधले प्रधान) आहे बिता

जमीन गजशरायेणी दर सवाद देहाये पा बाबे दारंद रोजमुरा दर महाल जकाती पा

मजकूर चावर दोनी मा। दरोज रुक सा × नव ससगाणिया
१ मौजे काझड स दी
१ मौजे सेलगाब १८६

येणेप्रमाणे दिधले आहे यासि बाबे दारंद रोजमुरा सदरहू प्रमाणे सारा पावतो व चावर दोनी सदरहू प्रमाणे अहेती ते आपणाच्याने कीर्दी सेवत नाहीत महाराज धर्मपरायेण आहेती दो चावराचा सारा देहाये मा। जैसा आहे तेणेप्रमाणे नख्त व तूप पा। मजकुरीहून आपणासि देविले पाहिजे आणि कारकुनाकडून + + + + + + पाहिजे चावर कीर्दी होती तोवरी कारकुनाकडून देविले पाहिजे म्हणौनु मालुम केले बिनाबरा० राजश्री मोरेस्वर गोसावी सो रा० यासि पा। मजकुरी सदरहूप्रमाणे इनाम आहे त्यासि बाबेदारंद × × × × × अवळ सालापासुनु चालो देणे ( येथें पूर्वीप्रमाणे इनामाचा तपशील ) सदरहू दोही गांवीचा सारा जेणे प्रो मोईन केली असेल तेणेप्रमाणे हर दो गावांचिया चावराचे नख्त व तूप होईल ते साल मजकुरी नख्त महसूल पैकी देणे आणी ते दोन्ही चावर तुम्ही कीर्दी करणे अणी पुढल्या सालापासुनु जे त्या चावराचे येईल ते देणे अणी चावराचे रकमेचे बेरजेसी जे पुरवणी पाहिजे + ते महसूल पैकी देणे जोवरी चावराची रकम पुरे तोवरी पा। मजकुरीहून नख्त महसूल पैकी पुरवणी देउनु सदरहू दोही चावराचे रकमेचा झाडा करून देत जाणे हर० तुम्ही तालिक० ( नि ) मोर्तब सुद ( मर्या. सी. )

---

ले. ५५४ } {श. १५९२ फाल्गुन शु. ९ इ. १६७१ फेब्रुवारी ७

श्री

मसहुरल अनाम राजश्री विठल सोमनाथ हवा० व कार० पा। इदापूर प्रति राजश्री सिवाजी राजे सुहूर सन इहिदे सबैन अलफ राजेश्री मोरेश्वर गोसावी मु॥ मौजे मोरगाउ खासुद पा। पुणा यास पा। मजकुरीं इनाम रोजमरा आहे तो पेशजी अफजलखानाचे गलबलिया पहिले साहेबाचे कारकीर्दीस चालिले असली तैसे चालवणे म्हणून पेशजी सनद आहे तेणे प्रमाणे चालवणे उजूर न करणे तालीक० छ ७ शवाल (नि) मोर्तब सुद

( मर्या. सी. )

रुजु सुरु

---

ले. ५५५ } {श. इ.

अर्दास अ बदगी बाद + + रीज हाये गावी बदे सेरीकर मो + मौजे मायेवाडी ता। कन्हेपठार पा। ( पु )णे अज द + + + + + पा अर्जदास्त

हमा ता। छ २२ माहे जिलकादी साहेबाचे नेक नजरे करुनु मौजे मजकुरीवरी लाहोर सलाबत असे

हमा साहेबाचे खुर्दखत छ ८ जिलकादी पाो छ माहे मिनहू सादर जाले तेथे रजा जे दरविले राजश्री मोरेस्वर गोसावी क्षेत्र श्री मोरेस्वर हुजूर येउनु मालुम केले जे आपणास इनाम बदल धर्मादाउ दर सवाद मौजे मायेवडी ताा कऱ्हेपठार पाा मजकूर पैकी चावर गजशराईनी काली ( पो ) लीज चावर निमे देखील नख्त० पायेपोसी व खर्च-पटी व रेजी पटी व भेटी व सेलबैल व बाजे लाजिमाती नकदी० व कलमी० इसमी देखील पाडेवार व बाजे हकदार व तूप व कडबा व वेठी बेगारी व जेवा देखील तालुक ठाणे व तालुक देहाये कुल व कारकीर्दी माजी बरहुकुम. खुर्दखते वजिरानी दिल्ही आहे अमा आपण कासीस गेलो मागे फितरतीमधे भोगवाटियाचे कागद गेले अपणा पासी कागद नव्हते याकरिता माहराजाचे भेटीस येऊनु खुर्दखत घेतले नाही असीयासि आपले घरी धर्मव्य अतीत अभ्यागत येते त्यासि अन द्यावे लागाते माहाराज धर्पपरायेण सदरहू इनाम अजरामऱ्हामती दिल्हिया निरंतर अनुस्टान करुनु ब्राह्मणास अन देउनु असीर्वाद देउनु कल्याण चितुन ग्हणौउनु मालुम केले बिना० राजेश्री मोरेस्वर गोसावि सेकीन मोरेस्वर यासि इनाम बाा धर्मादाउ ( येथे वरील प्रो इनामाचा तपशील ) दिल्हा असे कारकीर्दी माजी खुर्दखत वजिरानी होती ती फितरती करिता गेली म्हणउनु तसरुफाती चालिली नाही याचा उजूर न करिता व सदरहू इनाम पोलीज जमीन हाली कीर्दी पैकी चालती कास पैकी हद० येक जरी० दरहर० अवलादी० सदरहू इनामतीचा सेतवरी अवलसाला पासूनू साल मजकुरीची पटीची ताा आली असेल उचापती फिराउनु देणे दरहर० तालिक० सदरहू इनामास हिंदु० मुसलमान० म्हणौउनु रजा रजे बरहुकूम तरफ मजकुरीचे हुदेदार देसमुखाचे व देसकुलकर्णि याचे अजहतीदार व सेरीकर येसे मौजे मजकुरीच्या सिवारात जाउनु वागटेभी पैकी कीर्दकेर्द मल्हारजी बिन कनकोजी जगाथाप पोलीज कास रुके ८६ वहित आहेती त्या जमिनीस हद महद्द घालुनू जमीन मोईन करून राजश्री मोरेस्वर गोसावि इनामदार याचे दुमाले केले असेती देखील महसूल व पायेपोसी व खर्चपटी व बाजे पटीया नख्त अवल सालापासुनू सालमजकुराकारणे मौजे मजकुरी पटियां जालीया आहेती व पेस्तर ज्या पटिया होतील नख्त व महसूल रुके ८६ चाल्ते कासेप्रमाणे हिसेब सेतास जे तक-सीम येईल ते इनामदार मशारइलेस देऊनु येकी जरियाची तसवीस लागो नेदू वेठी बेगारी ठाणाची गाव निसबतीने लागा नेदू अवल सालापासुनु ज्या पटिया जालिया आहेती त्याची तकसीम ते प्रजेसी आली आहे ते हिसेबी करुनु गोसावी याचे दुमाले केली असे व पेस्तर पटिया होतील त्याचीहि ताा दुमाले करुनु वेठी बेगारी जेवा आवा येकी जरियाचि तोशीस लागो नेदू बंदगीस रोसन होये गजशरायेनी चावर निम येकून मौजे मजकुरी कास रुके ८६ गोसावी याचे दुमाले केले असती बदगी रोसन होये हे आसीर्वाद ( नांगर )

ले. ५५६ } {श. इ.

( प्रतिपद् मुद्रा )

अजर० रा० सिवाजी राजे ब. देश...

(... णे बिदानद...मोरेस्वर गोसावी...जे मोरगावी बाग बिघे ती...+ र याचा ......हीवर नदीवर नदीचा किना...आबीची बहुत काल गुराची...तीं तेथें गोसावी निदान साम धरणे + आणून बाग केला आहे घर + लें आहेत म्हणऊन मालुम...म्हणून राजमतिम राजश्री मोरेश्वर + मौजे मजकुरी बागजमीन गीहीवर हिरयाचा नदी + पागी त प्रधान वाट कदीम आहे + पाणी आणले आहे मशगती केली आहे तरी ते + ग सब्जी फुलझाडे आबराई करितील त्याचा उपज दुमाले केला असे तुम्ही दुमाला + श्री स हुजरून अजरामऱ्हा ( मत ) कानून यावा व बाजे बारुपे + माणे जे सालाबाद येईल ते याचे दुमाले करीत जाणे अवलाद० खुर्द ) ताचा तालीक० ( नि ) मोर्तबसुद रुजुसुरु निवीस

---

ले. ५५७ } {श. इ.

[ फा. शि. ]

( अजरख्तखाने ) राजश्री स्याहाजी राजे दाइम० + + ... ... अमीनाबाद उर्फ पाली वि० सुा... ... ...अलफ राजश्री मोरेस्वर गोसावी सो उज्झर हुजूर मालुम केले जे आपणास रोजमरा दरोज लारी १ येक दरसवाद का माा...गुदस्ता अजरामऱ्हामती करून खुर्दखत दिधले आहे माहाली कारकून का मा जागा नाही म्हणऊनु आदा करीत नाहींत तरी साहेबी हरयेक दस्त जागापैकी देविले पाहिजे म्हणौऊनू त + + + मोरेश्वर गोसावी याचा रोजमरा सदरहू दरोज लारी......कसबे मा खुर्दखत आहे आणि...... तरी हरयेक दस्त जागा मामले मा पैकी आदा करणे उजूर......घेऊनू असली परतोनु देणे दरसाल खुा उजूर न करणें मोर्तब ( अस्पष्ट )

---

ले. ५५८ } {श. १६०२ कार्तिक व. ९ इ. १६८० नोव्हें. ४

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ७ रौद्र सवछर कार्तिक बहुल नवमी गुरुवासरे क्षत्रीये कु०

(लं. वं.) एषा श्रीशिवराजेद्र मुख्यामात्यस्य सत्यधृक् ॥ मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रा सद्रगदायीनी

श्री राजा शभू छत्रपति याणी राजेश्री नागोजी बलाल मुख्य देशा० प्रांत यांस आज्ञा केली ऐसीजे राजेश्री मोरेस्वर गोसावी वास्तव्ये क्षेत्र मोरगाऊ यांचा इनाम प्रांत मजकुरी आहेत येविशयी राजश्री कैलासवासी स्वामीच्या सनदा सन सबैना मधे आहेत सनदा किते २ यो इनाम बी ता

| | | | |
|---|---|---|---|
| किा सनद छ २२ जिल्हेज पाा सुपे सेते २ यैाा जमीन कास रुके सा त ८७ | | किा सनद छ २२ जिल्हेज पाा इंदापूर चावर व रोज-मुरा | |
| मौजे लोणी बारा-ऊ कर्डा थल येसू भांबकर कास रुके ८६ | मौजे पणदरे प्रज गोयाजी सेंगल जमीन कास रुके ८१ | जमीन गजश-राइनी दर स-बाद देहाये माा माा चावर १ मौजे काझड १ मौजे सेलगाऊ | रोजमरा मा-हाल जकाती पैकी दररो जिना टाक-साली टके १८६ |

—

२

येकूण जमीन कास रुके सात व चावर दोनी व रोजमरा दरोज टाकसाली खुर्दा येक टका सा रुके येणेप्रमाणे इनाम आहे यैसीयास याचा भोगवटा येणप्रमाणे तागाइत साल गुा चालिला असे तेणेप्रमाणे साल मजकुरापासून चालवीत जाणे साल दरसाल ताजा सनदेचा उजूर करीत नव जाणे तालीक लेहोन घेऊन असल पत्र राजश्री गोसावी यापासीं परतोन देणे लेखनालंकार

रुजूसुरु

तेरीख छ २१ निवसि

सौवाल बार सुद बार

सुरु सुद बार

———

ले. ५५९ } { श. १६०२ कार्तिक व. ११ इ. १६८० नोव्हें. ६

श्री मोरेस्वर

स्वस्तिश्री राज्याभिषक शक ७ रौद्र संवत्सरे कार्तिक बहूल येकादसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति यानी राजश्री सुभेदारानी व जुमलेदारानी व कारकुनानी लष्कर यासि आज्ञा केली ऐसीजे राजश्री मोरेस्वर गोसावी वास्तव्य श्री ताा कऱ्हे-पठार येथें कुटुंबेंसीं राहाताती तरी तुम्हीं येतां जातां त्यांच्या माणसांस व सेतापोतास गुरांढोरांस काडांची तसवीस देत नव जाणे निरोपद्रव सुखरूप राहेती ते करणें जेथे त्याला अनकूल पडेल तेथे जाऊन राहिले तरी सुखे राहो देणें त्यांचे वाटेस नव जाणे ताकीद असे जाणिजे (नि) लेखनालंकार

(वा) लक्ष्मी नृसिह भक्त
श्री नीररायाब्धि सन्मणः
प्रल्हाद वर्धिनी मुद्रा
प्रल्हादस्य नषज्ञभत

———

ले. ५६० } {श. १६०२ माघ व. १४ / इ. १६८१ फेब्रु. ७}

श्री

राजश्री हवालदार व कारकून पा। सुपे गोसावी यासी

द अखडित लक्ष्मी राजमान्य सेवक नागोजी बलाल सरसुभेदार व कारकून मा। हाय नमस्कार सु॥ इहिदे समानीन अलफ बा। सनद राजश्री छत्रपती स्वामि रौद्र संवछरे कार्तिक बहूल नवमी गुरुवासरे आज्ञा की राजश्री मोरेश्वर गोसावी वास्तव्य क्षेत्र मोरगाऊ याचा इनाम प्रा। मजकुरी आहे येविशी राजेश्री कैलासवासी स्वामीची सनद सन सबैनामधे छ २२ जिल्हेज आहे इनाम पा। सुपे सेते २ येकूण जमीन कास रुके ८७ मौजे लोणी बाराऊ कर-डेची मौजे पणदरे प्रज गोपाजी थल येसू भापकर कास रुके ८६ सेलगे जमीन कास रुके ८१ येकूण कास रुके सात इनाम आहे यैसीयास याचा भोगवटा जेणेप्रमाणे ता। साल गुदस्ता चालिला आसेली तेणेप्रमाणे साल मजकुरापासुनू चालवीत जाणे साल दर साल ताजा सन-देचा हुजूर करीत नव जाणे तालीक घेऊनू असल पत्र राजेश्री गोसावी यापासी परतून देणे म्हणोउनू आज्ञा आहे तरी तुम्ही बा। सनद भोगवटा ता। सालगुदस्त चालिले असेली प्रमाणे चालवणे तालीक लेहोनू घेऊनू असल पत्र देणे दर हर साल ताजे सनदेचा उजूर न करणे रा। छ २७ मोहरम (नि) हे विनती मोर्तब

(वा) श्री स
कल सज्जन
जनसमाजी वि-
राजित बलाल सु-
त नागोजी

———

ले. ५६१ } {श. १६०२ माघ व. १४ / इ. १६८१ फेब्रु. ७}

राजश्री हवालदार व कारकून पा। इंदापूर गोसावी यासी

अखडितलक्ष्मी राजमान्य —— सेवक नागोजी बलाल सर सुभेदार व कारकून मा। हाये नमस्कार सु॥ इहिदे समानीन अलफ बा। सनद राजश्री छत्रपती स्वामि रौद्र सवछरे कार्तिक बहुल नवमी गुरुवासरे आज्ञा की राजश्री मोरेश्वर गोसावी वास्तव्य क्षेत्र मोरगाऊ याचा इनाम प्रांत मजकुरी आहे येविषी राजश्री कैलासवासी स्वामिची सनद सन सबैना-मधे छ २२ जिल्हेजी आहे इनाम पा। इदापूर

जमीन गजशराईनी दर

| | |
|---|---|
| सवाद देहाये पा। मजकूर | रोजमरा माहाल जकायेती |
| चावर २ | पैकी दर रोजाना टाक- |
| मौजे काझड १ | साली टके |
| मौजे सेलगाऊ १ | १८६ |
| २ | |

येकूण दोनी चावर व खुर्दा टाकसाली येक टका सा रुके इनाम आहे यैसीयास याचा भोगवटा जेणेप्रमाणे ता। साल गुदस्तां चालिला आसेली तेणेप्रमाणे साल मजकुरापासून चालवीत जाणे साल दर साल ताजा सनदेचा उजूर करीत नव जाणे तालीक लेहोनू घेऊनू असल पत्र परतोनू राजश्री गोसावी यासी देणे म्हणौउनू आज्ञा आहे तरी तुम्ही बा। सनद भोगवटा ता। साल गुदस्ता चालिले असेली त्याप्रमाणे चालवीत जाणे तालीक घेऊनू असल पत्र राजेश्री गोसावी यासी देणे दर हरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे रा। छ २७ मोहरम(नि) हे विनंती ( नागोजीचा मागील सनदे प्रो शि. )

(ष) मोर्तब

---

ले. ५६२ } {श. १६१६ कार्तिक व. १० इ. १६९४ नोव्हे. ३

श्री मोरेस्वर

॥ द माहाराजाधिराज राजश्री मोरेस्वर गोसावी मुकाम क्षेत्र श्री———माहाराजाचे सेवेसी देसमुख व राजश्री बाबाजी व देवाजी त्रिंबक देसपाडे ( मराठी अस्पष्ट शिक्का ) परगणे सुपे सा। जुनेर सु॥ सन ११०४ कारणे माहाराजाचे सेवेसी विनती पेष करून दिल्हे यैसे जे पा। मजकुरी पुरातन धर्मादाऊ सादिलवार खर्च होनू ५८ पाच पूर्वीपासून चालत आहे तेणेप्रमाणें धर्मादाऊ सादिलवारपैकी पा। मुले चालऊन व या खेरीज तेल देवास दरोज ८।- पाऊसेर प्रमाणे चालऊन छ ५९ माहे रबिलोवल सके १६१६ भावनाम सवछरे कार्तिक वदी दसमी वार सुक्रवार हे पत्र लिहिले सही

---

ले. ५६३ } {श. १६१९ भाद्रपद शु. ६ इ. १६९७ आगस्ट १३

तसदीक माहीयानें ( घाणे ? ) पारशी शिक्का

रा। ——— सेकदार

व कारकून पोतदार मौजे मोरेश्वर पा। पुणे सा। जुनेर सु॥ सन हजार ११०७ ता। सन हजार १११८ कारणे यैसे जे देहाये मजकूरची खिजमत फर्मावली असे बमये सिबदी दरमाहे मो। रु॥ १२८ बारा केले असे महाल मजकुरी देत जाणे इ॥ पैवस्तीपासून दरमाहे घेत जाणे मा। सुद

छ ५ रो माहे सफर सन अहाद १

---

ले. ५६४ } {श. १६२०
इ. १६९८

श्री नकल

जमीन जुमला मौजे मोरगाव ता। करेपठार मो। पुणे सु।। हाजार ११०७ आज जमीन कास टके १२। वजा सुपियाचे सिवखाली गेले टके ६८५ बाकी उरले टके

६८७

ता।

खाल्साती टके

४।।। ४।।

ता।

जिराईत बागाईत

४।।।२। ८=

इनामती टके

८७ श्रीदेव चिचवडकर

८३।। माहादजी गोसावी

८३।। आको मंगदेव

८७ सिवाजी जगन्नाथ

८७ चेडे जोसी

८११ मोरस्वर गोसावी

८६ मुकदम

-।- पाडेवार

८।।- फुलमला

८३ तुलाजी

१।=।।

येकून थल ११

| | आज थल | खाल्साती | इनामती |
|---|---|---|---|
| तावीर थल | -।। ११ | -।।४।। | ८६।। |
| पचम | -।।।- | -।।।- | ० |
| च्याहाल | -।।८ | -।।१ | ८७ |
| कद | -।।८ | -।।४।। | ८३।। |
| कोलता | -।।।३ | -।।३ | ० |
| पाचपळ्या | १ | -।।।८।। | ८३।। |
| थोपटा | -।३ | ८८ | ८७ |
| खोमना | -।७ | -।- | ८७ |
| मान्या | -।३ | ८६ | ८६ |
| पुन्नाला | -।- | ० | -।- |
| कावजी बोपाजी | -।- | ८५ | ८७ |
| | ६८७ | ४।।।४।। | १।=।। |

ले. ५६५ } {श. १६२३ | इ. १७०१

[ फा. शि. ]

अजरख्तखाने माहाराज राजेश्री विजाराऊ साहेब दाईम दौलत हू मोजे मोरगाऊ पा। पुणे सो। जुनर सु॥ सन ११११ मालुम दानद साल मजकूरपैकी यासी रुा............... देविले असेती अवल मोर्तबे अदा कीजे जाणिजे मोर्तबू [ फा. शि ]

---

ले. ५६६ } {श. १६२८ अ. आषाढ शु. ३ | इ. १७०६ जून २

दा। विजाराऊ लि॥

ता॥ फारिखत सर्हा

फारिखत बो। आपाजी मल्हार सेखदार कारकून जागीर मौजे मोरगौऊ ता॥ कर्न्हेपठार प्रा॥ पुणे सु॥ सन हजार ११९५ कारणे फारखत लिहून दिधली यैसी जे सन मजकूरची खिजमत जागिरीची तुम्हास फर्माविली होती सन मजकूरचा हिसेबुकितेब हुजूर येऊन समजाविले सन मजकूरचा कागदपत्राचा तगादा तुम्हासी नाही हे लि॥ सही

[ वा. मोर्त. ]

तेरीख १
माहे रबिलौवल
सन ५० जलु

---

ले. ५६७ } {श. | इ.

श्री

गोतसभा नाईक प्रश्नकर्ते राजेश्री खडोजी पाटील मोकदम मौजे आबी बुदरुख व रा। फुलाजी पाटील मोकदम मौजे आबी खुर्द व रा। भिकाजी पाटील मौजे तरडोली प्रा॥ सुपे व साकरोजी पाटील नीमे मोकदम मौजे जोगवडी गोताचे सेवेसी

——राजीनामा बे॥ सर्वोत्तम मोरेश्वर गोसावी वास्तव्ये मौजे मोरगांव ता॥ कर्न्हेपठार प्रा॥ पुणे सन हजार ११५५ कारणे गोतापासी राजीनामा लेहून दिल्हा यैसाजे मौजे मजकुरी आपला इनाम पूर्वीपासून माहाराज राजश्री साहाजी राजे व रा। सीवाजी राजे छत्रपती श्वामी यानी व हाली राजेश्री शाहू राजे छत्रपती यानी इनाम पत्रे दिल्ही आहेत त्याप्रमाणे मनोदयानुरूप भोगवटा चालिला नाही याजकरिता गावकरी याची व

आपली खटखट होऊ लागली याजकरिता आपण सातारियासी जाऊन थोरले देव्हडीस फिर्याद जाहाले तेव्हा राजेश्री सीवाजीपंत दिवाण देव्हडीचे यानी श्रीकडील राजेश्री चतुर्भजपत याचे हाती आपणास दिल्हे हे आपणास मौजे मजकुरास घेऊन आले आणि आपल्यास पुरसीस केली की तुमचा इनसाफ पचाईत पाचजण भले माणूस श्रीच्या फारशावरी बैसून सनदा पाहून चतुष्ठाई करून सत्येस स्मरोन ज्याप्रमाणे करतील त्यास राजी आसाल तरी राजीनामा व जामीन देणे म्हणोन पुरसीस केली त्यावरून आपण राजी होऊन हा राजीनामा लेहून दिल्हा आसे. सदरहूप्रमाणे पंचाईत चतुष्टाई करून आपली समजावीस करितलि त्याप्रमाणे राजी आसो त्याप्रमाणे + वर्तणूक करू यासी नवदिगर करू तरी दिवाणचे गुन्हेगार गोताचे खोटे हा राजीनामा लिहून दिल्हा सही शके १६६१ क्रोधननाम सवछरे तेरीख छ २४ मोहरम ताजा कलम आपला जामीन रा चतुर्भुजपतापासी गोपाल गोविंद दिल्हा आसे हे लेहून दिल्हे सही

बा आनाजी रघुनाथ वाघ निशान विना
कुलकर्णी मौजे मोरगाऊ

---

ले. ५६८ } { शके १६२८ मार्ग शु. ३
{ सन १७०६ नोव्हे. २६

दा विनाराऊ बा (फारशी शिक्का)
पुा अमल करणे

अजरख्तखाने माहाराजा राजश्री विनाराऊ साहेब दाइम दौलतहू बजानेबु मगलमूर्ती अमीन व पोतदार व अपाजी मल्हार सेरवदार व कारकून जागीर मौजे मोरगाऊ ता कर्हेपठार पा पुणे सुा सन हजार १११६ मालुम दानद की वरा ( त ) देविली आहे त्याप्रो देणे बीा

| | | |
|---|---|---|
| देवास रुा | गोसावी रुा | मगलमूर्ती बिा |
| ५० | १०० | १०० पेसजी कर्जबा<br>गुदा ब्याज रुा<br>५० हाली रुा<br>१५० |

कास बा रुा ?
१७८

येकून रुपये तीनसे देणे पावली याचे कबज घेणे तेणे प्रो मजुरा असे जाणिजे मोर्तब सुद
(फा. शि.)

तेरीख २ सन ५१ जुलूसवाला.
माहे रमजान

---

ले. ५६९ } { शके १६३१ माघ शु. १० { सन १७१० जाने. २९

श्री

श्रीमोरया

ता मोकदमानी मौजे मोरगौऊ ता कऱ्हेपठार प्रा पुणे यासि श्री ची आज्ञा जे मोरेश्वर गोसावी यास मौजे मजकुरी इनाम दोन जमीन चावर २ दोनी आहे याची सनद राजश्री सिवासी राजे याची आहे तर त्याप्रा उफ्तन चालवीत आले असेल त्याप्रमाणे चालवणे उजूर न करणे जाणीजे माघ शुद्ध दसमी सके १६३१ विरोधी नाम सवछरे

---

ले. ५७० } { श. १६३१ अ. वैशाख शु. ७ { स. १७०९ एप्रिल ५

रा मोरेश्वर

देसमुखानी व देसपाडियानी व मोकदमानी व रयानी व पुजारियांर्ना मौजे मोरेश्वर पा पुणे सा जुनेर सुा सन हजार १११७ ता सन हजार १११८ (फा. कारणे मालुम दानद की रो हरी रघुनाथ यास देह मजकूर दरोबस्त तनखा शिका) दिधला असे ता माहाल मजकूर वजा करून बाकी राहील त्यापैकी येक वाटा रा गोसावी यास देने बाकी दोनी हिसे मुशाइलेस पावते करणे हरसाल ताजे सनदेचा उजूर न करने दरीबाब ताकीद जानिजे मोो सुद

छ ५ सो माहे सफर

सन अहाद १ [ अबदला ? ]

---

ले. ५७१ } { शके १६५२ जेष्ट शु. ३ { सन १७३० मे ९

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५६ साधारण संवत्सरे जेष्ठ शुध त्रितीया भृगुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी

( शि ) ( शि ) याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी पा सुपे यांसी आज्ञा केली ऐसी जे राजश्री धुंडिराज गोसावी व सर्वोतम गोसावी बिन मोरेश्वर गोसावी वास्तव्य क्षेत्र श्री मोरेश्वर याणी हुजूर स्वामीसंनीध येऊन विनंती केली की आपले आजे

रा। मोरेश्वर गोसावी थोर माहापुरुष होते त्यास पूर्वी थोरले माहाराज कैलासवाशी राजश्री स्वामीनी पा। मजकुरी गांवगना वृती करून दिल्ही आहे बी ता।

| | |
|---|---|
| मौजे लोणी बाराऊकर्डेची येथे बा। अज येसू भाबकर कास रुके ८६ साहा येकून जमीन चावर १ | मौजे पणदरे येथे बा। अज गोयाजी धणगर कास रुके ८१ यो जमीन चावर येक १ |

| | |
|---|---|
| बा। मिरासी आलोजी भाब-कर पटी नजीक संभू कास रुके ८४॥ यो चावर पाऊण -॥।- | बा। खासा मिरास अज कास रुके ८८॥ पैकी कास ८१॥- येथे जमीन चावर -।- |

येणे प्रा। दोन चावर जमीन वृत्ती दिल्ही आहे त्याप्रमाणे चालत आले आहे आलीकडे धामधुमेच्या प्रसंगामुळें भोगवटा चालत नाही याकरितां स्वामींनीं कृपाळू होऊन पूर्ववत प्रमाणें वृत्ती करार करून भोगवटियास नूतन पत्रें करून देऊन चालवावयास आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंती केली व पूर्वील पत्रें आणून दाखविली त्यावरून मनास आणून दाखविली त्यावरून मनास आणून गोसावी थोर सत्पात्र यांचे वंशपरंपरेने चालविलीया स्वामीस श्रेयस्कर जाणून स्वामी यावरी कृपाळू होऊन सदरहूप्रमाणें गावगना दोन चावर जमीन दुतर्फा कुलबाब कुलकानू देखील इनाम तिजाई हाली पटी व पेस्तर पटी सरदेशमुखी व साहोत्रा खेरीज हकदार वृती करार करून दिल्ही असे तरी तुम्ही सदरहू वृती याचे दुमाले करून पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन हें असल पत्र भोगवटियास याजवल परतोन देणे जाणिजे (नि) लेखनालंकार

[ मर्या देयं राजते ]

त्र्यंबक हरी सुभेदार व कारकून
[ इहिदे सलासीन ]

श्री
नागनाथ चरणी
तत्पर हरिसुत त्र्यबक
निरतर

नारोपंडित सचीव,
[ इहिदे सलासीन ]

---

१ बाजिराऊ बल्लाल प्रधान, नारो आपाजी सुभेदार व कारकून [ शिक्का अस्पष्ट ]
[ इहिदे सलासीन ] [ इहिदे सलासीन ] [ इहिदे सलासीन ]

माहादजी यादव दिमत दरुनी माहाल वाडा दुसरा-माहादजी सालोखे कमावीसदार मौजे लोणी प्रांत सुपे-सलास आबैन-हाली मौजे मजकूर खाजगीकडे जाला आहे

नारो शंकर सचीव इहीदे सलासैन

श्री मद्रा
मत्कृपाधाम प्रा
प्रकामस्य माह +
नारायण वि +
प्रता जगदधाम
विराजती

———

ले. ५७२ } { शके १६५२ जेष्ठ शु. ३
इ. १७३० मे ९

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५६ साधारण संवत्सरे जेष्ठ शुद्ध त्रितीया भृगुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी पा इंदापूर यासी आज्ञा केली ऐसीजे राजश्री धुंडिराज गोसावी बीन मोरेश्वर गोसावी वास्तव्य क्षेत्र श्री मोरेश्वर याणी हुजूर स्वामी संनीध येऊन विनंती केली की आपले आजे रा मोरेश्वर गोसावी थोर माहापुरुष होते त्यास पूर्वी माहाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामीनी पा मजकुरी इनाम करून दिल्हा आहे बीा

| | | |
|---|---|---|
| मौजे सेलगाव येथे जमीन चावर येक १ | मौजे काझड येथे जमीन चावर येक १ | जकायेत पैकी दररोज टाकसाली रुके नव सण्या १८६ |

येणेप्रा दोन चावर जमीन व खुर्दा टाकसाली नव सण्या दिल्हे आहे त्याप्रमाणें चालत आले आहे आलाकडे धामधुमेच्या प्रसंगामुळे भोगवटा चालत नाहीं. याकरिता स्वामीनी कृपाळू होऊन पूर्ववतप्रमाणे इनाम करार करून भोगवटियास नूतन पत्रे करून देऊन चालवावयाची आज्ञा केला पाहिजे म्हणून विनंती केली व पूर्वी पत्रे आणून दाखविली त्यावरून मनास आणून गोसावी थोर सत्पात्र यांचें वंशपरंपरेने चालविलिया स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण ऐसे जाणून स्वामी यावरी कृपाळू होऊन सदरहूप्रमाणें टाकसाली नव सण्या व दोन चावर जमीन दुतर्फा कुलबाब कुलकानू देखील इनाम तिजाई हाली पटी व पेस्तर पटी सरदेशमुखी व साहोत्रा खेरीज हाकदार करून इनाम करार करून दिल्हा असे तरी तुम्ही जकातीपैकी नवसण्या दरोज व देहाये मजकूरपैकी दोन चावर जमीन पुत्रापौत्रादि

वंशपरंपरेने इनाम चालवणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन हे असल पत्र भोगवटियास गोसावी यांजवल परतोन देणे जाणिजे (नि) लेखनालंकार

मर्यादेयराजते

रुजू सुरु संमत सा॥ सा॥

निवीस सुमंत मंत्री सरकार

बार सुद सुरु सुद——बार बार बार बार

ले. ५७३ } { श. १६६४ इ. १७४२

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री त्रिंबक निराजी गोसावी

सेवक सदासिव चिमणाजी नमस्कार सु॥ सलास आर्बैन मया व अलफ पा॥ रासीन येथील मामला राजश्री आपाजी सोमवसी ( अपूर्ण )

( पाठीवर )

गज इलाही

॥ लबु तडना जवान ॥ तयाच्या च्यार वीतीं जाण ॥ येका गजाचे प्रमाण ॥ ते तीन येका पाडाचे ॥ १ ॥ याज परीस उणा तसु येक गज शरई ॥ ऐसा हिशोब आहे

———

ले. ५७४ } { श. १६७३ ज्येष्ठ व. ६ इ. १७५१ जून ४

श्री

राजेश्री सर्वोत्तम गोसावी यांसि

सरकत रोखा संभाजी व संताजी सणस+++हिरोजी गायेकवाड हाली वस्ती मौजे लोणी प्रा॥ सुपे सु॥ इसने खमसैन मया आलफ कारणे सरकतरोखा लि॥ दिल्हा ऐसाजे मौजे मारी तुमचे इनामाचे सेत आहे त्यामध्ये आपण उभयेता वा॥ आणीक सरकती घालून आसामी कबूल केली त्याची वाटणी

१ सन हजार ११६१ तिसरा वाटा दिवाणाचा

१ सन हजार ११६२ पासोन पचादेव दोन वाटे दिवाणचे तीन वाटे रयेत

१ याचे साली निमे दिवाण वाटा व निमे रयेत भाग

येणे प्रा॥ कौल पुर तोपर्यंत तुम्हास लि॥प्रा॥ वाटा देऊ सेतात मेहनत करू आवघे सेत तयार करून देऊ हे लि॥ सही छ २० माहे रजब बि॥ राघो योगिराज कुलकर्णी मौजे मार

निशान नागर

साक्ष

जानोजी न्हावी मौजे
मा।र सुभानजी सुतार
मौजे पणदरे

———

ले. ५७१ } { श. १६९८ श्रावण शु. ९
{ इ. १७७६ जुलै २५

श्री.

यादी सर्वोत्तम गोसावी इनामदार मौजे मोरगाव याचा व गावकर्‍रा याचा इनामाच्या तफावतीमुले कजिया होता सबब हुजूरून सुभ्याकडून कारकून पाठऊन चौकसी करविली त्याची मोजणी सुा सबा सबैन मया व आलफ छ ८ जमादिलाखर मोजणी बिघे सुमार

| | | | |
|---|---|---|---|
| पाच पव्या थल रुके | | जनादन गोसावी ८३॥ | |
| आज | बारायणी तुल | आज | तुल |
| १५॥।- उतर | १५॥ पश्चम | १७॥।= दक्षण | २॥।= पूर्व |
| १८॥ दक्षण | ११॥ पूर्व | १६॥≡ उतर | ३॥।४ पश्चम |
| ३४। | २७ | ३४॥ | ६॥८‐ |
| निमे बिघे | निमे | निमे बिघे | तिजाई |
| १७८=॥ | १३॥ | १७।- | २८≡॥ |
| २३० तपशील अदमासे | | ६४॥ तपशील अदमासे | |
| बिघे सुमार | | बिघे सुमार | |
| १८० अवल | | ३५ आवल | |
| ४० दुम | | २० दुम | |
| १० खडक माल व सीम जमीन | | ९॥ सीम | |
| २३० बिघे | | ६४॥ बिघे | |
| दोनसे तीस बिघे | | साडे चौसष्ट बिघे | |
| माहरीक रुके ८६ | | सर्वोत्तम गोसावी -।- | |
| | | वाहती | |

| आज | तुल | आज बिघे | तुल बिघे |
|---|---|---|---|
| १८॥ पूर्व | १०८२ उतर | २२ पश्चम | १०।१ |
| २१८२ पश्चम | ५।१ दक्षण | २३।१ पूर्व | ६८२ दक्षण |
| | ६॥४ मध्ये | | ९।१ मध्य |
| ३९॥२ | २२८२ | ४५।१ | २५॥४ |

| निमे | तिजाई |
|---|---|
| १९॥१ | ७।२ |

बिघे सुमार
१४५।-
तपशील अजमास
५० दुम
९५। सीम
——
१४५।
येकून येकसे पचेतालीस बिघे
आलोपंत इनामदार रुके ८३॥ यास तपशील
किंवा डाग रुके ८२
दुम जमीन

| आज | तुल |
|---|---|
| १४८२ पूर्व | २१- दक्षण |
| १४ पश्चम | २।४ उतर |
| | २॥१ मधम |
| | —— |
| | ७। |

| निमे | तिजाई |
|---|---|
| १४८१ | २।३ |

बिघे सुमार
३३॥४।-
क्रिा जनीन रुके ८१॥
आवल बिघे

| आज | तुल |
|---|---|
| ।७।२ दक्षण | १।४ पूर्व |

| निमे | तिजाई |
|---|---|
| २२॥३ | ८॥१ |

बिघे सुमार
१९४॥।३
तपशील अजमास
१२० आवल
७४॥।३ दुम
——
१९४॥।८३
पड जमीन खडक माल व पठार

| अज | तुल |
|---|---|
| ८ पूर्व | ६८२ उतर |
| ७ पश्चम | ३।४ दक्षण |
| —— | —— |
| १५ | ९॥१ |
| निमे | निमे |
| ७॥ | ४॥।-॥ |

बिघे सुमार
३५॥३
बेरीज तपसील
१२० आवल आजमास
७४॥।८३ तुम आजमासे
३५॥३ सीम कनिष्ठ पड जमीन

१६।। उत्तर     ११३ पश्चम
               ११३ मध्ये

३४८१     ४।-
निमे     तिजाई
१७     ११३

बिगे सुमार
२३।।।१
बिघे सुमार
५७।।
साडे सतावन बिघे

मोजणी बिा त्रिबक मुकुद कारकून निा हवालदार ताा हवेली साडस व मवानजी गौली निा नाईकवाडी ताा हवेली साडस प्राा पुणे व भगवानसिग निा देवीसिग लोक निा किले पुरधर गावलावी याचे व समाकूल पाढर व सर्वोतम गोसावी याचे व निलो गोपाल निा देव याचे गुाा मोजणी केली आसे

## कारी-जेधे.

ले. ५७६ { श. १५३८ चैत्र व. १
इ. १६१६ मार्च २४ }

नकल

आजम मीरखान ठाणे सिरवल ताा हिरोजी धोंडा मोकदम पाटलि मौजे चिखल गाव ताा रोहिडरवोरे सुाा सीत अशर अलफ तू आर्ज केलास जे मौजे मारची संचनी करण्यास हुकूम फरमाविला पाहिजे तेणेप्राो गावची संचणी करणे आणि पाटीलकी खाणे चतमाबाा नजराणा होन आठसे तू दिल्हे असेत ते दिवाणात जमा केले असेत तेणेप्राो पाटीलकी मिरासी बाा इनाम टके तीन वगैरे पासोडी व कुल मानपान खाऊन गाऊची चाकरी मुकरद आवलाद आफलाद खाणे आणि गावची वसाहत करून दिवाणात रुजू राहाणे ये बाबे कौल असे जाणिजे छ १५ रावल मोर्तब ( फारसी. )

ले. ५७७ { श. १५४४ ज्येष्ठ व. ३
इ. १६२२ मे २५ }

महजर हजीर मज्यालसी ताा भोर ताा रोहिडा बितेरीख १६ माहे रालवल.

कान्होजी देशमुख     सिका असे     नरसप्रभु देशकुलकर्णी
बापोजी जेधा     हिरोजी मोकदम

| | | |
|---|---|---|
| बागोजी मोकदम मौजे चिखलगाउ ता। भोर | नांगर असे | |
| बाबाजी मोकदम मौजे पोमरडी | नांगर असे | |
| सोनजी मोकदम मौजे चिखलवडे | नांगर असे | |
| हरी सुतार मौजे वडतुंबी | वाकस असे | |
| जईत नाक वार्तिक मौजे आंबवडे विळा | दोर असे | |
| बाबनाक वार्तिक मौजे आंबवडे | विळादोर असे | |
| विटरटा मेहत्र्या ता। भोर | मोगरी असे | |
| गोदनाक वार्तिक मौजे आंबवडे | | |
| ता। भोर | नागर असे | |
| इंद्रोजी मोकदम मौजे कर्नवड | नांगर असे | |
| साव ठाकूर प्रां। भोर मजकूर | कटार असे | |
| नागोजी महाडिक | कटरा असे | |
| माजजी चौगुला मौजे आंबवडे | नांगर असे | |
| येसजी मोकदम मौजे आंबेघर | नांगर असे | |
| बाबा सुतार मौजे आंबवडे | वाकस असे | |

सुहुर सन इसने असरीन अलफ कारणे महजर लेहून दिल्हा यैसाजे लखजी भडाळा मोकदम मौजे आंबवडे इसाफती देशमुख यास इनामती मोकदम मारास नवत टके २ दोन व उक्ता टका १ येक यांस टके १० दाहा व खाचर हे रकमे वेगले चिचवले खालील हे देशमुखाच्या वडिलानी दिल्हे होते त्यावरी नवा कुसूर जाला मग हुजूर येऊन मालूम जाले तरी लखजी मोकदम माराचा भोगवटा मनास आणिता सालाबाद चालिले आहे तेच बार निा ज्या खाचराचा कुसूर होता व इनामती टके १० दाहा व खाचर चिंचवल्यापुढील लिहून दिल्हे असे हे तू लेकराचे लेकरी खाऊन सुखे आसिजे तुज इनामती टके २ दोन व उक्ता टका १ येक यास टके १० दाहा व खाचर खाऊन देसमुखाची चाकरी करून मौजे मजकुरची मोकदमी खाऊन सुखी आसिजे

---

ले. ५७८ } { श. १५५७ कार्तिक शु. १ / इ. १६३५ नोव्हे. १

श्री सके १५५७ युवानाम सवछरे कार्तिक शुद्ध द्वितीया वार आदीतवार तादिसी राजेश्री कान्होजी नाईक देसमुख ता। भोर ता। रोहिडा यासि तुकोजी बिन विठोजी व बाबाजी बिन येलबाजी मोकदम मौजे नायेगौऊ पा। सिरवल आत्मसुखे साहेबाचे सेवेसी लेहूनु दिल्हे यैसे जे आपला दाईज लखमोजी बिन रामजी माली मोकदम निमे मौजे मा। त्याणे दिवाणात चाहाडी करुनु आपले घर बुडविले व परागदा केले ए सबबे साहेबाचे पाठी निघालो तरी ए सबबे साहेबी पाठी राखिली पाहिजे आपली मोकदमी मौजे मा।

निमेचा तर + + आहेती व ( पुढील एक दोन ओळी फाटल्या आहेत ) चावर २-३ व हकलाजिमा मिरास करुनु लेकराच्या लेकरीं दिल्हे आसे यास दुसरा विचार नाहीं जरी आपले कोण्ही दाईज गोत्रज अथवा दिवाण देसमुख इस्कील करील ते आपण जाणे यास आनसारिखे करीन तरी श्री—व आपल्या पूर्वजाची आण आसे हे लिहीले सही आपले खुसीने दिल्हे आहे हे सही

गोही

रांज पाटील व येस पाटील मोकदम मौजे महुरी ता। गु(ज)ण मावळ

नाईकजी तुपा मोकदम मौजे म्हकोसी ता। रोहिडा ता। भोर

---

ले. ५७९ } (सिका) { श. १५५९ कार्तिक शु. ७ इ. १६६३ आक्टो. १५

नकल फर्मान पारसीची इदलशा हाचे फर्मानाची

इा छ ६ माहे जमादिलाखर सुाा समान व सलासीन अलफ तपे रोहिडे याचे कार कुनाचे नावे कीं सां(प्र)त हुजूर विदीत जाले कीं कानोजी जेधे देसाई ता। भोर किले मजकुर याणी मेहनत करावयाविसी कोताई न केली व दुष्टांदन केले या करिता बहुत कृपा करून मौजे चिखलगाव किले मजकूर कानोजी देसाई मजकुरास इनाम दिल्हा असे तरी मौजे मजकूर मयेकुलबाब व कुलकानू त्याचे स्वाधीन करणे तो मेल्यावरी त्याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालविणे फर्मानाची तालीक घेऊन असल फर्मान त्याचे स्वाधीन करणे व फर्मानाप्रमाणे चालणे परवानगी हुजूर व आज्ञा अनवान बुलंदखान खान अलिशान सादतनिशान रफीउलकद्र बुलंदमकान एखलासखान वजीर हुकमत मोहर असे.

---

ले. ५८० } { श. १५७५ भाद्र. व. २ इ. १६४३ आगस्ट २१

श्री

येजितपत्र शके १५६५ सुभानु नाम सवछरे हाजीर मजालसी समस्त देशक ता। रोहीडखोरे.

कान्होजी नाईक जेधे देशमुख ता। मार सिका

नरसप्रभु देशकुलकर्णी ता। मार १

आंबाजी बलाल हेजीव १

कृष्णाजी पदमनाभी १

आलीभाई कारभारी १

| | |
|---|---|
| कृष्णाजी १ | देशक ता। मार |
| | कान्होजी चव्हाण व सोनजी भोरपी पा। |
| हिरोजी पा। को। भोर १ | मौजे वेनवडी १ |
| बापोजी पा। मौजे पोमर्डि १ | राघोजी पा। मौजे सिरवली १ |
| येसजी पा। मौजे आंबेघर १ | बालोजी व नाइकजी पा। मौजे करंजे १ |
| भिकाजी पा। मौजे नाटंबी १ | जाख माहाला १ |
| कान्होजी पा। मौजे वडतुंबी १ | भिवा सुतार १ |
| रुद्रभट जोसी १ | |
| लखनाक वरगणा १ | |

यासी बागोजी धोंडो पाटील मौजे चिखलगांव ता। रोहिडखोरे दिल्हे येजितपत्र जे मौजे मार ची रसद घेऊन दिवाणात गेलो आणि मालुमती समजावून रसद बारासे होन पूर्वी देऊन आपले नावे फरमान कुल मोकदमीचे आणिले यास पूर्वी वाई देशांत आमचा व हिरोजीचा वेगलवार वडिलापासून जाला त्याजवर हिरोजीने मुठमर्द करून या प्रांती येऊन चिखलगावची मोकदमी मेलविली त्याजवर वाई देशात आम्हावर कसाला पडला सबब भावाचे गावी आलो त्यास हिरोजीचेही उपयोगी बाकीचे पडलो आहे त्यास आम्हाकडून लबाडकी कागदाची आपले नावे करून घेतले म्हणोन आली त्यास मोकदमी व मानपान वगैरे हिरोजीचे त्यास आम्ही वेगळे झालो तरी हिरोजीचा भाऊ त्यानी मुठमर्द केलीच वतनही त्याचेच त्यास याचे वतनासी मला संमंध नाही जे तुमचे गोताचे विचारास येईल ते करावे इनाम पो। जो हिसा मला हिरोजी देईल तो घेइन वरकड हिलाहरकत करणार नाही मोर्तब असे.

---

ले. ५८१ } {श. १५६५ भाद्र. व. २ / इ. १६४३ आगस्ट २१}

कारिणा हिरोजी धोंडो पाटील मौजे चिखलगाव ता। रोहिडखोरे सुरु सन आर्बा आबैन आलफ बागोजी धोंडे याचा व आमचा खटला व्हावयास कारण जे दिवाणची

रसद वारावयास पाठविला तिकडे दिवाणांत माळुमती समजावून आपले नावे फरमान करून आला आम्हासी कज्या करू लागला जे मी वडील माझी मोकदमी व मानपान इनाम पासोडी माझी याप्रो बागोजीचे म्हणणे त्यास बागोजीचा व आमचा वेगलचार पूर्वीपासून वाई देशांत कुसगावी असता जाहाला त्याणी मुठमर्द करून मेळविले तरी आम्हास समंध नाही व आम्ही मुठमर्द केली असता बागोजी मौजे मारी येऊन राहीला कारण त्या प्राती दिवाणचा कसाला वोढेना सबब आम्हाकडे आला थोरला भाऊ यास परागंदा होऊ देऊं नये त्याजवरून आपले जवल ठेविला म्हणोन वतनास अधिकारी होऊन आपले नावे वतन करून घ्यावे हाही धर्मन्याये नव्हे परंतु कलिमहात्म पूर्वीपासून खस्त मेहनत माझी हिरोजीची हे तुम्हास देशमुख देशपांडे यास माहितच आहे आता तुमचे समस्ताचे म्हणणे तुझा भाऊ बागोजी वडील तिकडील वतनवर होता त्या वतनास तो मुकला आता त्याणे मुलखावर जावे की काय तुझे गावची बाकी तरी तुम्ही त्याने दिल्ही याचे कसे त्यास बागोजीने येजितखत द्यावे कुल मोकदमीस व मानपानास समंध नाही असे येजितखत दिली यास बागोजीस जो हिसा इनामपो मात्र होईल तो देईन वरकडा गावातील वगैरे दाइते मागणार नाही या प्रो तुम्हा जमीदाराचे देशकाचे गोहीने येजित खत द्यावे त्यास राजी आहे म्हणजे कांही हिसा देईन हा करिणा लेहून दिल्हा सही छ १५ जाखर.

---

ले. ५८२ } {श. १५७७ चैत्र शु. १०
{इ. १६५५ एप्रिल ५

द सौजनी परउपकार राजमानी राजश्री परसोजी पाटील मोकदम मौजे विंग पा पुणे यास सर्जाराऊ फर्जद कान्होजी राजे जेधे माहालीदार जोहार उपेरी मौजे मजकुरी आमची वरात होन ८८ आहे त्यापैकी होन ५८ हवाला केला बाकी होन ३८ राहिले आहेती याबा मिया माहालदार पाठविला आहे तरी झाडा करुनिया यापासी मा बाबासाहेब सुपा आहेती खर्च एक घडचे दिरंग न कीजे मो
सुा खमस खमसैन आल्फ
तेरीख ७ माहे जमादिलाखर

---

ले. ५८३ } {श १५८० मार्ग. व. १३
{इ. १६५८ डिसें १२

श्रीसके १५८० विलंबी नाव सवसरे मार्गस्वर वदी त्रयोदसी ते दिवसी धनको नाम बाजी सर्जाराऊ देसमूख ताा रोहिडा याणि रिनको नाम मलजी करवर मुा दिघींची अठफाडकर करयाती मानदेस अत्मसुखे परवतसमध्ये अरवत केला मुदल होनू १०८ दाहा दर माहे दर होनास कलातर रुके ‑।।‑ चोवीसप्रमाणे जालिया दिवसा उगवणी करुनु हा भाद्रपद त्रयोदसीस उगवणी करुनु मुदतीस उगवणी न करू तरी हडागे देउनु हा कतब सही

गोही

त्रिमलराऊ सिलेदार
खंडोजी राजे गुजर
मुधोजी जाधव
गवरोजी राजे मदने
कोंडाजी ताबट मुकाम पुणे

---

ले. ५८४ } {श. १५८२ मार्ग. व. ७. इ. १६६० डिसें. १४

द मसुरल हजरती राजमान्य राजश्री सोमाजी विस्णु हवालदार व कारकून ता। रोहिडखोरे यासी राघो बलाल नामजाद माहालानीहाय नमस्कार विनति सुा इहिदे सितैन अलफ कान्होजी जेधे देसमुख तपे मजकूर याचे बाबे आम्ही बखैर राजश्री साहेबाचे सेवेसी लिहिले होते त्याचा जाब राजश्री साहेबी लिहिला आहे तुम्ही लिहिले की कान्होजी जेधे निमे देसमुख रोहिडे याचे दस्त मनास आणिता देखील इनामती व किरकोल हक व गावखडी मिलोनु मोजना टके पाच हजार आहे यैसियास यापासून इनामती खडणी पेशजी गडकरी दरसाल होनु ३० घेत होते हाली साहेबांचे कारकिर्दीस होनु तीस घेतले आहेती यैसीयास निमे घेतले तरी अडीच हजार टके होत आहेती तरी याची काय रजा म्हणौवुनु लिहिले तरी जैसे काही सालाबाद चालले असेल तेणेचप्रमाणे चालवणे नवे न करणे ते साहेबाचेच चाकरलोक आहेती त्यावरी नवे न करणे छ २ रबिलाखर यैसा जाब राजश्री —— साहेबी लिहिला आहे तरी जैसे सालाबाद ता। सालगुदस्ता चालत आले असेल त्याचप्रमाणे त्यापासून घेत जाणे वरकड सालाबादप्रमाणे त्याचा दुमाला करणे तालीक लेहोन घेऊन असल देसमुखापासी फिराउनु देणे छ२० रबिलाखर

(अ) श्री राघो ब लाळ

(ब) मोर्तब सुद

---

ले. ५८५ } {श. १५८७ वैशाख शु. ६ इ. १६६५ एप्रिल ११

(फा. अ. शि.)

आज दिवाण ठाणे ता। रोहीडखोरे दा। बा। भिकनाक बिन येसनाक वितकारी मौजे नाटिंबी ता। भोर ता। मजकूर सुा खमस सितैन अलफ कारणे साहेबाचे बंदगीस कतबा लेहून दिधला यैसाजे साहेबी बोलाऊन आणून ना। मा। पुसिले की खोपडे व नाटिंबे आपण आपणामधें भांडिले हा समाचार मिनवान सगणे तरी हिरोजी नाटिबा याचे घरी सिकिलगर राहिला होता त्यापासी आपले लोखंड व रामजी खोपडा याचे लोखंड यैसे सिकिलकरास दिधले होतेसी आणावया आपण गेलो रामजी खोपडा मोकदम यैसे हर दोजण गेलो त्यावरी हिरोजी नाटिबा आपणास बोलिला जे तुम्हा आम्हास करांजे चल्या काये कराव्या पण बोलिलो की कां मी बाजीन व्हाव्या यावरी हिरोजी बोलिला

रामजी म्हणतो जे नाटिबे कोठे झगडले आहेती त्यावरी आपण बोलिलो जे येसे कधी रामजी बोलिला यावरी हिरोजी बोलिला जे बोलिल्यास महिने ६ जाले आपण बोलिलो जे सा महिने बोलिल्या जाले तरी आजी काये होते त्यावरी कोडजी नाटिबा हिरोजीचा पुतन्या बोलिला की रामजी तुज खवखवं मोठी आहे तरी तूं मज कोडजीसी भांड यावरी रामजी बोलिला जे तू साहेबांचा सेरकर मी साहेबांचा पाटील तुज मज भांडण करावयास निसबती नाही त्यावरी कोडजी बोलिला जे तूं पाटील काये चोटाचा येसी बेस्ताकी बोलिला यावरी रामजी कराचली घेऊन ओढिली यावरी आपण रामजीस हाती धरून वाड्याबाहेर नेला आणि मागे सवेच करांचली घेऊन ओढून कोडजी आबवा आला त्यावरी कोडजीस लिन्हाई दिधली पर लिन्हाईस न मनून कोडाजीवरी घाये टाकिला मग हर दोजण कराचलीने भांडो लागले यास कमपेश होये तरी साहेबांचा गुन्हेगार हा कतबा सही मग याचे बापभाऊ व याचे बापभाऊ मिलाले आणि तोडातोडी केली हा कतबा सही मोर्तबू

गोही

बाबजी चिकणे मोकदम
मौजे कारले
तेरीख ५ माहे सौवाल
सवाल

---

ले. ५८६ } { श. १५९०
{ इ. १६६८

श्री ( तालीक )

अज र०रा० सिवाजी राजे साहेब दाम० ब ता बजोनबू कार० व देश०ता रोहिडखोरे बिदानद के सुरसन तिसा सितैन अलफ येसाजी बिन इद्रोजी जेधा हुजूर येऊन अर्ज केला जे ताा मारचे देशमुखास इनाम च्यार गाव व हकलाजिमा सारा दुबाला होता ते वख्ती मौजे आबवडे ताा मार इनाम देसमुखीपैकी आपणास सेत टके ३ तीनचे इनाम चालवीत होते हाली देसमुखास येक गाव व हाकलवाजिमा दुमाले करून बाकी अमानत जाले आहे याबदल आपला इनाम सदरहू सेत चालत नाही तरी मेहरवान होऊन आपला इनाम सेत सदरहू दुबाले केले पाहिजे म्हणून बिनाबरा खातिरेस आणून येसजी माचे सेत दर सवाद मौजे आबवडे मा टके ३ तीन टकीयाचे पेशजी देशमुखाचे तर्फेने चालत होते तेणेप्रमाणे हाली दुबाला केला असे देखील माहासूल कुल० दुबाले करणे दर० सनदेवरून० तालीक० सदरहू सेत इनाम इा सन सबैन अलफ पासून चालवणे

---

ले. ५८७ } { श. १६१३ कार्तिक शु. ५
इ. १६९१ ऑक्टो. १६

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १८ प्रजापतिनाम सवत्सरे कार्तिक सुध पचेमी भृगुवासर क्षत्रीये कुलावतंस श्री राजाराम छेत्रपति याणि राजेश्री मुद्राधरी व लेखक किले रोहिडागड

(लं.ब.) श्रीा राजाराम नरपति हर्ष निदान मोरेश्वर सुत नीळक ठमुख्य प्रधान

(अ) श्री लक्ष्मि नृहरिप्रीते मुद्रा निराजि जन्मना राजा राम प्रतिनिधी प्रल्हादस्य विराजते

यासि आज्ञा केली यैसी जे किले मजकुरी पूर्वी जामदार होता तो दूर करून हाली विठोजी बिन चागोजी पवार जमासुदगी करून पाठविला आसे यास किलियावरी घेऊन याचे हाते जामदारीचे काम घेणे यास वेतन मोईनप्रमाणे इा सनद पोपासून परबार सेरीस्ता दडकप्रा वजा करून उरले वेतन देत जाणे यास जमान किले मजकुरी घेणे (नि)जाणिजे निदेश समक्ष

रुजू (ब)मर्या देयं विरा जते

तेरीख ४
माहे सफर सुा इसन बार सुद

सुरू सुद बार

———

ले. ५८८ } { श. १६२२ चैत्र शु. १५
इ. १७०० मार्च २३

श्री नकल

राजश्री सरदार लस्कर पागा व सिलेदार व किलेहाये व हुजराती व मुल्की लोक गोसावी यासी

द अखंडीतलक्ष्मीअलकृत राजमान्य श्रो——रामचंद्र निलकंट आमात्य सुा मया आलफ मौजे आंबोडे हा गाऊ जेधे देशमुख याचे इनामतीचा आहे व बाजार मौजे मा भरतो त्यास आमदरप्फीमुळे जो येतो तो उपसर्ग देतो त्यामुळे रयेत परागंदा होते म्हणोन कळो आले त्यावरून हे पत्र सादर केले असे तरी जो कोण्ही आमदरप्फीमुळे बाजारास व गावास उपसर्ग देईल त्यासी ( येथें सिका ) भीड होणार नाही हे पष्ट समजणे जरी बलेच जाऊन धामधूम करील तर मताजी जेधे तुमची भीड धरणार नाहीत मग कष्टी व्हाल हे पष्ट समजणे छ १२ सवाल वरकड गाव देशमुखांचे आहे त्यास उपसर्ग न देणे ( नि ) निदेश समक्ष ——— मोर्तब

ले. ५८९ } { श. १६२३ श्रावण शु. १२
{ इ. १७०१ आगस्ट ४

श्री

राजश्री शाहाजी मोहिते हवालदार व कारकून श्री माची पदमावती गोसावी यांस

॥द अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य----श्री शंकराजी नारायण सचीव आसिर्वाद व नमस्कार सुा इसने मया अलफ राा त्रिंबक मलहार कारखानीस किले चंदनगड याची मनुशे माची मारास आली आहेत तरी त्यास गडावरी घेऊन घरठाण करून देणे हरयेक विशइ परामृश करीत जाणे छ १० रबिलौवल

( ब ) श्री
नारायण सुत
शंकर

(लं.ब.) लेखनावधि
रयं भाति

सुरु सुद

---

ले. ५९० } { श. १६२७ चैत्र व. ८
{ इ. १७०५ एप्रिल ६

श्री

राजश्री मताजी सर्जाराऊ जेधे देसमूख ताा रोहिडखोरे गोसावी यासि

द अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य—श्नेहाकित विसाजी खंडागले हवालदार व कारकून किले मगलगड जोहार आा आसिर्वाद सुा खमस मया व अलफ विनती ( ये ) थील कुशल जाणून स्व ( कीये ) कुषल लेखन केले पाहिजे यानंतर गोसावी यानी पत्र पाठविले पावोन बहुत समाधान जाले लिहिले की आपल्याकडील लोक किले मास येऊन चाकर राहिले आहेत ( ते ) पाठऊन देणे म्हणऊन ( लि ) हिले तरी ते लोक माहाराज राजश्री--छत्रपती स्वामीचे सनदेने किल्यावरी चाकर राहिले या उपरी किल्याची आसामी धण्या ( खे ) रीज दूर होऊन निरोप दे ( ता ) येत नाही पहिलेच + + + रास गुतो नये गुतलेयाउपरी आसामी तुटत नाही कळले पाहिजे यानंतर गोसावी याकडे किले मारचे दास्तन पैकी गोसावी यास कर्ज गला ८४ मण दिला त्याची दिडी -।१ साहा मण + के त्यापैकी रुपये + + + + विले त्याच गला दर रुा ८॥१ सात पाइली प्राणे -।-।- सवा पाच मण जाला बाकी ८॥। पाइली उरला तो पाठविला पाहिजे बहुत काये लिहिणे कृपा असो दीजे छ २२ जिल्हेज हे विनती ( ष ) मोर्तब

सुद

---

ले. ५९१ } {श. १६३३ वैशाख व. ८ / इ. १७११ एप्रिल २९

(व) श्री
शंकराजी
नारायण

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री नारोपंडित सचिव ता। खेलोजी कुंभार मौजे आंबवडे ता। भोर ता। रोहिडखोरे सु॥ सन इहिदे अशर मया अलफ दिल्हे अभय पत्र यैसे जे तुझा व उत्रोलीच्या कुंभाराचा तह पूर्वीपासून विचित्रगडी जे उत्पन्न होईल ते दोघानी दो ठाई वाटून घ्यावे यैसे चालत असता हाली उत्रोलीचा कुंभार कथला करितो याची मनसूफी करावी म्हणून तुवा हुजूर येऊन विदित केले त्यावरून उत्रोलीच्या कुंभारास आज्ञा केली की तू हुजूर येणे गोतमुखे निर्वाह होईल त्याप्रमाणे चालविले जाईल यैसी आज्ञा केली असता उत्रोलीकर कुंभार हुजूर आला नाही पळोन गेला तू हुजूर आलास हुजूरून तुजला अभयपत्र सादर केले असे तरी तू कोणे बाबे शक अंदेशा न धरिता सुखरूप राहोन वतनाची चाकरी करणे तुजला कोणे विशई आजार लागणार नाही अभय असे छ २१ रबिलावल पा। हुजूर.

सुरु सुद.

---

ले. ५९२ } {श. १६३९ मार्ग शु. १० / इ. १७१७ डिसें २

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री भिमाजी नरसिह दि॥ सरदेशमुख गोसावी.

सेवक पंताजी सिवदेव नमस्कार सु॥ समान अशर मया अलफ देशमुखीच्या इनाम गावी सरदेशमुखी घ्यावयाचा सालाबाद तह नाही त्यास सांप्रत तुम्ही देशमुखाचे गावी सरदेशमुखीचे मावल प्रांते रोखे केले आहेत म्हणवून विदित जाले तर सालाबाद हे गोष्ट होऊन न आली त्यास हाली तुम्ही कज्या करावा यैसे नाही व देशमुखाकडची पटी हुजूर घेतली असता त्यासी सरदेशमुखी घ्यावी यैसे सालाबाद नाही यैसे असता मताजी नाईक जेधे याच्या भावाबंदाच्या कथल्यामुळे त्याकडे सेरणी घेतली त्यास तुम्ही सेरणीची सरदेशमुखीचे रोखे केले म्हणौन कळो आले तर हे गोष्ट बरी नव्हे सालाबाद इनाम गावास व सेरणेस देशमुखाचे सरदेशमुखी घेत नाही तुम्ही कथला येकदर न करणे छ ९ मोहरम

(वा) श्री ०
भार्गवचर
णी तत्पर पंता
जी शिवदेव
निरंतर

(वा) मोर्तब
सुद

सुरु सुद

---

ले. ५९३ } {श. १६४० श्रावण व. २
इ. १७१८ आगष्ट २

द मा। अनाम देसमुख व देशपांडे ता। रोहिडखोरे यासि जोत्याजी केसरकर आ। सरदेसमुख सु॥ तिसा अशर मया अलफ ता। मजकुरी सरदेसमुखीचे कमाविसी स रा भिमाजी नरसी होते ते दूर करून हली राजश्री गोविंद हरी यासि कमावीस सागितली आहे तुम्ही यांसि रुजु होऊन सरदेसमुखीचा आकार परमाणे उसूल देणे दिवाण बेरीज येक हजार व खड कमावीस दरसदे पचोत्रा देणे व भेटीबकर कानूबाब देणे छ १५ रमजान मोर्तब सुद

(चौ)स्वस्ति श्री सुखदा मुद्रा प्रतापोत्कर्ष वर्धिनी ॥ सरदेश सुखस्यैषा शाहू राजस्य राजते

(चौ) लेख

बार नावधि

---

ले. ५९४ } {श. १६४० श्रावण व. १०
इ. १७१८ आगस्ट १०

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विलबीनाम संवत्सरे श्रावण बहुल दशमी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणि देशमुख व देशपांडिये व मोकदमानी शेटे महाजनान ता। रोहिड खोरे प्रा। भावले यासि आज्ञा केली ऐसीजे सरदेशमुखीचे ( व ) तन स्वामीचे पूर्वीपासून चालत आले आहे हाली अज पेशगाहा फजल व कर्म खिलाफत व ज्यांहादारा पातशाह अलम अलमियां याणी मन्हामत केले त्याच्या सनदा नबाब अमिरुलउमराव यांच्या आहेत ऐसियासी ता। मजकूरची सरदेशमुखीचे कमाविसीस राजश्री जोत्याजी केशरकर अजहत सरदेशमुख यांणी आपले तर्फने गोविंद हरी यास कमावीस सांगोन पाठविले आहेत तरी तुम्ही यांचे विद्यमाने ता। मारची जमाबंदी व पटी व तह रहकरणे तो करीत जाणे दुतर्फा येकंदर जमाबंदी मुळे आकार होईल त्यास व कमाविसबाबे सवजकातीस हक रयेत निा। दर सदे दावोत्रा प्रमाणे वसूल देत जाणे तुमार व महजर व रोजनामेवरी सरदेशमुखीचे निशाण आर्धी घेत जाणे ( नि ) लेखनालंकार.

• श्री
श्री आई आदि पुरुष
श्री राजा शाहू छत्रपती
स्वामी कृपानिधि
तस्य श्रीनिवास
परशुराम प्रतिनिधि

( शिका
बाळाजी
विश्वनाथाचा )

(ष.) मर्या
देयं विरा-
जते

रुजु सुरुनिविस सां। मंत्री

बार सुद सुरु सुद बार बार

---

ले. ५९५ } { श. १६४० कार्तिक शु. ५
इ. १७१८ आक्टो. १७

दे मा। अनाम देशमुख व देशपांडे' ता। रोहिडखोरे यासि पंताजी सिवदेऊ सु॥ तिस्ना अशर मया व अलफ सरदेशमुखी राजश्री—स्वामीचे वतन आहे साल मजकुरी दुतर्फा आकारप्रा॥ वसूल घ्यावा येसा तह जाहला आहे तरी मोगलाई तर्फेचे मख्ता करून दिला आहे त्यास दर सदे पंचोत्राप्रमाणे' वसूल देणे वरकड साल गुदस्तप्रमाणे माहालचा वसूल देणे जोत्याजी केशरकर याचे तर्फेने रा। केसो रघुनाथ कमाविसदार पाठविले आहेत त्याकडे सदरहू तहप्रा॥ वसूल देणे छ ३ जिल्हेज. (वा.) मोर्तब

सूद

सुरु सूद

———

ले. ५९६ } { श. १६४० कार्तिक शु. १२
इ. १७१८ आक्टो. २४

राजश्री देशमुख व देशकुलकर्णी ता। रोहीडखोरे गोसावी यासि

सो। शामजी हरी नामजाद सुभा प्रांत मावले आसिर्वाद व नमस्कार सु॥ तिसा अशर मया अलफ बा। सनद राजश्री पंताजीपंत तेथे आज्ञा की सरदेसमुखी राजश्री स्वामीचे वतन आहे त्यास' दुतर्फा आकारास पंचोत्रा घ्यावयाचा तह आहे त्यास मोगलाईची खंडणी जाली आहे त्यास' सरदेसमुखी देणे सालाबादप्रा॥ देवणे खुद सेते गडकरी याची असतील त्याची सरदेसमुखी हक मु॥ खर्च लिहीणे बाकी सरदेसमुखी दि॥ जकाती वसूल देणे म्हणून आज्ञा त्याप्रा॥ तुम्हास' सनद सादर केली आहे तरी दुतर्फा सरदेसमुखी वसूल घेणे गडकरी याची खुद सेते इनाम' गाव वजा करून बाकी सरदेसमुखी दुतर्फा पंचोत्राप्रा॥ देवणे जाणिजे छ १० जिल्हेज.

———

ले. ५९७ } { श. १६४१ ज्येष्ठ शु. ४
इ. १७१९ मे १२.

( मु. व सी ले. ५९२ प्रो )

द मा। अनाम देशमुख व देशकुलकर्णी ता। रोहिडखोरे यासि पंताजी सिवदेउ सु॥ सन तिसा असर मया अलफ राजश्री स्वामीकडे इरसाल पिकले आबे ता। मजकुरीहून सुमार १००० हजार अणविले असेल तरी उत्तम अबे इरसाल गावगना आहेत ते उतरोन अढ्या घालोन हुजूर हजार आबे पाठवून देणे व ताग अगर वाख पक्का ८॥ आदमण या कामास जानोजी चिवा दि॥ स्वारी पा। आहे यास राये -॥- निम देविला असे देणे छ ३ रजब

सुरु सुद बार

———

ले. ५९८ } {श. १६४१ आश्विन शु २ / इ. १७१९ सप्टे ४}

राजश्री मताजी सर्जाराऊ जेधे देसमुख ता। भोर गोसावी यास

श्री शामर्जी हरी नामजाद सुभा प्रांत मावले असिर्वाद सुा। असरैन मया अलफ तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिा। वर्तमान कलो आले लिहिले की नागोजी जेधे राजश्री पंताजीपंताकडे साताराियास गेले आहेत आपणास मसाला करून बोलाविले आहे त्यास जाणे लागते तरी राजश्री पंताजीपंतास पत्र देणे म्हणवून लिहिले त्यावरून पत्र पाठविले असे आम्हास आठ च्यार दिवसांत बरे वाटले म्हणजे आम्हीही साताराियास येतो तुम्ही काही चिंता न करणे जाणिजे छ २९ सवाल. (वा) मोर्तब

सुद.

---

ले. ५९९. } {श. १६४१ पौष शु. ५ / इ. १७१९ डिसे ३}

राजश्री मताजी सर्जाराउ जेधे देसमुख ताा भोर गोसावी यांसि

श्री शामजी हरी नामजाद सुभा प्रा। मावले असिर्वाद सुा। अशरैन मया अलफ विसोबा नाईक व बाजे उदम याचा मक्ता तुम्हास देविला मोईन टके १२ बारा करून दिल्हा आहे त्याप्रा। तुम्ही घेणे जाजती तगादा येकदर न लावणे छ ३ राबिलावल

(वा)मोर्तब

सुद

---

ले ६०० } {श १६४३ आषाढ शु. ७ / इ. १७२१ जून २}

॥ द मा। अनाम मताजी सर्ज्याराव जेधे देशमुख ता। भोर ता। रोहिडखोरे यांसि नारो शंकर सचिव सुहुर सन इसने अर्बैन मया अलफ खणपटीची पटी गावगना जाजती घातली आहे यामुळे वसुलास खलेल जाले आहे तरी पटीची याद श्रीपाने केली आहे ते पटी शामराउ व धुलोजी याजबराबरी पाठवून देणे छ ६ रमजान या कामास बजाजी कालभर जुा। खंडोजी अबीले पाठविला आहे त्यास ता। ८॥ चवल देणे पा। हुजूर

लेखना

मुरुमुद बार बाशि मुदा बार

---

ले.६०१ } { श. १६४४ माघ शु. २
{ इ. १७२३ जाने. २७

श्री

तालीक

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये राजेश्री शामजी बलाळ नामजाद प्रा जावळी गोसावी यासि.

स्नो श्रीनिवास परशराम प्रतिनिधि आसिर्वाद सुा सलास अशरीन मया अलफ मताजी सर्जाराव जेधे याची पेसजी मनसुफी होऊन कागदपत्र जाले आहेत यैसे असता हली तुम्ही येविसीचा मनसुबीचा उद्‌घाट करून याच्या इनामास ६॥ (स) पटी घातली आहे म्हणवून हुजूर विदित जाले तरी येक वेळ कागदपत्र जाले मनसुबी होऊन चुकली असता तुम्हास येविसी उद्‌घाट करावयास प्रयोजन काय या उपरी तुम्ही यात मन न घालणे पेसजी पत्रे जाली आहेत त्याप्रमाणे इनाम देखील चालविणे येविसी फिरोन बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १ जमादिलावल.

---

ले. ६०२ } { श.
{ इ.

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री नागोजी नाईक जेधे यासी आज्ञा केली येसी जे तुमचे प्रयोजन आहे तरी साहेबाचे दर्शनास जमावसुधा हुजूर येणे ये विसी कितेक राजश्री भिवजी कासुरडे खसखेल यास आज्ञा केली आहे याणी आपले पत्रे तुम्हास लिहिली आहेत त्यावरून कळेल जाणिजे रा छ २८ जिल्हेज (नि) बहुत काय लिहिणे.

लेखना

वधि

---

ले.६०३ } { श. १६४४
{ इ. १७२२-२३

श्री

द मा अनाम मताजी ना जेधे देशमुख ता भोर ता रोहिडखोरे यांस नारो शंकर सचिव सुा सन सलास अशरैन मया अलफ राजश्री———स्वामीचे घरी

(ब) श्री श्री म छं क रसुत नारा यण

लग्न आहे या करिता मडप घालावा लागतो तरी ता भोरपैकी वेठे १० दाहा असामी आले आहेत तरी सदरहू दहा वेठीयाबराबरी मेठे लांब हात ७ व खरा लांब हात ११ व वासे सिताबीने रवाना करणे येक घडीचा दिरंग न लावणे या कामास रघोजी पवार व माहादजी येल-

गुडा पाठविले आहेत यास रुपये -॥।- पाऊण रुपये आदा करणे आणि सामान सिताबीने रवाना करणे

(वा) लेखना
वधि मुद्रा

सुरु सुद

---

ले.६०४ } (मु. व. सी. ले. ५९२ प्रो) { श. १६४५ आश्विन शु. १४
इ. १७२३ आक्टो. २

श्री

॥द मा॥ अनाम मताजी जेधे देशमुख ता॥ भोर यांस पंताजी सिवदेव सु॥ आर्बा असरीन मया अलफ तुम्ही लिहिले वळो आले लग्नपटींचे बाबे लिहिले तरी मरास्ट तर्फेची लग्नपटी सिस्तप्रा पटी करून देणे मोगलाईची पटी आरबा॥ दरसदे रु॥ १० दाहा जाली आहे त्याप्रो घेर्ताल नागोजी जेध्यांचा व तुमचा वतनाचा वथला लागला आहे त्याचा इनसाफ करावा लागतो तरी तुम्ही लौकर येणे छ १३ मोहरम.

सुरु सुद

---

ले.६०५ } { श. १६६७ चैत्र शु. १२
इ. १७४५ मार्च २३

श्रीनागेश

जबानी मताजी नाईक देशमुख ता॥ भोर तपे रोहिडखोरे मौजे आंबवडे ता॥ मा॥र येथे कारकीर्द राजश्री कान्होजी नाईक थोरले देशमुख याणी मौजे मा॥रची खोती कासारास सांगितली होती तो करीत असता दिवाण निजीमशाइचा टका कासाराचे वेलेचा गावात बाकी टके १००० येक हजार बाकी राहिली ते वसूल नव्हे म्हणून खोती कासाराची दूर करून निमळास सांगितली त्यावर राजश्री कान्होजी नाईक थोरले मयत जाले त्या-उपरी त्याचे पुत्र रा॥ नाइकजी नाइक देशमुखी करू लागले त्याचे वेलेसही टका फिटेनासा जाला म्हणून राजश्री नाइकजी नाइकानी मुलुखचा टाणगा यास गावीचा कारभार लावणी उगवणीचा सागोन टेविला त्याणेही खोतकीची चाकरी केली त्यासही टका फिटेनासा जाला मग संभाजी भडाला याचा वडील रा॥ नाईकजी नाइकाकडे चाकरमान्याची नाइकी होती त्याणे रा॥ नाइकजी नाइकास आर्ज केला जे साहेबी मेहरवान होऊन मजला खोती दिल्ही म्हणजे मी टका देऊन खोती करीन म्हणून त्याजवर रा॥ नाइकजी नाइक देशमुख मेहेरवान होऊन खोती करण्यास सांगितली त्याणे हजार टके कबूल करून हजार टकिया-तून टके १५० दीडसे दिल्हे बाकी साडे आठसे राहिले म्हणून ठाणगा पाठविला त्यास आज उद्या देतो ऐसे म्हणता साहा महिने जाले दिवाणचे मागणे निकडीचे लागले म्हणून राजश्री नाइकजी नाइकानी आपला बंदा रायोजी जेधा संभाजी भडाला याचे वडिलाकडे

पाठविला त्याणे जावून पैका मागू लागला तीन दिवस आठ केला तिसरे दिवसी हाती धरला की तू देशमुखाकडे चल म्हणून राघोजी जेधे व संभाजीचे वडीलामध्ये कटकटी जाली त्यावर संभाजी भडाला याच्या वडिलाचे हाती कुदळी होती ती राघोजी जेधा याच्या डोईवर मारून जिवेच मारिला ही खबर रा। नाइकजी नाइक देशमुख यास कलली मग त्यास आणावयासी माणसे पाठविली तो भडाला रातोरात पलोन गेला थाक लाविता कोठेही थाक त्याचा लागेनासा जाला त्यावर खोर्ता काळोखियास सांगितली ही खबर लखजी भडाला कुरळोसीहून तिटेघर ता। मारी येऊन राहीला होता त्यास कललेयावर लखजी कारीस आला राजश्री नाइकजी नाइकास बोलिला जे मौजे मारचा मोकदमी दिवाणचा टका भरून देतो मजला मौजे मारची मोकदमी नेहमी करून दिल्ही पाहिजे त्यावर लखजीने टका भरला म्हणोन मेहेरबान होऊन त्यास मोकदमी करून दिल्ही महजर जाला नाही टका भरून घेऊन दिवाणचा वारला महजर देतो म्हणता रा। नाइकजी नाइक मृत्य पावले त्यावर त्याचे पुत्र कान्होजी नाईक देशमुखी करू लागले त्यास लखजी भडालियाणे आर्ज केला की साहेबी मजपासून टका भरून घेऊन दिवाणचा वारिले परंतु महजर करून दिल्हा नाही तरी मेहरबान होऊन महजर करून दिल्हा पाहिजे त्याजवरून राजश्री कान्होजी नाइकानी महजर करून दिल्हा त्याजवर लखजी भडाला पाटिलकी करू लागला तो पाटिलकी करिता काल पडला कालामुले परागंदा होऊन मुलखावर मलजी व लखजीची गेली त्यावर अवरंगशा पातशाची चाली या प्रांती जाली मुलूख वाताहात होऊन गेली मोगलाई जाली त्यावरी सिरवलास ठाणे आले मुलुखास कौल करार देउ लागले तो मौजे आंबवडियास पाटील नाही पाटलाची वाजपुस करू लागले त्यास रो सरज्याराव याणी महाराज राजश्री संभाजी राजे यापासी कोठावला रामजी भडाला होता यास चवथी तक्षिम देऊ केली गावात टेऊन लावणी उगवणी करणे मोगलाचा टका वसूल वालीस लाविला रेखोजीवर कसाला बहुत पडला खोडबेड्या घालोन टका भरून घेतला यैसे आहे

---

ले.६०६ | शा. १६६७ चैत्र शु. १<br>इ. १७४५ मार्च २३

श्रीनागनाथ

चिरपत्र हजीर मज्यालसी संनिधश्री याचे देवालई मौजे अंबवडे ता। भोर ता। रोहिडखोरे शके १६६७ क्रोधन सवछरे चैत्र सुध प्रतिपदा जे संभाजी बिन नागोजी भडला चिरपत्र जे आपल्या वतनात वाजी बिन तान्हाजी भडाला उभा राहिला यास्तव इनसाफ मुलेश्री-ची क्रिया नेमिली जे वाजी आपले वंसीचा नव्हे.आपले वडिली काही वतन दिल्हे नाही आपणास वडिली सांगितले

नाही हे खरे वतन आपले बाजीस समंध नाही यैसे वदोन श्री-बरी बेलपत्राचा दिव्य केला आपण बेल काढून बाजीस दिल्हा आपणास दशरात्रीत अथवा पंचरात्रीत श्री—ने काही घात मृत्याचा आपले घरचे माणुस व चतुषपाद मृत्य पावले तर आपण खोटा आपण-श्री चा बेलपत्र दिव्य केला हे खरे.

---

ले. ६०७ } {श. १६६८ आषाढ शु. १ / इ. १७४६ जून ९

॥ द मा अनाम नागोजी सर्ज्याराव जेधे देशमुख ता भोर ता रोहिडखोरे यास चिमणाजी नारायण सचीव सुा सबा अर्बैन मया अलफ राजश्री—स्वामी यानी गोवणकोटेचे मसलतीबद्दल लोक इसाफतीपैकी हुजूर आणविले असेत तरी इसाफती पैकी लोक आा २० वीस जण चतुर्मासची पोटाची बेजमी करून सिताब हुजूर पाठवून देणे ढील केलिया इसाफती दूर होतील यैसे पष्ट समजोन सदरहू लोक लौकर पाठवून देणे या कामास कान्होजी निगडा पाठविला यास हाा १५ येक इसापती पैकी लोक सिताब आदा करणे पाा छ ३० जमादिलौ

(ब) श्री
शंकराजी
नारायण

(बा) पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद बार

---

ले. ६०८ } {श. १६६८ भाद्र. शु. २ / इ. १७४६ आगष्ट ७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महादाजीपत स्वामी गोसावी यासि पो आनंदराउ बाहिरव नमस्कार विनंति उपरी येथील कुषल ताा भाद्रपद सुध द्वितीया मुाा राजपुरी जाणून स्वकीये कुषल लेखन केले पाहिजे या नंतर ताा रोहिडखोरे या मावलात मोगलाईचा तगादा केला म्हणून देसमख ताा मार यानी विनंतिपत्र लिहिले त्यावरून विदित जाहाले यैसियास मोगलाईचा यैवज दरमहात मजुरा राजश्री-स्वामीनी दिल्यावाचून मोगलाईचा यैवज सुटतो यैसे नाही हा विचार तुम्हासही कळला आहे आम्हासही कळतच आहे येथून राजश्री फत्तेसिंगबावा भोसले दरबारा गेले त्यानी दरबारी मोगलाईची बोली घातलीच आहे सांप्रत राजश्री—पंतप्रधान याची पत्रे राजश्री स्वाचीचे सेवेसी पाठविली आहेत की राजश्री पंतसचीव यास दरमाहात मोगलाईचा यैवज मजुरा द्यावा आणि लोकास उपद्रव न करावा म्हणून राजश्री—स्वामीस व राजश्री—पंत सचिव यास पत्रे पाठविली आहेत निर्वाह होइल तोपर्यंत तुम्ही मोगलाईचा तगादा महालात न करणे तह होये तोपर्यंत तकूब असो देणे वसूल घ्यावयास दिरंग लागतो यैसे नाही येके दिवसी वसूल घेतला जाईल

आमचे लिहिणे इतकेच कीं दरबारी होऊन तह होये तोपर्यंत वसूल ने घेणे बहुत काय लिहिणे ) येथून लोक उठोन गेले तरी हे बदनामी केवल आमचेच सिरी आहे येसे नाहीं राजश्री पंतावरी निमित्य येईल या निमित्य येथें लोक गाडून राबावें लागले आहे मोगलाईच्या येवजावरी कापसाचे बे लोकास दाखवून आजीवरी वोढिले येथेही रोजमरा दीड मास पावला नाहीं आणी घरी ही तगादा लागलियाउपरी हे लोक काशास राबतील होणार असेल ते होईल आमचा येत्न काय सारांष राजश्री × प्रधानाचें उत्तर ये तोवरी सबूरी करावी हे विनंती.

---

ले. ६०९ } { श. १६६८ इ. १७४६

करीना खंडनाक वलद रामनाक महार मौजे करंजिये ताा भोर ताा रोहिडखोरे सुाा सन सबा अर्बैन मया अलफ साहेबाचे सेवेसी करीना लेहोन दिल्हा येसाजे इदिलशाहा निजामशहाचे कारकिर्दीस किले रोहिडा येथे आपले बापाचा चुलता काळनाक महार मौजे मार व येसनाक महार सोंडकर या दोघांच्या नाइकया होत्या ते समइ वतनदारीचे चाकरीस कमळनाक महार मौजे नाटंबी ताा मार व वाडी व धावडी ताा उतरोली हे दोघेजण दुतर्फाचे महार होते निमेनिमप्रमाणे उत्पन्न घेऊन चाकरी करून होते त्या दोघानी बदमामली केली म्हणोन अजम सेखजी किलेदार किले रोहिडा याणी दोघाची डोचकी मारावेसी केली व कुलेबाले ढाणकास द्यावीसी केली तेव्हा सोंडकराने रदबदल करून कमळनाक महार मौजे नाटंबी यासी आपले हातीं घेऊन खंड कबूल केला तो दिवाणात दिल्हा वाडी धावडीचा महार अटकेंत ठेविला ते समई नाटंबीच्या महारास खंडाचा पैसा न मिळे म्हणून त्याने आपले महारकीच्या वतनाची चौथी तक्षीम येसनाक सोंडकर यासी दिल्ही तेही येसनाक कबूल न करी आपला पैकाच मागो लागला तेव्हां महारकीच्या वतनाची चौथी तकसीम व किल्लाचे वतनदारी मुले उपेंद्र होईल ते खाणे व वतनदारीची चाकरी करणे म्हणोन सांगितले त्या प्रमाणे येसनाकाने कबूल करून त्याप्रा चालत आले त्यावरी किला महाराज राजश्री थोरले—स्वामीस हस्तगत जाला मोगलाई बुडाली तेव्हां काळनाकाची नाइकी व सोंडकर महाराची नाइकी करार केली आणि वाडीचा महार अटकेत होता त्यास खंडाचा पैका न मिळे याकरिता त्यास सर्जाबुरुजाच्या खाले पायांत घालावयाचा हुकूम महाराजानी केला त्यावरून वाडीचा महार सर्जा बुरुजाच्या पायाखाले घातला त्यावरी काळनाक व सोंडकर महार मयत जाला पारांडा जाला देशावरी गेले त्यावरी रामनाक आपला बाप गावावरी आला त्याणे रायेगडास जाऊन महाराज राजेश्री—कैलासवासी याणी पूर्वीचा दाखला मनास आणून पूर्ववत प्रमाणे सनद दिल्ही ते किल्यास आणिली मेटे आठ वसविली नाइकी वतनदारी चालवू लागला

---

× प्रधानाचें येथपासूनचा पुढील मजकूर पत्रावर श्रीकाराशेजारी आडवा लिहिला आहे

पुरातन घरठाणा बांधला टाके पाणी खावयासी एक दिल्हे तेथील पाणी खावून वतनदारीची चाकरी व नाइकी केली तो मृत्य पावला त्यास सर्जा बुरजाखाले पुरिला तेथें चिरा रोविला आहे त्यास त्याचा लेक आपण आपले लग्न जाले नव्हते तेव्हां भोजनाक राजाणी वस्ती वाडी ता उत्रोली त्याची लेकी लग्नाची केली ते लहान म्हणवून त्याचे घरी येकेठाई राहीलो आणि वतनदारीची चाकरी व किलाची नाइकी करीत होतो त्यावरी भोजनाक बोलला की तू एकला तुजला दोन्ही चाकऱ्या ओढणार नाहींत तरी वतनदारीची चाकरी मजला सांगणे व तूं नाइकी करणे म्हणोन बोलिला त्यावरून आपण त्यास बोलिलो कीं तुजला वतनदारीची चाकरी सांगता येत नाहीं तरी तूं माझे नाइकीत + + + + राहोन माझे निसबतीने वतनदारीची चाकरी करिसील तरी तुजला सांगेन येसे बोलिलो त्याप्रा भोजनाकाने कबूल केले त्यावरी त्याची आसामी आपले नाइकीत घालून त्यास वतनदारीची चाकरी करावयासी सांगितले आपण नाइकी करीत होतो त्याउपरी आपण वेगळा निघालो तेव्हां वतनदारीबद्दल भोजनाक कजिया करू लागला दसरियाचे शांतीच्या टोणग्याचे सीर आपले वडील व आपण घेत भोजनाकाने कजिया खाले सीर घेत होता त्यास आपण दोही दिल्हीं त्या तागाईत दरवाजा नजीक श्री—जननजिवळ टोणगियाचे सीर पुरु लागला.

---

## इंदापूर-देशपांडे

ले. ६१० | शा१६२४ फाल्गुन व. ७ / इ.१७०३ फब्रु. २७

(फा. वा. शिक्का)

देसमुखानि व देशपांडयानी प्रा इंदापूर सुा ११११ मालूम दानद प्रा मजकुरी राजश्री येकोजी राजियाची जागीर साहीम दस्तूरबदल जाली परवाना आमील घेऊन पेसजीच आगारीस अले आहेती करोडियान व मोकदमानी नस्टाई करून जत्रेच्या कामास तथवत तफावत केले आहे माल सोडिला आहे जागीरबदल असता रयेतीने येसे खेळ केले तुम्ही माकूल लोक अवघ्या नियेमे नेले असतील अगर रयतीने माल नेला रयेतीकडे येसे थारले आहेत मोकदमास ताकीद करून बमोजीब तनखा जमाबंदी करून वसूल करवणे यात तुमचा मजुरा आहे तीर्थस्वरूप राजश्री आबासाहेब दौंडस गेले आहेत आलियावर त्याच्या मोहरेनासि तुम्हास परवाना येईल हतपासून तुमच्या आमचा घरोबा चालत आला आहे त्याप्रमाणेच तुम्ही घरोबा राखोन स्नेह राखणे मोहिमेत राजश्री येलोजी राजे खुशाल राहेत ते करणे हर घडी आपली खुशखबर लिहीत जाणे छ सा सवाल ( ष. मो. )

---

ले. ६११ } { इ. श.

॥ श्रीमद्दत्तात्रेयायनमः ॥

मोगलखान

राजश्री गोविद कान्हो व गोमाजी सुरो व नारो माणकेस्वर व माहादाजी भास्कर देशपाडे पा। इदापूर गोसावी यास

॥द श्रीमत्सकळ गुणालंकरण सौजन्यैक निकेतन राजमान्य-अर्ती स्नेहपूर्वक कान्होजी राजे प्रभानवलीकर दंडवत येथील क्षेम पर्यंत येथास्थित जाणउन स्वकुशल लेखन केले पाहिजे इपरी सांप्रती राघोपंताचे लिहिलियावरून कलो आले कीं चौऱ्याआसीचे पाटील व कसबियाचे बलुते मिलोन देशमुखाची पाटिलकी कसबियाची म्हणऊन शाहिदी द्यावी येसा करार केला हे वर्तमान लांडियास कलोन परगणियास आपण राजी नाही गोतामधे जाईन आगर साकरोजीस हुजूर घेऊन जाईन म्हणतो तरी गोतामधे आगर हुजूर जावयास आम्हीही राजी आहो व सेख सदू साकरोजीस व राघोपंतास म्हणताती की लांडा खाने आजम व हालीमवाली व काजीस आठ हजार रुपये कबूल करून देतो की महजर करून देऊन पैके घेणे येसे म्हणतो तेच आठ हजार रुपये तुम्ही कबूल करणे तुम्हास महजर करून देऊन ये गोस्टीस तुम्ही आनमोदन देऊन त्याचसारखे बोलता म्हणे तरी आम्ही पाटिलगी नवी साधायास आगर खरीदी करावयास आलो नाही की आठ हजार रुपये कबूल करून महजर करून घ्यावे ज्या गावास पाटील नाही तेथे देसमुख पाटील व कुलकरणी नाही तेथे देशपाड कुलकरणी हा दस्तूर बुनियाद आहे नवा नाही आठ हजार रुपेये कबूल करणे म्हणऊन सेख सदू कैसे म्हणताती व तुम्ही कैसे आनमोदन देता हे कळत नाही गोतामधे जायास आम्ही रजावंत असतां पैकियाची लालुची धरून सेख सदू लाडियास महजर कैसे करून देऊ म्हणताती हे कैसे घडो पाहते जोरावारीने महजर करून देऊ म्हणतील तरी तुम्ही आपले हाती महजर न लिहिणे व चौऱ्याआसीचे व बलुते त्यावरी शाहिदी करावयास समध नाही सेख सदू कैसे महजर करितील जोरावारी करून तुम्हास माहजर ल्याहा म्हणतील तरी तुम्ही आम्ही भाऊ आहो वृत्तिवंताची नीति आहे की मार खावे बंदी पडावे परंतु येकाची वृत्तीवरी मेक उठो नये येसी भाऊपणाची

(चिकटविलेला फा. वा. शि.)

नीति तुम्हास व आम्हास उभयपक्षी आहे पाढरीवरी शत भीष्म होऊन गेले असतील सात पांचसें वरषे वतनावरी नाही तो आजी वतनावरी उभा राहिला म्हणिजे पाचसे वरषाचे वृत्तिवंत आसतील ते येकावरी येक उभे राहतील येसी गोस्टी आहे येसियास सेख सदूचे म्हणति यावरून तुम्ही व चौऱ्याआसीचे पाटील महजर करून न देणे तुमचे हस्ताक्षरे व चौऱ्याआसीचे पाटील दसखतेनिसी येक शाहिदीनामा करून देणे की कसबियाची पाटिलगी बुमीयार देसमुखाची आहे त्यावरून आम्ही व लांडा गोतामधे आगर हुजूर भाडत असून शाहिदीनामियावरी काजी मोहर करितील तरी बरे नाही तरी तुम्ही व चौऱ्याआसीचे पाटील मिलोन शाहिदीनामत करून देणे त्यावरून लाडा जेथे जाईल तेथे वाद सागोन कस

बियास देसमुख नावास पाटील आहो कसबियामधे आम्हास काये उत्पन्न आहे व तुम्हास काये उत्पन्न आहे हे आपले जागा समजणे. जो विचार कराल तो बहुत समजोन करणे बहुताच्या बऱ्याकरितां आम्ही भांडतो कलले पाहिजे

---

ले. ६१२ } { श. १६३८ मार्ग. शु.४
इ. १७१६ नोव्हे ७

श्री

वस्तिश्री राज्याभिषक शके ४३ दुर्मुख संवत्सरे मार्गसीर्श सुध चतुर्थी सौम्यवासरे क्षेत्रिये कुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपति स्वामी याणी राजश्री कृष्णाजी नाईक जोसी यासी आज्ञा केली यैसीजे रामाजी कान्हो देशपांडे पा। इंदापूर यावर तुम्हास वरात रुपये२००० दोन हजार दिल्ही त्यास शंकराजी वेदाजी जमान होऊन + तले दोन दिल्हे त्यापैकी सोलासे रुपये पावले +हा+च्यारसे रुपये राहिले ते रामाजी कान्हो यांस माफ केले आसेत तर तुम्हापासी शंकराजी वेदाजी यांचे खत आहे ते फिरोन देणे ४०० च्यारसे रुपयाचा तगादा न लावणे जाणिजे बहुत काये लिहिणे

बार सुरु सुद बार बार
असल बमोजीब नकल

---

ले. ६१३ } { श. १६४२आषाढ व. ७
इ. १७२० जुलै १५

कौलनामा राजश्री देसमूख व देशपांडे पा। इंदापूर ता। भिवजी नरसिंह माहाजन व (अस्पष्ट मराठी शिक्का) नारो नरसिंह त्रीगुळ मौजे च्याबली पा। मजकूर सु।। सन ११३० दादे कौलनामा यैसाजे तुमचे बाबे मोकदम मजकूर यानी येऊन आर्ज केला जे त्रिगुल मजकूर परागदा होऊन परमुलकास गेले आहेत त्याचा दिलासा करून गावावरी आणून मौजे मजकुरी पानमळे लावावयाची उमेद धरिताती आणि थोरले माहाराज राजश्री शाहाजी राजे भोसले यानी कौल दिल्हा होता त्याप्रमाणे चालविलिया त्रिगूल मजकूर मौजे मजकुरास येऊन पानमळे लावितील म्हणौन आर्ज केला बराये आर्ज खातिरेस आणून तुम्हास कौल दिल्हा आसे आपली खातीरजमा राखोन मौजे मजकुरास येऊन पानमलेयाची कीर्द करणे तुम्हास थोरले माहाराज यानी पेशजी कौल दिल्हा होता त्याप्रमाणे हालीही तुम्हास कौल दिल्हा आसे बीतपशील.

पाने विकितील त्या विकरियातील पाच त्रिगुलास खुडणी दर कुडतानास तांबोली

तक्सीमा तुमच्या साहावी तक्सीम सरकार कलम १

सरकारची जकाती तांबोल्यियापासून दर कुडतनास रुके ८६ कलम १

पानमालियात आंबे व चिंचा लागतील त्यास च्यार तक्सीमा रयेत पाचवी तक्सीम सरकार कलम १

गुन्हीयात हर जिनस अगर तरकारी होई + + तीस माफ असे कलम १

येरवी मलियात गीर्दन पर्इत ताटवा सभोवते लागतील त्यास दिवाण देणे नाही.

+ + वजनास हक दर कुडतनास उभे रासीस रुके ८६ साहा आहेत कलम १

लंग

यापासून रुपये ‑।‑ पावला घ्यावा कलम १

पानमलियात जुई जुई केले व निंबे हर जिनस तरकारी व झाडे लागतील त्यास दिवाणचा वाटा नाही कलम १

पानमलियासि गुन्ह जमीन बिघे ‑।१० तिसा पांडाने बिघ्याने द्यावी कलम १

पानाचे बीज गावी विकून वि ( करी ) करील त्यास सरकारचा वाटा नाही परगावी बीज विकील त्यास सरकारची सहावी तक्सीम वाटा द्या [ वा ] कलम १

त्रिगुलाची बैल मेला तरी कातडे महाराने द्यावे माघारीं कलम १

त्रिगुलाचे सरीम व चाकर जे आसतील त्यास सारा माफ कलम १

येणेप्रमाणे तुम्हास कौल दिल्हा असे ब्याज मलियाच्या गुन्हे क ट बा न दर बागास होन २।॥ पावणे तीन धाग द्यावा येणेप्रमाणे ( पुढील दोन ओळी अस्पष्ट ) येऊन पानमलियाची लावणी करून सुखरूप राहून आबादानी करणे येणेप्रमाणे माहाराज राजश्री स्वामीचाही तुम्हास कौल सादर आसे दरिबाब आसे रा छ १९ माहे रमजान. (वा.मो.)

---

ले. ६१४ } { श.१६४३ भाद्र. व.८ इ.१७२१ सप्टे ३

श्री

रा। रखमाजी बापोजी व त्रिंबक माणकेश्वर व रघोजी दामोधर देशपांडे प्रा। इंदापूर यासी धोंडाजी गोविंद व माहादाजी दाजी देशपांडे पा। मजकूर सु॥ हजार ११३१ कारणे कागद लेहून दिल्हा ऐसा जे पूर्वी आपल्या वडिलानीं शामराज नीलकठ रांजेकर

यास मौजे पलसदेव प्रा मार येथील गाव कुलकर्ण तुमचे त्यास दिल्हे औसीयास हाली राजश्री नागो दादाजी रोजेकर येऊन उभे राहिले त्यानी आपल्या वडिलाचे कागद दाखऊन आपल्यापासून मौजे मजकूरचे कुलकर्ण दरोबस्त तुमच्या हावाला केले आसे तरी तुम्ही ते कुलकर्ण खाणे जो पावेतो नागो दादाजी रोजेकर याजकडे मौजे मारचे कुलकण गुंतले आहे तो पावेता आपणास कसबे मजकूरच्या कुलकर्णास बोलावयास संमध नाही हाकदक घुगरी व कुलकर्णाचा मानपान तुम्ही खात जाणे तुमचे कुलकर्ण नागो दादाजीकडे गुंतले आहे ते तुमचे सोडून देऊ तेव्हा आपण कसबे मजकूरचे कुलकर्ण आपल्या विभागे करूं यास हिला हरकत करूं खोटे हे लिहिले सही कसबे मजकूरचे कुलकर्ण समाईक आहे म्हणौन तुमचे हावाला केले आसे हा कागद लेहून दिल्हा सही छ २१ जिलकाद

गोही

रायाजी पा सिगाडे
मौजे सलगाव
शामजी पा गौली
मौजे भाट निंबगाव

गोमाजी पा मौजे पलसदेव

सिवाजी चांगो कुलकर्णी
कसबे बावडे
सकाजी वेदाजी
आा देशमूख

लिंगोजी सोनदेव पा
मौजे निरगुडे
खंडोजी पाटील
मौजे भिगव्हाण
येसाजी पा
मौजे लाहावुर्णे
कुमाजी पा राणोजी पा
मौजे सेटफले हवेली

विटल आनंत सभासद हुजरात.

---

ले. ६१५ (मु. व सी. ले. ५९२ पो) श. १६४६ पौष शु. १४ / स. १७२४ डिसें. १८

श्री भार्गवराम

ाद मा अनाम देशपांडे पा इंदापूर यासी पंताजी सिवदेव सुहूरसन खमस आसरीन मया अलफ देशमुखीची मुतालकी राजश्री शंकराजी वेदाजी यांचे नावे होती ते मृत्य पावले या करितां देशमुखीचा मामला राजश्री माधवराव शंकर यांस हुजरून करार केला असे तरी तुम्ही व ते येकमते वर्तोन परगणाचा आमल करणे देशमुखीचा हकलाजिमा इनामती इसाफती कुल काइदे मानपान तश्रीफ देखील सुदामतप्रमाणे आमल राजश्री माधवराव शंकर यांकडे सुरलीत चालवणे जाणिजे छ १२ रविलाखर

सुरू सुद
पौ छ २१ रालाखर
शुा सन ११३४

---

ले. ६१६ } {इ. {श.

श्री शंकर

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री धोंडोपंत स्वामी गोसांवी यांस पो। यादव सामराज नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशेष राजश्री स्वामींनी इंदापूरची देशमुखी व पाटिलक्या व शेऱ्या या वतनांचे मुतालकी आम्हांस सांगितली आहे आठा।धरा दिवसांनी तिकडे येऊन भेटी होईल वर्तमान कलेली कागदपत्र राजमुद्रेचे सिद्ध करविले आहेती आम्ही येऊन तेव्हां घेऊन येऊन तूर्त राजश्री पंताजीपंताचे कागद पाठविले आहेत हे जिकडील तिकडे पावणे वरकड कितेक वर्तमान जानो सिवदेऊ याणी लिहिले आहे त्यावरून कलो येईल माणसे पाठविली आहेत यांस खर्चास देविले आहे त्याप्रो तुम्ही ताकीद करून पावणे बहुत काये लिहीणे लोभ आसो दीजे हे विनती

---

ले. ६१७ } {इ. {श.

( विकटविलेला फारशी शिक्का )

।। द श्री सकलगुणसवजन्य अखंडितलक्ष्मीआलकृत राजमानी राजश्री देशमुख व रा। देशपांडिये पा। इंदापूर गोसावी आसि स्नेहकीत कृष्णराउ हरकारे सा। जुनर कृतानेक सा। नमस्कार आनुक्रमे आसिरवाद विनती उपरी येथील क्षेम ता। छ २१ माहे जमादिलावल जाणऊनू तुम्ही आपले क्षेम कुशल लिहीत जाणे ( पुढील एक ओळ अस्पष्ट ) लिहीत नाही हे तुम्हापासून दूर गोष्ट आहे हाली रा। खंडोजी विठल आपले नायेब तेथ आहेत त्यानी लिहिले आहे की तुम्ही पातशाही कामास तन देत नाहीत तरी हे तुमच्या महस्तपनापासून दूर गोस्ट आहे जे जरूरी हकीकत असल तर आमचे नायेबास जाहीर करीत जाणे व बक्षी व सवानीगार याची कामकाजे आवघी चालविता आजी आमचे कामकाज आजी दोनी वरसे जाली की काही होत नाही यैसी तुमची शान नव्हे हाली रा। खंडोजी विठल तेथे आले आहेत जे सुदामद आपले मामूल आहे तेणे प्र ( पुढील दोन ओळी अगदीं अस्पष्ट) खट करितो तरी तो भला मनुश नव्हे आजी मुदती वीस वरसे जाली की मिर्जा आलीबेग यानी पातशास आर्ज करून सरकार जुनर दस्तक असालतन करून दिधली आम्ही काही कोन्हाचे नायेब नाही जैसे रा। भास्करराऊ व रा। वेंकटराऊ याची मकाने तैसी आमची मकाने आहेत त्यास काये पोहचते त्यास माकूल कीजे आनी त्यास दखल न देणे सनदे बमोजीब आमल कीजे रा। प्रतीतरायाची सनद आनील ते काये मजूर आहे हजुरी सनद आमची तागिरी आनील ते मजूर आपलीहि ताजी सनद आहिदी इंदापूरची आनविली आहे तेहि पधरा।विसा रोजा येऊन पोहोचल हे जागा आपली वतने खुलद मकान पातशाहा यानी दिध- ( ले ) आहेत सनद बमोजीब समजोण करणे रा। खंडोजीपताची हरयेक बाबे साहेता कीजे यास कोताई न कीजे आजी कामकाज आमचे चालविणे याहवि॰

येखतियार तुमचा आहे तुमची कर्म जे आहेत ते जाहीर आहेत दर गुजर ग्रहस्तपणे करजेती बहुत काये लिहिन हे विनती.

---

## मंगळूर-साटे

ले.६१८ } (फा. मु. व मज.) {श. १५०७ आश्विन व. ८ {स. १५८५ अक्टो. ६

कौलनामा आज दिवाण किले स्यादुर्ग ताा सर्जाराव मोकदम मौजे मंगळुर साा मारुणे (नु) द र बाब आकी सुाा सीत समानीन व तिसा माया तुम्हा बाबे मोकासाई मौजे माा इळेतमेसी केळे जे मौजे मजकुरीचे पाटीलगी तुम्ही बदलखरीदी कबूल केले असे साहेबाचा कौल किले माा होउनु सादर जाहालेया मौजे मजकुरास येउनु पाटेलगी व सचाणि करीन म्हणउन तारि बराइलतमेसी मोकासाही मौजे मजकुर खातिरेसी आणौन तुटमासी कौलनामा तकवेती सादीर केले अ(से)कोणे बाबे काही अदेसा न करिता किले मजकुरास येउनु अफळे हवाळ माळम कीजे तुझे ये इतमांम करून मौजे मजकुरीचे पाटिलगी करून गाव कीर्द मामुरी अबादानी कीजे छ २१ सौवाळ.

---

ले.६१९ } {श. {इ.

श्री समळगुणसदण राजश्री सर्जाराव साटे मोकदम मौजे मंगळुर प्रति मुधोजी बीस्वासराव देसमुख किळे स्यादुर्ग आसीर्वाद विनंति उपरी तुम्ही मौजे मजकुरीची माकदमी खरीद केली आहे तुम्हास किळाचा नैबगैबत साहेबांचा कौळ व मोकासाही मौजे मजकुरीचे त्यांचा कौळ पाठविळे आहेती त्या कौळावरून तुम्ही मौजे मजकुरास तूर्त येउन कीर्दमामुरी करिजे कोणे बाबे तालुक अंदेसा न करितां तु से (र्ह्री) मौजे मजकुरास येउन मोकदमी चाळवीजे सुखे असिजे हे विनंति

---

ले. ६२० } खर्डे-पीर {श. १५२६ कार्तिक शु. ६ {इ. १६०४ आक्टो. १८

(वा) राजश्री
येमाजी पत
गराव

अज रख्तखाने राजश्री पतगराऊ राजे दामदौलतहू बिजानेबु हुदेदारानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि मौजे (खरडे) ताा जाबखेड सुाा खमस अलफ सेख मुस्लीम वा इनामती जमीन मस्याखर्ता बाबा रमजान पीर मौजे मजकुरु हुजुरु येउनु मालूम केले जे इनाम चावर नीम भोकरपटी बाबती वाडीचा ग न + मौजे मजकुरु देखील नख्तयाती कुलबाब आहे भोगवटेयास + + + मलिक लालबरीचे खुर्दखत मठी· (ढी ?) मधे होते रख्तखाने इनाम + + गवटे याचे खुर्दखते गावात होती सन अर्बा मधे अता + + वा + + ग्रसनदअली मौजे मजकरास येउन गाव जालिला व लटिला ते

वेले साहेबाची खुर्दखते होती ते जलाली सालमजकुराकारणे खुर्दखत होये मालूम जाले सेख मुसलीम इनाम जहती मस्याखती बाबा मजकुरु पीरु मौजे मजकूरु इनाम जमीन (चावर) नीम भोकरपटी बाबतीवाडी चागनाक मौजे मजकूरु + + + नख्तयाती कुलबाब भोगवटा तसरुफाती + + + + ने इजानेबु मणास आणौनु जैस चालविले असेल त × × × वीजे दरहर साल खुर्दखताचा उजूर न कीजे ता (लीक घेऊ) नु असली इनामदार मजकुरापासि दीजे

(ब) मोर्त
ब सूद

तेरीख ४ माहे जमादिलाखरू
जमादिलाखर

---

ले. ६२१ } {श. १५२७ कार्तिक व. ६ / इ. १६०५ आक्टो. २३

( फा. शि. कंगोरेदार )

अज रखतखाने मा॥ हा॥ राजश्री जाधवराऊ राजे दाईमदौलतहू (बजा) नेबू हुदेदाराने हाल व इस्तकबाल व मोकदमाने मौजे खरडे (ता॥) जाबखेड सु॥ सीत अलफ सेख मुसलिम इनामती जहती + खती बाबा रमजानु पीर मौजे मजकूर हुजूर येउनु मालूम केले जे इनाम चावर नीम भोकरपटी बाबती वाडी चाग(नाक) र देखील नख्तयाती कुलबाब आहे हाली साहेबास मुकासा (अर्जानी) जाला आहे हक मन्हामती फर्माउनु खुर्दखत मन्हामती करावया रजा होये म्हणउनु मालूम जाले बराये मालुमाती खातिरेस आणौनु सेख मुसलीम इनामती जहती मशा × × × × × (बाबा रमजा) नु पीर मौजे मजकूर जमीन चावर नीम भोकरपटी + + + + चांगनाक दीधले असे कारकीर्द पतगराव भोगवटाचा (लिला अ) सेल तेणे [प्र] माणे चालो दीजे सालाबाद खुर्दखताचा + + + + असली इनामदार मजकुरापासि दीजे तालीक घेणे (फा. मो.)

तेरीख २० माहे जमादिलाखर
माहे जमादिलाखर

---

ले. ६२२ } {श. १५३१ माघ शु. ८ / स. १६१० जाने. २२

(वा) राजश्री
यमाजी पत
गराव

अज रख्तखाने राजश्री पतगराउ राजे दामदौलतहू बिजानेबु का (रकुना) नि हाल

व इस्तकबाल देसमुखानी तपे जाबखेड व ( हुदे ) दारानि मौजे खरडे तपे मा बिदानद

(वा) राजश्री — सुा आसर आलफ बा खुा मलिक अजम छ ७ माहे सौवाल सेख

बखतरा — मुसालिम खिजमतीगार रोजा बाबा रमजान हुजुर येउनु माल्म केले

व राजे — जे आपणासि इनाम जमीन चावर येक देखील माल सेत भिऊ मढीकर

दर सवाद मौजे म × × बा हुजर्ती सेख अबदुल चालिले आहे साहेबाचे खुर्दखत होये मा ( लूम ) जाले सेख मुसलीम खिजमतीगार बावा रमजान यासी इनाम जमीन चावर येक देखील माल सेत भिऊ मढीकर ( मढीकी ? ) दर सवाद मौजे मार बा हुजती सेख अबदुला मुकासाई सुासन सीत तिसैन तिसा मेया चालिले ( आसे ) ली तेणेप्रमाणे भोगवटा तसरुफाती पाहून चालविजे दर हर साल खुर्दखताचा उजूर न कीजे तुम्ही त लीक लेहोन घेउनु असली फिराउनु ( दीजे चा ) वर येक बा हुजती कदीम व भोगवटे व पतगराऊ व जाधवराऊ (कार) कीर्दीमधे चालिले असेली तैसे चालविजे व हजरती बुन्हान निजा ( मशा ) हाचे कारकीर्दीमधे चालिले असेली तेणेप्रमाणे चालविजे............... तालीक छ २९ साबान म्हणौनु सादर आहे येणेचिप्रमाणे भोगवटा व तसरफा चालिले असेली तेणेप्रमाणे चालविजे ( ष. मो. )

तेरीख ६

जिलकादी

---

ले. ६२३ — श. १६७३ फाल्गुन. शु. ७ / स. १७५२ फेब्रु. १०

श्री

( फा. वा. शि व फा. मजकूर )

रो बाबूराव बाबा खनसरे बादूर ठाणे का जामखडी

समापत्र शके १६७३ प्रजापती नाम सवतछरे फालगुण सुध ७ सोमवार ते दिवसी —या विदमाने नामाजी पाटील बिरादर मो स मियाखान मो व येकाजी प्रतापराव मो व बाबूराव देवाजी कुलकर्णी व नागोजी रागे भाये दादजी भुमकर पदाजी विसावे भिकाजी भुमकर सदरहु मौजे यली प्रा सेवगाऊ सुा सन ११६१ कारणे समापत्र लेहून दिधले येसी जे रो येकाजी प्रतापराव मो बहुत दिवस बाहेर होते त्यामुळे त्यासी व आपणासी कटकट जाली याजकरता अवघी पाढरी जामखेडास तुम्हापासी आलो त्यासी तुम्ही आमचे अवधियाचे येकचित करून दिधले याउपरि आपण पाढरी बतोलियास गेलो तो मागे भाऊ गावात होते याणी बाबत्याचे लाणे गावांत आणिले तर आपण तिघे भाऊ व पांढरी येकचित जाले येकचिते गांवावर नादु जर तुम्हासी कोन्ही कटकट करील तर आपण रो येमाजी प्रतापराऊ मो याचे ब्यापती ( साबुती ? ) येमाजी प्रतापराव गावावर नादतील तर आवघे पाढरी व आपण भाऊ नादो जर येकाजी प्रतापराव बाहेर राहिले तर तिघे भाऊ व पाढरी बाहेर राहू वडील

ज्या चालीने चालले ते चालीने चालोन पुढे नामाजी पा त्या माघ मियाखान मो त्या माग यमाजी प्रतापराव मो तिघाचे ती ठाई आसे आपल्याला हिशाप्रमाण आपलाले वतन खावे यासी काण्ही फितवा फादडा करील तो गोताचा आन्याई दिवाणाचा गुणगार हे लिहिले सही

निा नागर
[ नांगराचें चित्र ]
बिा बाबूराऊ देवजी कुलकर्णी
मौजे मार

---

ले.६२४ } { श. १५४९ चैत्र शुद्ध. २
इ. १६२७ मार्च ९

(कांहीं ओळी फारसी मजकूर)

द कारकुनानी मामले रायेर मालूम दानद सुा सबा अशरिन अलफ छ २२ जा खर हा केली. रा छ१ रजब मजमून गुजनमावल पा मुरंबदेऊ मुजाफती मामले मा येथील देशमुर्खी हैबतराउ कान्होजी व हाबाजी हैबतराउ चचेरभाइ हकाबदल भांडत हर दोघाचे करकरे निमित्य जमेती करून ता मा तसवीस देउन खराब केला मुदा खातिरेस आणितां गोतास राजी जाले. हरणसखोरा उभे राहणे देशमुख निवाडा करतील त्यास यावर कान्होजीनी यासमयी दोन कमीन जागा मौजे आंबवणे ता मा येथे राहत होता तेथे येउन अर्जोजी देशमुख गंभीरराव व हाबाजी देशमुख ता मुठेखोरे याहाती कमिनास सांगोन पाठविले कीं रोहिडेकर देशमुख आपणास जिवाचे जमान होतील तरी आपण हरणस खोरियास जाइन नाही तरी नव जाय ऐसे बोलोन मुरंबदेव तोरणे मुा किले कोंढाणा ते वाट धरिली ऐसा खटला सदरहू दोघी सांगितला यावरी कान्होजी मा जमेतीचे जोरे कमिनाचा दिवटिया नुकसान केला गंभीररायाचे माणूस तीन पोटावरी हाणोन पाडिले. जरूर वाचतील कान्होजीने डोंगर धरिला कमीन आंबोणियास येउन अर्दास व महजर रा केला यावर कमीन हरणसखोरियास जाउन तेथे कृष्णाजी बांदल जमेतीसी भेटला कौल व फर्मानाची व शर्तीची बळकटी करून रायाजी व बालाजी व सूर्याजी व हाबाजी हैबतराउ कमिनाबराबरी देउनु आपली जमेती देउनु ता गुजनमावल तेथे आणिले एका दो गांवाचे कुणबी त्यास भेटविले साहेबी बाबाजी व रायाजी याजकडे नाइकजी याचे नावे फर्मान कौल व लुगडी सादर केली पाहिजेती हे ना दौलतरखाह असती हली कान्होजी मा मुरंबदेउ व तोरणा मुा किले कोंढाणाचे वाडीस माणूस ठेउन आपणहीं तेथेच राहोन छ १२ रोजी मौजे आसनीमार्गे ता मा तेथील मोकदम दस्त करून नेवनु त्यास बोलिला कीं आपण बाहेर पडिली तुम्हा कैसे रहाल ? ऐसे रयेतीस तसवीस देउन हरामखोरी करितो त्यास मदती रोहिडेकर देशमूख देतो व आसरा किले मुरंबदेउ व तोरणा अगर कानद खोरेचे देशमूख व देसकुलकर्णी देतो तरी सदरहूचे नाव ताकीद लिहिली पाहिजे कान्होजीचे

घाके रयेती परागंदा होताती म्हणून हे हकीकती ता बा लिहिली तरी जो अदिकारी मा मामले मा वरी येउनु कीर्द मामुरी व दिलासा काम करितो त्यास कौलच आहे तुम्हीही दिलासा करून मामुरीस तकसीर न कीजे व जो अधिकारी बाहेर पडिला आहे त्यासही समेतेस मालूम करून आपले जागा संगिनाती राहोन व अधिकारी मास पाल्ती लावून दस्त कीजे व जेही आसरा दिधला आहे त्यास ताकीद लिहिली असे व हाबाजी हैबतराउ व बाळाजी नाईक व कान्होजीचे सगेभाई रायाजी व सूर्याजी यास आणावयास हरणसखोरियास गेला. कृष्णाजी बांदल देशमुख ता हिरडसमावल या नजीक होते तो बराबरी आपले जमेतीने आला सदरहूजण कौलाची बलकटी करून दिधली त्यास तश्रीफ होन पाच बा खासा कृष्णाजी बांदलास शाल येक व विश्वासराव हेजीब शेला येक येकून व होन येणेप्रमाणे देउन सदरहू चौघास घेउन आलो म्हणौन लिहिले तरी तुमचे नजेरेस दौलतखाही पडेल ते कीजे व कमिने बाबाजी व रायाजी व बाळाजीस फर्माविले की ता मा सरखोत व रयेती आणोन मामुरी होय ते करणे यावर सरखोत व मोकदम होते ते माणूस पाठवून रयेतीचा मुदा लेहोन दिधला जे रयेतीचा मुदा समाजाकरणे लागले ढेप उगवणी घेउन तेजीपटी उलफेपटी सालमा तकूब केली पाहिजे म्हणौन मुदा कमिने मामुरी-बदल मुदेप्रमाणे कौल पाठविले यावरी तेही सरखोत येसजी व मोकदम पारवडी व मोकदम मंडजाआसनी व मोकदम कुरंगवडीं सदरहूजण भेटविले कमीने दिलासा करून बहुडविले पेस्तर जे येतील ते लेहो म्हणून लिहिले तरी तुम्ही महालीचे कारकून आहा रयेतीचा दिलासा करुनु कौल देउनु मामुरी कीजे नुकसान हो ने दीजे. तेजीपटी उलफपटी झडतीसी उगवणी कीजे व ता गुजनमावलीचे बाबे मोहबतखान व आ (ब) तुला कोके याचे कारकुनी आर्दास रवाना केली आहे म्हणौन लिहिले तरी हुजरून पा जालिया-वरी माकुल हाल असेल ते सरजामी होईल व ता मा कमीने राहावे तरी जागा जागाचे काम खोलंबते म्हणोन तरी घाट तरफेस स्वारी करून जाउन तेथे सिस्त सनद दस्त आली पाहिजे म्हणौन लिहिले तरी तमाम सिस्त झाडा झडती करून तपसील खबर हुजूर लिहिणे मोर्तबसूद.

रुजु सुरनिवीस

तेरीख माहे रजब रुजु

---

ले. ६२५ } { श. १५४५ मार्ग. शु. ५
{ इ. १६२३ नोव्हें. १६

श्री

नकल

सिदी आबर हावालदार किले कोंढाणा

खरीदखत सके १५४५ मार्गस्वर शुध पचमी गुरुवार तदिनी लेहून दिल्हे जे भिकाजी बिन नाईकजी ढिमला मौजे सिवर व मौजे कल्याण ता खेडेबारे यासी तानजी बिन

कृष्णाजी डिमला मौजे कल्याण आतमसुखे लेहून दिल्हे जे आपल्या वडिली सागितले म्हणून तुम्हासी मोकदमीबदल भाडिलो परतु आपल्यास मूलपुरविसी होत नाही आपन तुमचे बुडीचे नव्हे आपला वैश आगोदर कदमाकडील आहे परतु ते दिगुली ? कुडी येके आहो सबब आपली आजी गोंडाई हिजपासून काही बाद आमल जाला होता ते समई राजकात मुल परागदा जाहली तो गजाहातून ? आपला बाप जाला त्याचे वौसीस आपण आपलियास वतन नाही आणि आपले कुलीसही बोल लागला वडिली सागितले ऐसे केले होते त्याजवरून भाडत होतो परतु ठाणियास खोटा जालो येविसी गुन्हेगारी आपणापासून घेतली या उपर तुमचे वतन खरे आपण खोटा जालो आपनास मुकदमीसी आर्थाआर्थी समध नाही हे आजित खत लेहून दिल्हे सही

कानजी नाईक देशमुख ता मजकूर

बापूजी मुदगल देशकुलकर्णी ता मजकूर

गोही

| | | |
|---|---|---|
| चिटोजी मोकदम मौजे राहाटड | रखमाजी मोकदम मौजे आर्वी | बाबाजी मोकदम मौजे राजे |

मोकदम मौजे कुसगाऊ

| | |
|---|---|
| रखम सुतार | खंड वरटा |
| १ | १ |

खंडनाक वृतीकार

---

ले. ६२६ } {श. १५५३ इ. १६३१–३२

श्री

आसल मोजब नकल

अज रख्तखाने राजश्री सिवाजी राजे दामदौलतहू बजानिबा कारकुनानी हाल व इस्तकबाल ता खेडेबारे सुा इसने सलासीन अलफ दरीविले देशमुख तो मजकूर हुजूर येऊन मालूम केले जे आपला हक ता मजकुरी गावगना चालत होता हाली साहेबी हुजूर हुकमी अमानत करून खड मख्ता करार केला या बरहुकूम घेऊन आसावे म्हणोन हुकूम हुकमाबरहुकूम चालिलो पेस्तर या बरहुकूम राहावे तो गुदरानी होइना सुदामत चालिल्याबरहुकूम जमीदार मजकुरावरी नजर देऊन दरीबाबा नजर ऐनायेत फर्माऊन दुमाले करावया हुकूम होये बिनाबरा इलतमेसी खातिरेसी आणून देशमुख ता मजकूर यासी गावगना हाकदार करार करून दिल्हा बिता

नख्त दर सदे रु ३      गला कैली दर सदे ८=

येकूण रुा तीन व गला दोन मण हार जिनस सालाबाद तसरुफात चालिली आसिली तेणे-प्रमाणे दुमाले करणे दरम्याने तसरुफा तुटालियाचा उजूर न करणे सदरहू दर हरसाल-ताजिया खुर्दखताचा उजूर न करणे तालीक लेहोन घेऊन आसली खुर्दखत जमीदार मजकुरापासी फिरोन देणे सदरहूप्रमाणे हाक दुमाले करणे मोर्तबसुद ( मोर्तब आसल पत्री आहे )

रुजू सुरुनवीस

---

ले. ६२७ } { श. १५६९ पौष व. ७ इ. १६४८ जाने ६

आसल बरहुकूम नकल

आज रख्तखाने राजश्री सिवाजी राजे दामदौलतहू बज्यानेब हुजूर कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी व देशकुलकर्णियानी ताा खेडेबारे बिदानद सुा सन समान आरबा ( इ ) न आलफ दरीविले भिकाजी बिन सूर्याजी डिमले मो मौजे सिवरे व मौजे क(ल्याण) सेकिन ताा मजकूर हुजूर येऊन मालूम केले जे आपणास मोकदमीचे इनाम जमीन बिघे १२ बारा दर सवाद मौजे कल्याण ताा मजकूर देखील नाख्तियापटी व बाजे बाब व पायपोसीपटिया हाल व पेस्तर व महसूल कुलबाब व कुलकानू सालाबाद व या खेरीज ताा मारी गावगना हाक दर सवाद मौजे माारास नख्त रुा १ एक व गला बारावा मण १ येक येणेप्रो बरहुकुम खुरदखत माहाराज साहेब चालिले दरम्यान आपण परागंदा होऊन गेलो होतो या करिता हाक चालिला नाही व इनामतीचे सेत नाकीर्द पडीत होते याबदल आपण हुजूर जाऊन माहाराज साहेबाचे खुर्दखत आणिले आहे सदरहू इनामतीचे सेत हाली साल माराकारणे किर्दी जाल्या आहे माहाली कारकून ताजिया खुर्दखताचा उजूर कारिताती दरीबाब नजर ऐनायत फरमाऊन दुमाले करावयास हुकूम होये बिनाबरा इल्तमेसी खातिरेस आणून भिकाजी बिन सूर्याजी डिमला मो सेकिन मौजे मार यास इनाम जमीन बिघे १२ बारा दर सवाद मौजे कल्याण व तरफ मारी गावगना हाक दर सवाद रुा १ यक गला केली बरोल मण ०१ यक ताा मारी सालाबाद तसरुफती चालिली आसल तेणे प्रो दुमाल करण दरमियान परागदा जाला म्हणौन तसरुफाती तुटालियाचा उजूर न करणे दरसाल ताजिया खुर्दखताचा उजूर न करणे तालीक लेहून घेऊन आसली खुर्दखत इनामदार मारापासी फिराऊन देणे सदरहु हाक व इनाम सारा दुमाल करण उजूर न करणे मोर्तब

रुजू सुरुनीस

तेरीख २० माहे जिल्हेज सुरु सुद

जिल्हेज

---

ले. ६२८ } {श. १५९५ पौष शु. ९ {इ. १६७६ जाने. ६

श्री

मशहुरल हजरत राजश्री माहादाजी सामराज सुभेदार व कारकून सुभात प्रा मावले प्रती राजश्री सिवाजी राजे दडवत सुा आर्बा सबईन अलफ सूर्याजी बिन भिकाजी (अ) + + + पाटील मोकदम मौजे सिवरे ताा खेडेबारे हे हुजूर येऊन अर्ज केला बाजी जाधव की ताा मजकुरी अपला सरपाटिल्कीचा ह [क] पुरातन आहे त्यास निरतर चिमणाजी बापूजी × × ले व पाटिलकीचा हक्क चालिला नाही त्यावरून हे हुजूर येऊन अर्ज केला साहेबी मेहरबान होऊन व सेरीकरावर नजर देऊन सरपाटिलकीचा हक याजबदल माहराजानी आपले खुर्दखत देऊन पुरातन हक आहे चालवायास आज्ञा केली त्यास ताा मजकुरी दरगावास येणेप्रमाण बिता

| खुर्दा टके | गला कैली | तूप | कोंबडे |
|---|---|---|---|
| १ | ८१ | ८८१ | १ |

येणेप्रमाणे सरपाटिलकीचा हक ताा मजकुरी आहे तो मुदामत पावे ते गोष्ट करणे जाणिजे छ ७ सवाले (ष) मोर्तब।

सुद

---

ले. ६२९ } {श. १६६२ मार्ग. व १३ {इ. १७४० डिसें. ५

श्री

साँ श्री मोकदम देहाये ताा खेडेबारे यांसी देशमुख व देशपाडे ताा मजकूर सुहूर सन इहिदे बिंन मया अलफ मल्हारजी बिन सूर्याजी पाटील डिमले मोकदम मौजे सिवरे व सरपाटील ताा मजकूर यांचा सरपाटिल्कीचा हक गांवगना दर गावास खुर्दा टका १ तूप मापी ८८१ येक सेर व गला ८१ येक मण व कोंबडे १ येक येणेप्रमाणे आहे तो गावगना वसूल ज्याचा त्याणी घ्यावा येविसी राजश्री पंत सचीव यांची आज्ञापत्रे सादर आहेत तरी सदरहूप्रमाणे हक वसूल देणे गावगना बिा

| | | | |
|---|---|---|---|
| १ मौजे कल्याण | १ मौजे कोंढणपूर | १ मौजे राहाटवडे | १ मौजे रांजे |
| १ मौजे आरवी | १ मौजे गाउडदरे | १ मौजे ससेवाडी | १ मौजे सिंदेवाडी |
| १ मौजे गोगलवाडी | १ मौजे वेळू | १ मौजे कासुर्डी | १ मौजे वरवे सोंडकर |
| १ मौजे बरवे भोर्डा | १ मौजे कुसगांव | १ मौजे खोपी | १ मौजे कांजले |
| १ कोा खेड | १ मौजे सिवरे | १ मौजे साळवडे | — |
| | | | १९ |

† पत्र शिवकालीन असून अक्षर पेशवाईच्या मध्यकाळास जुळणारें आहे.

येकूण येकूणीस गावीचा हक दर गावास सदरहू + + णे देणे छ २६ रमजान

(बा) मोर्तब सुद (अ) मोर्तब सुद

---

## पोढोढि–पाटील.

ले. ६३० } { श.१५५३ चैत्र शु. १ इ. १६३१ मार्च २३

न. बा आसल

देसमुख व गोत किले फतेमंगल किळे मजकूर बिदस्तूर बिसाजी रगनाथ देसकुलकरणी किले मजकूर

येसा बिन बालाजी येमाजी मोकदम मौजे कलस
येस पाा मोकदम मौजे + + फल गडे
बहारजी मोकदम मौजे सेलगाऊ

बाबाजी बिन मगाजी जाखोजी मोकदम मौजे आकोल
रामाजी मोकदम मौजे पळसदेऊ
सभाजी व यमाजी मोकदम मौजे निरगडे
मालजी व बाहिरजी मो मौजे लाकडी
जानोजी व बाबाजी मोकदम मौजे काझड

किले मजकूर सुाा इहिदे सलासीन आलफ श्री सके १५५३ प्रजापतिनाम सवछरे चैत्र सुध प्रतिपदा ते दिवसी महजर जाला येसाजे राघोजी पाा आटोळे यासि संत पाटलि बिन बिमनाक मोकदम मौजे पोढोडि किले मजकूर लेहून दिल्हा यैसे जे आपण उपावासी मरू लागलो भोई पडलो बहुत बेहाल जाला याकारिता मौजे मजकुरीची मोकदमी सारी काली व पाढरी तुम्हास विकत दिधली किाा होन ६'५ पासस्टा धारण करून तुम्ही आम्हास पैके दिधले आपण तुम्हास मौजे मजकूरची मोकदमी सारी काली व पाढरी कुलबाब हाकलाजिमा व मान मानणुक तमाम मोकदमी तुम्हास लेकराचे लेकरी मिरासी करून दिधली आहे तुम्ही सुखे खाऊन आसणे आजपासून मौजे मजकूरचे मोकदमीस व आपणास काही समध नाही तुमची मोकदमी तुम्ही लेकराचे लेकरी खा [ ऊ ]न सुखे आसिजे यासि कोन्ही आपला बाप भाऊबंद जे गोत्रीज कोन्ही उभा राहील त्यास आपण निवारून हा महजर सही

---

ले. ६३१ } {श. १५५७ भाद्र. शु. १२ | इ. ३१६३५ सप्टें. १३

स्वस्तिश्री शके१५५७निवादपत्र वरसे ईवनाम सवत्सरे भाद्रपद सुद द्वादसी आदितवार ते दिनी आखंडितलक्ष्मुमीप्रसन्न देवब्राह्मणप्रतिपालक माहामेरू राजेश्री माहादो पंडित देश-कुलकर्णी तपे वालवे गोसावी यांसी आश्रीत ब्राह्मणसभा विडभट जोतीसी ता जनार्दन भट तालालभट आध्यापक ता विस्वनाथभट तो मंगलवेढे ता शंकराजीपंत मजमदार ता कापिलाजी मुतालीक कुलकर्णी समस्त ब्राह्मणसभा को भिलोडी अनेक आशीर्वाद व नमस्कार विनंति उपरी गोसावी यानी पत्र पाठविले आंतकरणासी आले तेथे मजकूर जे उपाधे नरसिंह भट ता संभुभट या क्षेत्रासी पाठविले जे विस्वनाथभट कसबे मजकूर त्यासी व या उभा येतासी कसबे सोरटीचे जोतीसी व उपाधीकविसी यासि बेव्हार आसे तर विस्वनाथ भट गोसी भटचे पुत्र म्हणताती येसे मनास आणून धर्मता लेहून पाठविजे म्हणऊन लिहिले तरी विस्वनाथ भटासी बोलाऊन उत्तर फक्त केले त्यानी आपणापासी एक पत्र होते को कुर्दवडे क्षेत्री ब्राह्मण सभेने निर्णयो केला आसे ते पत्र आणून दाखविले त्यामधे लिहिले आसे जे विस्वनाथभट बिन गोसीभट म्हणऊन पत्र आसे यासि नरसिहभट बिन कालमभट व सुरेभट बिन रामेश्वरभटी लेहून दिल्हे आसे जे आपणासी विस्वनाथ भटाचे गोत्र पुरुस व डाईज येसे स्थल जाहाले जे मौजे सिरटी व मौजे हासूर हे दोहीं गावचे जोतिसी व उपाधीक व आस्ट आधिकार चालऊ तुमचे अर्धे वाटेचे प्रातिवरसी प्रताप देऊ उक्ता देत जाऊं आमचे तकसीम आम्ही आचाल म्हणऊन पत्र लेहून दिले आसे येसे

---

## बोरी-पाटील

ले. ६३२ } {श. १५६१ श्रावण व. ५ | इ. १६३९ आगष्ट ८

महजर बतेरीख छ १६ रबिलोबल हाजीर मज्यालसी पा इदापूर

| | | |
|---|---|---|
| देशमुख प्रा मार मगाजी । येमाजी | गोदजी मोकदम मौजे से-लगाऊ | मालजी मोक दाम मौजे ला-कडी |
| लिंगोजी मोकदम मौ जे जाबू | जाखोजी व सिदोजी मो | चौंडाजी व लिंगोजी मो-कदम मौजे |

मौजे चिखली कुरबावीकर
दाहिगाव
खंडोजी मो
मौजे वरकुटे

श्री सके १५६१ विक्रम नाम संवछरे श्रावण वदि पंचमी ते दिवसी महजर जाला ऐसा जे मौजे बोरी कुल खराब पडिली होती याजवरी कारकिर्दी राजश्री खेलोजी भोसले विलाइतीच्या मोकदमी घेत होते मौजे बोरीची मोकदमी राजश्री खेलोजी भोसले मागत होते याजवरी देशमुखानी व कुल्कर्णियानी बिरोजी मोकदम मौजे लासुरणे व बोरीचे मोकदम बापभाऊ म्हणौनू बोलिले त्याजवरी खेलोजी राजे घोडी मागताती ती देऊन मोकदमी सोडवणे मोकदमी तुज दिधली तुवा करणे याजवरी मिरासीदार मोकदम उभा राहिला आणि दंददावा करूं लागले बिरोजीने लावणी केली होती गावीचा रोझामोझा पडिला व गांव खराब पडला याजवरी मिर्जा यासी मोकासा जाला त्यानी बोरीची लावणी बदल धावणी करून गांव मारून चिंधीचोला केला गुरेढोरे नेता हर दो जणामध्ये कवावत जाली दिवाणचे लोक जखमी जाली घोडा येक पडला बिरोजी गांव खराब करून बाहेर पडला याजवरी सदरहू मज्यालसे मिलोन मिर्जा साहेबास घोडा येक व होन १० देऊन समजावीस करून कौल देविला सदरहू कचाट बोरीचे मोकदमीबदल जाले याजबदल सदरहु गोत मजालसी मिलोन निवाडा केला की मिरासी मोकदम तोडू नये व बिरोजीचा माल वेचक आहे मोकदमी राखिली आहे त्यास तोहो तोडिता नये मग हर दो जणासी मोकदमी काली व पाढरी दोघानी दोठाई खाऊन सुखे असणे लेकराचे लेकरी मिरासी करून दिली आहे निमे गाव येलोजी व जबाजी वागमोडे याचा व निमे मउ बिरोजी पाव दिवाणातलि तश्रीफ येईल ते दो ठाई दोघानी ध्यावी वाटून व नागर आधी येलदोजी व जबाजी व मागे बिरोजी येणेप्रा हकलाजिमे मोकदमी काली व पांढरी दोठाई खाणे सदरहुप्रा निवाडा जाहाला असे जो कोण्ही हिला हरकती करील तो दिवाणचा गुन्हेगार व गोताचा अन्याई हा महजर लिहिला सही

———

## राहाटवडे–चोरघे

ले. ६३३ } { श. १५६० मार्ग. शु. ७
इ. १६३८ डिसें. २

श्री

नकला

अज रख्तखाने राजश्री सिवाजी राजे दामदौलतहू जानीब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी व देकुल्कर्णियानी ता खेडेबारे बिदानद के सुहूर सन तिसा सलासीन अलफ दारीविले चिठोजी बिन रामजी चोरघा मोकदम मोजे राहाटवडे ता मजकूर

हुजूर येऊन मालूम केले जे मौजे मजकूरची मोकदमी वाडिलपण आपले असतां आपला बिराजर भाऊ कान्होजी बिन सिवजी चोरघा हा धाकटा असोन पोटी संतान नाही अणी मफलीस पोटाकारणे दिवाणचे कर्ज होन पंचवीस खादले आहेत ते द्यावयास मवसर नाही म्हणोन बळेंच राजश्री दादाजीपंत याजपासी फिर्याद केली जे मौजे मजकुरी आपला मोकदमीचा वाटा आहे तो दिवाणांत ठेऊन कर्ज वारून घेणे ऐसा करार केला असता कान्होजी मजकूर याचे निसबतीचे कर्ज वारावयास आपण हुजीर जालो ऐसे असोन बळंच पंतसाहेबी इनामांत विहीर बांधोन मोकदमीचे इनाम वाहिले त्यावरी आपण गाव टाकून परागंदा होऊन गेलों ये बाबे राजश्री बापूजी मुद्गल देशकुलकर्णी ता। मजकूर यांनी राजश्री पंतसाहेब पासी अर्ज करून आपणास कौल देऊन गावावरी आणिले दिवाणचे कर्ज कान्होजी मजकूर याचे निसबतीचे होते ते आपणाकडून वारविले मोकदमीचा भोगवटा तों सालाबाद चालिला आहे दरम्याने दहशतीकरितां परागंदा जालों होतों म्हणऊन माहाली कारकून ताजिया खुर्देखताचा उजूर करितात दरीबाब नजर इनायत फर्माऊन दुमाले करावयास हुकूम होये बिनाबरा इलतमेसी खातिरेस अणोन चिटोजी बिन रामजी चोरघा मोकदम मौजे मजकूर सालाबाद मोकदमीचा भोगवटा वडिलपण चालिले असेल तेणेप्रमाणें दुमाला करणे दरम्याने तसरुफाती तुटालियाचा उजूर न करणे देखील मोकदमी इनाम सेतसारा दुमाला करणे तालीक लेहोन घेऊन असल खुर्देखत मोकदम मजकुरापासी फिराऊन देणे उजूर न करणे मोर्तब सुद

रुजू सुरु
निवीस

तेरीख ६ माहे शाबान
शाबान सुरु सुद

शके १५६० सुा। तिसा सलासीन आलफ बहुधान्य नाम सवसरे १

---

ले. ६३४ } {शा. इ.

श्री

+ + तावजी पा। आपले मूळ पुरुष कान्होजी चोरघा मौजे वागणी येथून दोघे लेक व आपण मौजे राहाटेड सोयेऱ्याच्या गावी निघोन आले त्याचे लेक थोर होते त्याची नाव हरजी व बालाजी तिघेजण निघोन आले मौजे राहाटवडे येथे आल्यावर त्यास तिघे पुत्र जाले त्यातून वडील पुत्र सभाजी त्याच्या पाठीमागे तान्हाजी त्याचे पाठीमागे रामजी तो मौजे राहाटवडे येथील मोकदमाचा जावाई होता त्यावर काही दिवसानी माहादजी भणगा बेदरचे पत्र आले की मोकदमास घेऊन येणे म्हणोन पत्र आले ते वेळेस मोकदम भणगे पा। याने आपल्या भावाबदास सागितले जे सरकारात जाऊन जाबसाल करणे

---

१ याची दुसरी एक नकल आहे तिचे माथ्यावर 'सिका' असें लिहिलें आहे. तिजवर 'शके १५६०' वगैरे मजकूर नाही. हा गांव पुढे नाना फडणिसाचे खाजगीकडे होता.

तेव्हा गावानी उतर केले जे आम्ही जात नाही तेव्हा भणगे पाटील मोकदमाने आपला जावई रामजी चोरघा यास लेक म्हणोन पाठविला तेव्हा बेदरचे पातशाहाने रामजी पा चोरघा याच्या नावची [ स ] नद करून दिल्हे यावर भणग्याचे व चव्हाणाचे येसे दोनी हिस आनभावीत चालत तेव्हा रामजीने आपला भाऊ कोण्ही चोरघा यास चव्हाणाचा हिसा च्यार दिवस खावयास दिल्हे त्यावर काही दिवसानी रामजीने आपला हिसा दिल्हे होता तो मागू लागला तेव्हा काणोजी चोरघा व भणगा व चवाण ऐसे मिलोन सिवाजी राजे याजपासी फिर्याद जाले जे आमचे वतन असता रामजी चोरघा आनभावितो म्हणोन विदित केले तेव्हा सिवाजी राजे यानी न्याये मनास आणू लागले तो दादाजी कोंडदेव यानी रामजी चोरघा जिवे मारिला त्यावर काही दिवस मौजे राहाटवड येथील वतन सरकारातून आनभावित चालले आण तेथे विहीर व बाग सपाई केली नतर रामजी चोरघा याचा लेक चिठोजी सिवाजी राजे यापासी फिर्याद जाल जे माझे वतन नसतातुम्ही माझा बाप रामजी का मारिले ऐसे बोलो लागला तेव्हा सिवाजी राजे यानी न्याये मनास आणून विठूजी रामजीचा लेक याचे हवाली ( अपूर्ण )

---

ले. ६३५ } ( पहिला भाग गहाळ ) { श. १५७६ / इ. १६५४

सुा खमस खमसैन अलफ कारणे महजर केला ऐसाजे मौजे राहटवडे ताा खेडेबारे येथील मोकदमीच्या तरफा दोन त्यामध्यें येक तरफ चिटोजी बिन रामजी चोरघा याची येक तरफ कान्होजी बिन सिवजी चोरघा याची हरदोजण चालवीत असता कान्होजी मार याचे तर्फेची लावणी होईना कान्होजी मजकुर कर्जदार जाला व दिवाणचेही लचा केले यामुले राजश्री दादाजी कोंडदेव सुभेदार नामजाद किले कोंढाणा याणी कान्होजी मार याची तर्फ दिवाणात घातली यामुले चिटोजी मजकूर परागंदा जाहाला होता येबाबे राजश्री बापूजी मुदगल देशकुलकर्णी याणी दिवाणात रदबदली करून चिटोजी मजकूर यासी कौल देऊन गावावरी आणिला कान्होजी मार याचे निसबतीचे दिवाणचे कर्ज वगैरे कर्ज चिटोजी मार याणे वारिले कान्होजी मार यासी द्यावयासी मवसर नाही म्हणून आपले निसबतीची निम मोकदमीच्या ताक्षिमा दोन पैकी येक तकसीम चिटोजी मार याचें दुमाला केली येक तक्षीम आपलियासी राहिली कान्जी मार याचे निसबतीचे भाऊबद याणी चिटोजी मार यासी कजिया करावयासि समध नाही चिटोजीा बिन रामजी चोरघा याची तकसीम मौजे मारची निमे मोकदमी व कान्होजी मार याचे निमेपैकी तकसीमा येक येकूण तकसीमा तीन चिटोजी मार याणे खाव्या व कान्होजी मार याणे तकसी (म) येक चौथाई खावी वडीलपण नाव नागर होळीस पोळी दिवाणातून लुगडी येतील ती चिटोजीने घ्यावी हाकलाजिमा पान पोफळी जे येईल ते आधी चिटोजी मार याणे घ्यावे येणेप्रमाणे निवडले आसे कान्होजीचे निमे मोकदमीपैकी तकसीम येक चिटोजी मारास

दिधली आसे व येक तकसीम कान्होजी मार याणे खावी या खेरीज चिटोजीचे निसबतीची निमे मोकदमी चिटोजीने खावी येकूण तीन तकसिमा चिटोजी मजकूर याच्या व येक तकसीम कान्होजी मार याची मोकदमीचे हक उतपन व पानमान व दिवाणची ताश्रिफा नाव नागर व होळीची पोळी व टिला विडा चिटोजीने घ्यावा व किरकोल हक लाजिमा आर्धा चिटोजीने घ्यावा मागे कान्होजीने घ्यावे येणेप्रमाणे निवडले आसे हे जो कोणी मोडील तो दिवाणाचा गुन्हेगार गोताचा खोटा हा महजर सही

---

## कोढीत—बडधे

ले. ६३६ | श. १५६४ ज्येष्ठ व. १४
इ. १६४२ जून १६

श्री

बेहुजूर बेदरशाह हवालदार सिका असे तालीक

श्री शके १५६४ चित्रभानुनाम संवत्छरे जेष्ट वद्य १४ ब्रहस्फवार ते दिनी सूर्याजी बिन दाद पाटील बडधे मोकदम निमे मौजे कोढीत कर्यात सासवड यासी सूर्याजी बिन माहाद पाटील जरडे मोकदम निमे व समस्त जरंडे मौजे मार सुा सलास आर्बैन आलफ कारणे लेहून दिल्हे यैसा जे तुम्ही व आपण मिळोन पेशजी गाउ संचणी उगवणी येकवटे करून दोघे सुखे होतो त्यावरी दरमेन दोघा वर्गास न पडेसे जाले मग गावीच्या तर्फा दोनी करून दोघानी वाटून घेऊन होतो तो तर्फा जालियावरी संचणी उगवणी नव्हेच जमीन काळी व बरड माळ वाटिता नयेच कुळडाळ येक येक तर्फेकडे अधिक उणे होऊ लागले यावरी आपण गाव टाकून परमुलकास गेलो यावरी तुम्हास साहेबाचा कौल देशमुखाचा कौल पाठविला तुम्ही मौजे नाझरे प्रा सुपे तेथे आलेस मग साहेब व देशमुख व आपण ऐसे मौजे नाझरे प्रा सुपेस आलो तुमची समजावीश केली तुम्ही व आपण दोघे ये [ क ] होऊन पेशजी तर्फा दोनी केल्या त्या दूर करून ......तुम्ही आम्ही येक होऊन गाऊ दोघे मिळून येकवर संचणी उगवणी करावी दोघी गंगाजळ होऊन आसावे पेशजी तर्फाचे कागदपत्र तुम्हापासी व आपणापासी आसतील तितुके कागद रदी असती येणे प्रो दोघे सुखे आसोन जरी काही हिला हरकती करू तरी साहेबाचे गुन्हेगार गोताचे अन्याई हे लिहिले सही मोर्तब आसे नागर आसे

गोही

| | |
|---|---|
| बाजी तावजी देशमुख | जानोजी बिन सोनाजी मोकदम |
| का सासवड | व सिताजी खळदकर व दाऊ माळी |
| सिका आसे | मेहत्रा मौजे खळद बुा |
| हिरोजी मापरा मोकदम | सोनजी भाडळा जथे राहुजी |
| मौजे नाझरे प्रो सुपे | नाइकवाडी का सासवड |

रतननाक तुकनाक जथे नायकवाडी का सासवड
बेल्होजी व येसोजी मेहेत्रे का सासवड
भिकनाक वृतीकर मौजे कोढीत बुा

कोंडाजी जथे महमद नाइक वाडी का सासवड
भिकाजी राजिवडा चौगुला मौजे कोढीत

तेरीख २९ माहे रबिलावल.

---

## खानापूर-कुलकर्णी.

ले. ६३७ } {श. १५७३ माघ व. १२
{इ. १६५२ जाने. २७

महाजर बतारिखे २५ माहे सफर हाजीर मज्यालासियानी मामले मुर्तजाबाद

काजी अबदुल कादीर हाकिम शरा

सियादत वा नीकाबत दस्तगाहा हसनशा हवालदार

सैद माहामूद बिन सैद खीद मीर होखारी

हैबतखान बजाहाती

सेख मिरा इमामखान मुतावली रोज हजरर्ता

अली आगा बिन हसन केर मुतावली रोजे बेहतरीन अनाम.........अलेहुम अलस कवत वासलाद

कारकुनानी वा हुदेदारानी

सभु महादेउ ठाणेदार

शंकराजी जगनाथ मजमदार

सगो जनार्दन नाजीर वा निघावान

बडे मलिक अबदुल हुसेन दबीर

बाबजी तिर्मलराऊ सरनोबत

चदो बावजी हेजीब

रगोदास बरसद जाहाती माऊजी रामजी माहालनीस

तिमाजी बावा हरकार माहाल रातीब

रुकमाजी मसलत निघावान माहाल तबाकू

गिरमाजी नरसिहु सबनीस

गंगो सुरदेऊ निसिदा पोता स्वहस्त गागो सुरदे

धुमाजी नरसिहु निसीदा आबारखाना धुमाजी नरसिहु निा आबार खाना

तिमाजी नरसिहु- निसीदा थटी को- ठार इमारती बि कलम तिमार्जा. नरसिहु

कृस्णाजी विठल निसीदा जरातखाना क्रिस्णो वि- ठल निा जरात खाना

खुर्द सालगानी वा सरगुरो वा नाइकवाडियानी वा देसकानी

खुर्द सालगानी

सिदी आगा बिन अहमदजी
आली आगा
फारसी
सैद सिकदर

सरगुरोयानी

रायाखान बिन आलबस
( खंजीर )

मीर अली कमाल खान
पारसी शिका

नाइकवाडियानी

हणमतराऊ (कटयार)

नरस राऊत

रग राऊत

सर्जाराऊ बिन तुको जी नाईक (फारशी शिका)

जाखोजी रविराऊ (फारसी शिका)

कासी कृस्णाजी नाईक कासी पाा

गगाजी नाईक ( फा. शि. )

धुमाजी व विरोजी नाईक (फारसी शिका)

नूरखान

पतक

सोनजी नाईक (फारशी शिका)

यैसवतराऊ (फारशी शिका)

मिया नाईक

दरिया नाईक

अली नाईक

लाडले नाईक

लखमोजी नाईक (फारशी शिका)

देसकानी

तमाजी तिर्मल बजाहाती अमीन

दादो विरदेऊ दे- साई ( मराठी शिका )

खान हसनखान (फारशी शिका)

सरदेसाई

अदिनाईक कोमरो जी देसाई [ नांगर ]

बावजी चौलराऊ देसाई [ नांगर ]

ब्रह्माजी कोडा देसाई

भैरो जखरस ह× ×× वेकटाद्री वि- ठल वा रगो नरह- री देसकुलकर्णी

पटेलानी व सेटी माहाजनानी कसबा

| | | | |
|---|---|---|---|
| जखगौडा पटेल वा खंडेराऊ पटेल ( नांगर ) | | वली बडेमिया सेटी | रामणा बिन तिमणा वा नरसणा बिन बसवण माहाजन |
| लखमगौडा चौगला | रुद्रसेटी बिन पदमसेटी कोरडीकस ( तागडी ) | मगसेटी बिन लखमसेटी गाधी ( तागडी ) | बिकलभऊ नरसो बिन चौंडो श्रीपत मेहतर सरोफानी |
| खलोजी बिन इसरो मेहतर तेली ( लाट ) | नरसो बिन सगो मेहतर तेली | दानलिंग वा राचेपा वा देया मेहतर अहिनिगर वा दुरोदेगर | त्रिा नरसोबा मेहतर |
| सितो बिन बस्वा वा तुको बिन मोकदेऊ माली मेहतर ( खुरपे ) | होनसेटी वा लखमसेटी वा जखणा मेहतर कुमार ( चाक ) | नरसु बिन सखला मेहतर हटीगार | देया बिन अजणा मेहतर + + ( धूपार्ति ) |

हेमुक्ष समस्त मामले मजकूर सुहूरसन इसने खमसैन अलफ कारणे जाहला माहाजर ऐसे जे जाखो निलकट वा साबाजी महादेऊ कुलकर्णी का। खानापूर वा मौजे पेडे वा मौजे मौहे वा मौजे कोलविरे वा मौजे सुल्तानगादे वा बाजेखडे का। मजकूर हुजुरु येउनु मालूम केले जे आपुले कुलकर्णी वडील वडील तागायेत पिढी दर पिढी चालत आले असे दरीवख्त आपुले भाऊ तमाजी नरसीम्ह वा सटवाजी खडरस वा नरसो बालाजी वा जिवाजी बालाजी बिरादरानी यापासी कुलकर्णीचे तकसीम मागाव्या गेलो होतो त्यानी आपणसवे शिरजोरी करून तकसीम मागितालिया दिल्हे नाही मग अमचे बाप महादेऊ खिरदेऊ वा निलो विठल यानी मा। ले मजकुराचे सदरेसी महालूम केलेवरी ठाणे मामले मजकुराचे किताबती वा मिसाल का। खानापुराचे वा मौजे पेडेचे कारकुनासी वा हुदेदारासी वा मोकदमासी घेऊन गेलेवरी तेथील मशरुलअनाम निबाजी दत्ताजी पडीत नामजात का। भिलोडी वा देहाये वा कारकुनानी वा पटेलानी वा शेटी महाजनानी का। खानापूर यानी तपे वाल्वेचे स्थलासी जाखो निलकट वा साबाजी महादेऊ वा तमाजी नरसीम्ह वा बिराजर सटवाजी खंडरसासी पाठविलेवरी तेथील तपे मजकुरीचे कारकुनानी वा पटेलानी वा देसकानी वा सेटीमहाजनानी वा समस्त लहान थोर बैसोन हरदो जणेचे तकरीर लिहून घेतले वा पिढी मूल पुरुश खातिरेसी आणऊन हर + + + न

सफा करून माहाजर लिहून देऊन का खानापुरासी पाठविलेवरी का मजकुरीचे कारकुनानी वा पटेलानी वा सेटीमहाजनानी वा खोतानी वाडिहाये बैसोन तकसीमेचे विले करून कागद लिहून दिल्हे बीा

| | |
|---|---|
| कसबे खानापूर तकसीम | मौजे पेडे तकसीम तिसरे |
| तिसरी दोघानी वाटून खावे | दोघानी वाटून खावे |
| खेडेहाये | का मामले मजकुरामधे बाजे- |
| मौजे मोहे १ मौजे कोलविरे १ | कुलकर्णी २ |
| मौजे सुलतानगादे १ | तेलीचे १ बकालचे १ |
| हे वरी दिलेप्रमाणे दोघानी चालवावे | हे दोघानी चालवावे. |

येणेप्रमाणे तकसीम वा हक लवाजिमा वा इनायात वा ठिकणात वा बाजे हक तकसीम करून वाटून खावे येस लिहून दिल्हे असे याणेप्रमाणे माहाजर मामले मजकुराचे होवे म्हणऊनु इलतमास केले बराये मालुमाती खातिरेसी अणुउनु बाा माहजर तपे वालवे वा कसबे खानापूर वा का हुसापुराचे खातिरेसी अणुऊनु मामले मजकुराचे कारकुनानी वा सरगुरो वा नाइकवाडियानी वा देसकानी वा सेटीमाहाजनानी समस्त मिलोऊनु माहजर लिहून दिल्हे असे त्याणेप्रमाणे तकसीम खाउनु खेडेहाये चालऊन असावे यासी जो कोणी हिला हरकत करील तो दिवाणाचे गुन्हागार वा गोताचे आन्याई आणि कसवे मामले मजकुरामधे रोजे हजरतीचे वा + + + + वा दिवटियाचे चाकरीचे तकसीम तमाजी नरसिंह वा सटवाजी खडेरस मागो लागले म्हणे तरी हे चाकरीचे अमल असे + + ............... + + + .........+ + खडरस वा नर + + + +

---

## पेड-धनगर.

ले ६३८ } ( फारशी मजकूर ) { श. १५७५ पौष व. ८ / इ. १६५४ जाने. १

बहाजीर मज्यालस

| | |
|---|---|
| | मौलाना माहामद हुसैनी दबीर |
| मसुरूल हजरत रायाजी रो पाडित मजालसी | जमारिकाब |
| वराती......दार | |
| येमाजी नारायेण मजमुदार | रंगो तिमाजी निघावान माहाल |
| हाल रातीब खासे शेरीफा | रातीब खासे शेरिफा |
| ......सैद मियाजी खवास जमा- | जानो नागोजी जमारिकाब |
| रिकाब हवाले माहाल रातीब | नामजाद माहाल रातीब |

नारो बनाजी व
नागोजी नमगोजी दफ्तरदार
येल नाईक बिन नागोजी नाईक
......नाइकवाडी माहाल रातीब

सखावतखान अलीशान मा-
हालदार जमारिकाब

जाहाला माहाजर ऐसा जे अज सुहुर सन अर्बा खमसैन व अलफ परवानगी हुजूर बतारीख २१ माहे सफर बमारिफत मजले शाहा सर परदेदार अवर्दे बावाजी हसन माहालदार जमारिकाब ठाणा पुरनूर माहमदापुर तेथून मौजे पेडचे पटेलासी व मौजे डोगर सोनीचे पटेलासी सियादत पन्हाः.........सरखेळ ममालिकाचेथे मुनसिफीसी हवाला करणे म्हणौन बमोजिब परवानगी माहालदार मशारनुलेने तुकोजी बिन हमराजी धणगर पटेल मौजे पेड मामले मूर्तजाबाद व केदारजी बिन रवलोजी झाबिरा पटेल डोगरसोनी पा कागळ यासी घेऊन आला मग हरदोचे अहवाल खातिरेसी आणिता केदारजी झाबिरा डोगरसो-नीकर बोलो लागला जे मौजे पेडेचे पटेलगी आपली म्हणौन व तुकोजी धणगर पटेल मौजे पेड याने बोलो लागला जे डोगरसोनकिरासी कधी इलाखा नव्हता आपण सात पिढी पटे-लगी करीत येतो दरीवख्त झाबिरा यानी दुकाल खवासखानाचे मुदती तधी धरून गरगशा लाविला असे या बाबेचे माहाजर हक जवारीचे व का नादरेचे असे व फर्मान हुमायून हक जवारीचे माहाजरवरून कारकीर्दी खा याकुतखान सर्जा व खा सिलेहदार खानचे मोकासा जाहालेवरी हजरती हुकमत वजीराने अहवाल खातिरेसी आणून फर्मान हुमायून करून दिले जे झाबिरेसी निसबत नाही सजा फर्माविले आहे म्हणऊन इतके होऊन ही हालखुद न राहाता मागुती गरगशा करू लागला मग हरदोसी तलब होऊन हुजूर आलो हजरत दिवाण साहेबी ठाणेमधे मुनसिफीसी हवाला करविले केदारजी झाबिरा डोगरसोनीकाराचे व आपुले उत्तर होऊन कतबे जाहाले असे जे मौजे पेडचे मिरासी ४ बि। आणाजी नेम चौगला कुलकर्णी बालोजी खोत पदा बेगारी हे चौघाची नाऊ केदारजी झाबिरा घेऊन बोलिला की यानी जरी अपले पटेलगी म्हणौन बोलिलियाने आपणासी पेडेचे + + देवे यानी जरी नव्हे म्हणतालिया आपण + + खता व ख्यानतीचे तागायेतचे निघा करून म्हणौन व त्याणेप्रमाणे आपण ही राजी जाहालो की हे चौघानी तुकोजी धणगरचे पटेलगी म्हणतालिया आपण पटेल जरी नव्हे म्हणतलिया हारीके खता ख्यानगीचे तागाई-तचे निघा करून म्हणौन त्यावरी सदरहु चौघासी ठाणे होऊन मिसाल तलबेचे जाहाली ते चौघेही हुजूर आले ते चौघेहि गोही गुदरिले ठाणेमधे

पदा बेगारी केला तकरीर
ऐसाजे मौजे पेडेचे पटेलगी
धणगर खरे धणगर व अम्ही
मिलोन गांऊ करीत येतो

आणाजी चौगला केला तकरीर
ऐसाजे मौजे माचे पटेलगी
धणगराचे अम्ही व ते मिळोन
पांच पिडी गांऊ करीत येतो

अपाजी कुलकर्णी मौजे पेड केला

बालोजी खोत केला तकरीर ऐसा

तकरीर ऐसा जे मौजे मज-
कुरीचे पटेलगी धणगराचे
अम्ही व ते मिळोन पांच
पिढी गांऊ करीत येतो

जे अमचे वडील बोल्त होते
जे पेडेचे पटेलगी जाधवाचें म्हणौन
व धणगर विणकार म्हणौन
अमचे वडील बोल्त होते
मज माझे बापाने सागितले जे
जाधवाचे पटेलगी म्हणौन माझे
बापासी माझे आजियानी
सागितले

याणेप्रमाणे सदरहू लोकानी गोही गुदरिलेवरी ठाणेमधे गोहीदारासी व अपणासी व केदारजीसी अदबखाना ठेविले रोज १५ मग मोकासाइयानी मौजे मजकुरीचे उगवणी व संचणी सागोली जाहाले पाहिजे म्हणौन चौगलेसी व कुलकर्णीसी व पदा बेगारी सोडाऊन गावासी पाठविलेवरी मौजे डोंगरसोनी व मौजे बोरगांऊचे मोकासाई खुर्दसालेयानी माहाल जामदारखाना यानी हजरत———चे बदगीसी फिर्यादी केले जे ठाणेमधे निवाडा होत नाही म्हणौन तेथून हर दोघे जणासी हजरत साहेबाचे हुकुमेने साहेबाचे दरबारासी आलो येहतमाम फर्मावावे म्हणौन त्यावरी हजरत साहेबाचे हुकुम बा सरखेल ममालिक व मजालसियानी व सभानाईक बैसोन हरदोचे तकरीर मनासी आणिता हरदोने तकरीर केले बितपसील

केदारजी झाबिरा पटेल डोंगर
सोनी तकरीर केले ऐसा जे सदरहू
गोहीदार गावीचेवरी राजी
होऊन कतबे दिले होते ते
हकीकत गोहीदारासी साहेबी हुजूर
आणौन गोही मनासी आणावे
तेंचे गोहीदारानी माझे पटेलगी
म्हणतालियानी अपण खरा
पटेलगीचे सदरहू लोकानी तुकोजी
धणगराचे पटेलगी म्हणौन
बोलिलिया अपणासी पटेलगीस
निसबत नाहीं

तुकोजी धणगर पटेल मौजे पेड
तकरीर केला ऐसाजे सदरहू
गोहीदार गावीचे वरी राजी होऊन
कतबे दिले होते तहकीक
सदरहू गोही गुदरलेवरी
यामधे ३ जण बिा
अणाजी चौगला अपाजी कुलकर्णी
पदा माहार
अपणासी अदबखानात राखिले
गांवांचे उगवणी संचणी होवे
म्हणौन रजा देवाऊन पाठविलो
त्यावरी साहेबाचे हुकूम
जाहाले जे त्यासी अणवणे म्हणौन
साहेबाचे हुकमेसी येतील हुजूर
आलेवरी ते ही माझे पटेलगी
म्हणतलिया अपण खरा जरी

केदारजी झाबिरा डोंगरसोनीकाराचे
पटेलगी म्हणौन बोलिलेया अपणासी
पटेलगीस निसबत नाही

ऐसे दोघाचे तकरीर जाहालेवरी सरखेल महालीक हुकूम फर्माऊन गोहीदारासी तलबेने मौजे मजकूर होऊन आणविले ते हुजूर आले मग सरखेल महालीक व मजालसियानी बैसोन मग तुकोजी धणगर पटेल मौजे पेड व केदारजी झाबिरा पटेल डोंगरसोनीकारासी कोतवालखानेमधून काहाडून आणविलेवरी त्या हुजूर हे तिघाचे तकरीर जाहाले बितपसील

आणाजी चौगला केला तकरीर
ऐसाजे मौजे मजकुरीचे पटेल
धणगराचे अमहीं ते मिळोन
पाच पिडी गांऊ करीत येतो
अपाजी कुलकर्णी मौजे मजकूर
केला तकरीर ऐसाजे मौजे मजकुरीचे
पटेलगी धणगर व अमही मिलोन
पांच पिढी गांऊ करीत येतो

पाला बेगारी बिरादर पदा केला
तकरीर ऐसाजे मौजे पेडचे
पटेलगी धणगराचे खरे धणगर
व अमही मिळोन पांच पिडी गांऊ
करीत येतो

येणेप्रमाणे सदरहू लोकाचे गोही गुदरले त्यावरी केदारजी झाबिरा डोंगरसोनीकार बोलिला की यानी धणगराचे धाशतीने धणगरसारिखे बोलिले पदा बेगारी तो होवा म्हणौन सदरहू तिघानी बोलिले जे पदा बेगारी मलूलने अडला होता व साहेबाचे हुकूम गावासी आले तेचे बिरादर निमे तकसमिचे धणी पालासी घेऊन आलों अमही साहेबाचे बदगीसी तकरीर होऊन दिलें असो यासी तकरीर जाहालिया दिवाणाचे गुन्हेगार असो म्हणौन मागुती केदारी बोलिला की ठाणेमधें अपणासी व तुकोजीसी व गोहीदारासी ठाणेमधे अदबखाना ठेविले तेथे पदाबेगारी बोलिला असे जे धणवर मारतील धाशतीने त्यासारिखे बोलिलो पेडचे पटेलगी महराटे झाबिरे डोंगरसोनीकाराचें खरे म्हणौन या गोस्टी अदबखानामधील लोक गोहीदार असे हे जरी खरे जाहालेयानी आण खरे नाही तरी खोटा म्हणौन त्यावरी तुकोजी धणगर पटेलासी सभानाइकाने पुसिले जे तो तरि यैसे बोलत असे तुवा यासी काय म्हणतोस म्हणौन मग तुकोजी पटेल या गोस्टीसी कबूल असो हक असेल ते होईल म्हणौन मग दोघाचे राजीपणे नेम उतरचे कतबे जाहाले बिा

केदारजी बिन रवलवजी
झाबिरा डोंगरसोनी कतबा
दिला जे पदा बेगारी मौजे
पेड यानी अदबखानाचे
लोकाहुजूर बितपसील
हाजीभाई बंदीवाला बोम नाईक बंदीवाला

तुकोजी बिन हमरोजी धणगर
पटेल मौजे पेड कतबा
दिला जे पदा बेगारी याने
अदबखाने लोकाहुजूर बितपशील
हाजीभाई बंदी वाला बोम नाईक बंदीवाला
बसव नाईक दिवटे देवणा काबाडी

बसव नाईक देवणा कावाडी
दिवटे मुला
जखणा टाकली
याहुजूर बोलिला जे पेडचे
पटेलगी झाबिरा डोंगरसोनीकार
महराटेचे खरे
अपणासी धणगर मारतील
ते धाशतीने त्यासारिखे बोलिलो

मुला जखणा टाकली
याहुजूर बेगारी मा। झाबिरे
डोंगरसोनीकार पटेलगी
म्हणौन बोलिले असलिया
अपणासी पटेलगी निसबत
नाही

म्हणौन त्या गोस्टीस सदरहू लोक सदरहू दोधाचे कतबेवरून खा। नेमतखान हवालदारपासी सखावतखान माहालदार जमारिकाबसी पाठविलें वरी सदरहू ६ जण बंदखिानाचे लोकासी खान मशारनुलेने माहालदार हुजूर बोलाऊन पाठऊन खबर घेता सदरहू बदीखानाचे लोकी तकरीर केले जे पदा बेगारी व पेड अपणाहुजूर कांहीं बोलिला नाही जरी आइकिले असोन पन्हाम करीत असोन तरी दिवाणीचे गुन्हेगार म्हणौन तेचे तकरीर घेऊन माहालदार मा। आला त्यावरी केदारजी झाबिरा डोंगरसोनी व तुकोजी पटेल पेड यासी कोतवालखान्याचे अदबखानेतून आणून केदारजी झाबिरा डोंगरसोनीकारासी सभा नाइकाने पुसिले जे तुवा जे नेम उतरचे कतबे दिला होतासी अदबखानेचे लोक तुवा कतबा दिले बरहुकूम आइकिले नाही अपण कांहीं जाणत नाही ऐसे बोलिले तुवा खोटा तुजे कतबेबरहुकूम जाहालासी व सरखेल महालीक व मजालसियानी व सभानाइकानी केदारजी झाबिरा डोंगरसोनीकार पेडचे पटेलगीचे गर-गाशा लाविला होता तेसी वव्हार खोटा केला तवा लाइनी अर्जी तागाईत खता व ख्यानती केलासी इतुकेचे निघा झाबिराने करावे पटेलगीस तुज व तुझे देखील वारिसासी आयेआर्थ समध नाही तुकोजी बिन हमरोजी धणगर पटेल मौजे पेडचे सही जाहाला व पेसजीचे हक जवाराचे महाजरवरून फर्मान हुमायून वरून ठाणेचे मिसेलीवरून व गावी गोहीदार-वरून व हाली सरखेल ममालिकाचे मुनसिफीवरून मौजे पेडचे पटेल तुकोजी बिन हम-रोजी धणगर पटेल सही

---

ले. ६३९ } { श १५७९ मार्ग. व. १३
इ.१६५७ दिसें. २३

## कांदाट-मोरे

श्री.

नकलेची नक्कल

महजर बतारीख छ माहे रबिलावल मोकदम स्थळ कसबे बामणोली तो। कांदाट-खोरे व देहे तो। तांबी सु॥ समान खमसैन अलफ बेहुजूर हजर मजालस.

१५

देवस्थान.

१ श्री वागजाई तो ताबी संमत सोलसे.
१ श्री वागजाई मौजे मोर्णी तो कांदाट खोरे; मोर्तब असे.
२
१ श्री मल्लकार्जुन मौजे परवत तो कांदाटखोरे
१ श्री बहिरबदेव तर्फ कसबे बामणोली.
२

सुभा जावली

१ राजश्री गोरखोजी दिनकरराव काकडे सुभेदार मोर्तब असे.
१ राजश्री विसाजी नागनाथ नामजाद सुभेदार मोर्तब असे.
१ आपाजी महाजन कसबे जावली निा तागडी असे.
३
१ परसोजी आरवा रा सुभा निा कठार असे.
१ गणसेट सेट्या निा तागडी असे.
१ बापोजी सोनार को जावली निा हातवडा असे.
३
६

कारकुनसमस्त—बामणोली.

१ अंताजी सिधनाथ हवालदार; मोर्तब असे.
१ शंकराजी नागनाथ मुजुमदार.

किले वासोटे.

किले सातारा.

१ मलोजी बिन खलोजी गाडवे देसाई निा नांगर असे.
१ पिलाजी बिन मलोजी देसाई किले मजकूर.

तर्फे बामणोलीचे गांवदेशक.

१ अनाजी रंगनाथ हवालदार सरदेशमुख मोर्तब असे.
१ विसोदेव कुलकर्णी व मलाहरपंत मुा तालीक का मा
१ चांगोजी बिन जावजी बामणे मोकदम को बामणोली.
३
१ बालाजी अंबाजी अंगोडे देसाई मोर्तब असे.
१ दादजी कोडबा कुलकर्णी कसबे बामणोली
१ गोंदजी नाइकजी जांमला निा नांगर असे.
३
६

१ सोनसेट बाळसेट सेटया निा असे.
१ बाबाजी रिकामा मोकदम मौजे गाढवली निा नांगर असे.
१ मालजी बिन होनाजी कदम मौजे
१ कोंडाजी बिन पाकोजी कदम मौजे सावरी निा नांगर
१ सोनाजी जांबला मो वाडी सोनाडी को बामणोली.

तेटली निा नांगर असे, | १ सोनाजी फळणा मोकाा मौजे सेमडी निा असे.

१ दादजी अंधारा मौजे आंधारी निा नांगर असे.

४ | ३ ७

मार्ग आकलपे.

१ कडत सेटी बिन सेटिया. | १ कानोजी डाग्या.

देशक तर्फे तांबी.

कृष्णाजी व रत्नोजी व बालाजी व हरजी भातोसे व हिरोजी येसजी मोकदम मौजे आकलपे निा असे. हिरोजी व बाबाजी मोकादम मौजे पिंपरी निा नांगर असे. हारजी व कानोजी गोगावले मोजे दरे निा

मुकाशियाणी.

१ हिरोजी बिन कृष्णाजी आहिरा रा मौजे म्हावसी निा सिके कठार असे.

१ राजजी बिन रामजी गोगावला मजरेवाडी पावसे को बामणोली निा कठार असे.

१ बाबाजी बिन राघोजी मोकदम मजरे वाडी मेटे महाल कसबे बामणोली निा कठार असे

१ जावजी बिन येसजी अंधारा मुकासी मौजे अधारी निा कठार असे.

४

मौजे आहिर

१ कृष्णाजी बिन सोनजी अहिरे निा कठार असे. | १ तानाजी मालजी अहिरे निा कठार असे.

१ दादजी बिन सूर्याजी निा कठार असे. | १ राजजी बिन कान्होजी अहिरा निा कठार असे.

२ | २ ४

मौजे फळणी भेटकरि

१ संभाजी फळणा. १ येलोजी फळणा. १ कुसाजी फळणा. १ सोमाजी फळणा.

४

मौजे कास.

१ नाइकजी किर्दत नाईक. | १ कृष्णाजी बिम सोनाजी किर्दत नाईक

मौजे माथा वलवण.

बाबाजी बिन धारोजी नाईक उचाटकर निा कठार असे. | १ अंतोजी बिन गोंदजी नाईक उचाटकर.

मौजे कोलघर

१ रागोजी बिन जावजी जांबला निा कंठार असे.

१ अबाजी बिन सोनजी जावला निा कठार असे.

तर्फ कांदाटखोरे.

थलेसरी मौजे परवत. १ माललिंग जंगम

१ लिंगापा बिन माललिंग जंगम.

चकदेव. १ विरलिंग बिन हारलिंग जंगम.

१ कोंडलिंग बिन बाळलिंग जंगम.

थलसरी मौजे मोरणी.

१ बालोजी बिन राजकोजी सिंदे.

१ तानाजी बिन राजजी सिंदे.

मोकासियाणी कांदाटखोरे.

१ सूर्याजी बिन हबाजीराव मुकासी कांदटखोरे मोर्तब असे.

१ हिरोजी बिन सोनजीराव मौजे सिंदी.

१ अंदोजी बिन अंतोजीराव मौजे सिंदी.

---

३

१ लखमोजी हिरोजीराव.

१ हिरोजी बिन सोनजीराव खदीवाडी. महाळुंगे.

१ विठोजी बिन तानाजीराव सिंदकर.

---

३

---

६

मोकादमानी कांदाटखोरे.

१ नागोजी बिन कानोजी मोकदम मौजे निवळी निा नांगर असे.

१ सोनजी बिन कुमाजी मोकदम मौजे लामज निा नांगर असे.

१ गोंदजी बिन नागोजी हिरड्या मोकदम मौजे लामज निा असे.

१ चंद्रोजी बिन पाकोजी पास्ती मोकदम मौजे महाळुंगे

१ हरजी बिन बाबाजी उतेकर मोकदम मोा खदी निा नांगर.

१ सोनजी बिन कानोजी पास्ते मौजे महाळुंगे निा नांगर असे.

---

६

१ हारजी रामजी मौजे आराव.

१ बालोजी बिन चिलोजी रेणोसा. मौजे सालोसी निा नांगर असे.

१ राघोजी बिन बाबाजी पास्ते निा नांगर असे.

१ राजजी मोकदम मौजे उचाट निा नांगर असे.

१ महादाजी खिरखंडा मौजे उचाट निा नांगर असे.

---

५

---

११

समंत सोनाट सोलसा.

१ मालोजी बिन नाइकजी मोकादम माळुसरे मौजे फुरस निा नांगर असे.

कर्यात आठेगांव.

१ दादजी सिवाजी उतेकर वानवली; मोर्तब असे.
१ बाबाजी धारोजी मोकदम मौजे दोडाणी निा कठार असे.
२
१ गणोजी गोविंद हवालदार किले प्रतापगड मोर्तब असे.
१

१ कोंडजी बिन रावजी तेली को बामणोली निा असे.
१ नागसेट सोनार परलीकर हा वा को बामणोली निा हातोडा असे.
१ बाळा बळी हाज्याम निा आरसा असे को बामणोली.
१ बाळा बिन काळू थलार निा नांगर असे
४
१ पाकोजी बिन हारजी गुरव निा धुपाटणे असे.
१ बापुजी को मेढे निा असे.
१ बाजी तेली को मेढे निा घाणा असे.
३
७

धनगर देस गावडे

१ गोंद गावडा बिन विसोजी गावडा निा असे.
१ मल गावडा निा असे.

विरतकिर म्हार

१ फसनाक बिन जाननाक को बामणोली
१ हिरनाक बिन रामनाक मौजे आकल्पे
१ नामनाक बिन जावनाक मेहतरी मौजे आरव.
१ भिका बिन बाळा मेहतरी मा निवळी.
१ चिला बिन बाळनाक म्हार मौजे लामज.
१ चांगनाक बिन बाळनाक मेहतरी मौा उचाट तर्फे कांदटखोरे.
६
१ मालनाक बिन राज्या तराळ मौजे सेमडी.
१ चिलनाक बिन होसू मेहतरी मौजे पिंपरी
१ चायनाक बिन काळनाक मेतर मौजे माथा
१ रतनाक बाळनाक मौजे सिंदी.
१ कमा बिन बाळनाक महार मौजे महालुंगे
१ कांगनाक बाळनाक मेहतरी मौा दरे तर्फे तांबी सुभा.
६
१२

हे समस्त हाजर मजालस विद्यमान्यं जाहला महाजर स्वस्ती श्रीनृपशालिवान शके १५७९ हे(म)लंबीनाम सं(व)त्सरे मार्गसिरस वद्य त्रयोदसी लेहोन दिल्हा महाजर ऐसाजे आलोजी बिन जसोजीराव मुसलमान कांदाटकर व तानाजी बिन चंद्रोजी कांदाटकर व धारोजी-

राव कांदाटकर या उभयतामध्ये मौजे सालासी बावे गरगशा कारकिरद दर कारकिरद बाळाजी चंद्रराव याचा फर्जंद दौलतराव व येसाजी सुरराव व चंद्रराव हे तीन कारकिरदीस भांडत होते कांहीं निवाडा जाहला नाहीं. हे दिस कतबे होन रेटत नेले होते. गेली हाती रवळ पडतच गेली परंतु रवा होऊन निवाडा जाहला नाही मातळ होतच गेली यावर महाराज राजश्री सिवाजीराजे साहेबास जावली महली अर्जी झाली राजे साहेबास जावली महली कमावीस सुभेदार हाजर मजालसी हुजूर आलोजीराव बिन जसोजीराव व येमाजीराव मुसलमान व तानाजीराव बिन चंद्रोजीराव कांदाटकर हार दो उभयतां उभे राहून मौजे सालोसीची हकीकत जाहीर करोन कतबेत लिहून दिल्हा ' ऐसाजे बितपसील

आलोजीराव बिन जसोजीराव व येमाजीराव मुसलमान कांदाटकर लिहून दिल्ही बात ऐसी जे मौजे सालसी हे आपली तक्षीम वडिलवडिल्हानी दिल्ही आहे बळे करोन खात नाहीं या बाबे रवा काढीन अग्निचे मुखे व चंद्र सूर्य साक्षे करोन रवा काढीन जरी खोटा जाहलो तरी तानाजीराव व धारोजीराव कांदाटकर यानी खावी जरी अग्निमुखे देवद्वारी खरा जाहलो तरी सालोसी घेईन आपण सालोसीविसी बोलावयास येजीत नाहीं सालोसीचे बावे बात वरी ( खरी ) हो सई गोही

तानाजीराव बिन चंद्रोजीराव व धारोजीराव बिन दादजीराव कांदाटकर लिहून दिल्हा तकरीर ऐसाजे मौजे सालोसी आमचे तक्षीमेवर दिल्ही आहे हे खरे आलोजीराव जसोजीराव मुसलमान यासी दिल्ही नाहीं व बलात्कारे खातो या बाबे रवा काढोन रवा खरा निघाला तरी सालोसी घेईन जरी अग्निमुखे देवद्वारी खोटा जाहलो तरी आलोजीराव मुसलमान यानी खावी आणखी सालोसी बाबे बोलावयास अर्थाअर्थी संबंध नाहीं. लेकरा लेकरी बात खरी सही गोही येणेप्रमाणें सदर जावलीस नेम होउन् मा। कारकून समत बामणोली यासी खुदखत जाहीर जाहले कीं आलोजीराव बिन जसोजीराव व येमाजीराव मुसल्मान कांदाटकर व तानाजीराव बिन चंद्रोजीराव कांदाटकर व धारोजीराव कांदाटकर हे दोन वादी रव्या बद्दल तुमचे स्थळासी पाठविले आहेत याची कत घेऊन यासी रवा देऊन काढविणे म्हणोन सादर जाहलेवर दर दोन रवे देऊन ते मनासी आणोन लिहून घेऊन छ १६ माहे राबिलावल एकदम राजीने हजर न होता रोटा ऐसा हर दो जनात कतबे घेतल्यावर माहे रोज मा। हजर जाहले पाहिजे छ १५ माहे मिनहू रोज अक्काऊ शनिवार रोजी कारकून व हजर मजालस करार केला मी आलोजीराव बिन जसोजीराव मुसलमान यानें रवा काढावा ऐसा नेम केल्यावर पाकोजी हिरडकरा पाटील लामजकर आला होता आलोजीराव मुसलमान याचा दसपंजा पारविजा करोन किने व डागली व मदत खोत मामली लिहून हाती हवालदार समंत बामणोली याचा शिक्का करोन दुसरे रोजी पाहिली प्रहर छ १६ मिनहू आदितवारीं श्रीहनमंतदेव याचें देवळी मजलसी करून तेल ८८१। सवासेर व तूप वजनी ८८१। एकूण वजनी ८८२॥ रवैपात्रामध्ये ओतिले पाकोजी डोही आंघोळ करून आला ताडपत्रीं लिहिलें की मौजे सालोसी आलोजीराव मुसलमान याचे

तक्षिमेवर दिल्ही आहे वळखात नाही हे सत्य तरी टाणकी रवा उतरोन जरी हे असत्य सालोसी आलोजीराव याचे तक्षिमेवर नाहीं बलात्कारे खातो हे सत्य तरी ढाणख्याला ताडपत्र लिहून ठाणकी रवे सीरी बांधोन जर मजलसी देखता ऐन जिन्नस रवा पात्रामध्यें टाकिला ढाणके याचे हातीचा खळेता काढून रवेपात्रामध्ये हात घालून रवा काढला सवेच हातीं खलेती घालून हवालदार संमत मा। याचा सिका करोन घेऊन रोज येऊन तिसरे रोजी छ १८ माहे मिनहू उर्फ मंगलवार हाजर मजलसी देखत टाणकिया रवे हाती काढून दसपंजा हाजर मजलसी व कारकुना देखत जाहला खुळा याने टाळी पिटिली आलोजीराव बिन जसोजीराव मुसलमान कांदाटकर याने सालोसी जितिली तानाजीराव बिन चंद्रोजीराव कांदाटकर यांनीं सालोसी हारविली लेकरालेकरीं तुटली पेस्तर तानाजीराव व धारोजीराव यानी अलोजीराव व यमाजीराव यासी बोलण्याचा आर्थाआर्थी लेकरालेकरी समध नाही सालोसी बाबे जो हारकत करील तो ढाणकी रवा गुनेगारीचा अन्याई म्हणौन हा महाजर सई शके मा। मि॥ का।

---

ले. ६४० { श. १५८० आश्विन व० १२
इ. १६५८ आक्टो. १३ }

## बेलसरे-पाटील

श्री

नकल

तकरीर कर्दे हजीर मजालस मु॥ मौजे सुपे खुर्द पा। सुपे सु॥ तिसा खमसैन अलफ छ २५ मोहरम बिहुजूर

राजमुद्रा

राजश्री रामाजी बलाल माहालानिहाये का। सासवड

यादो नारायण सभासद नामजाद माहालाहाये

वतनदारानिहाये

अंताजी दतो अजहत साम (रा) ज काटे देशमुख व त्रिं ++ गोमदेव देशकुलकर्णी पा। मार

नाइकवाडी
१ माणिकजी इतबारखान
१ बाबजी मोरे
१ रायाजी अभंगराव
१ सूर्याजी लांडगा
१ सटवोजी झेंडा
५

देशकानी गावगना मोकदम

आपाजी टिलेकर मोकदम मौजे खलद खुर्द पा। मार

कोंडाजी आकरसा मोकदम मौजे गुजवडी पा। मार

......मे माणे मोकदम मौजे
पारगाव पा। पुणे
त्रिंबकजी दरेकर मोकदम मौजे
आबले ता। करेपठार
( सं ) भाजी पा। बोरकर मोकदम
मौजे पूर ता। करेपठार
—बिरादर गंगाजी कु—
—कर मोकदम मौजे वनपुरी
व बाबजी पा। निमे मौजे मा।र
जावजी खंडेकर मोकदम मौजे
गुलबेरी ता। करेपठार
—वजी कामथा मोकदम मौजे
सिवरी पा। मा।र
सोनजी सिंदा मोकदम मौजे
नाझरे पा। मा।र
संभाजी पा। नाझीरकर मौजे
नाझरे पा। पुणे
तुकोजी सिंदे मोकदम मौजे
पाडश्वर पा। पुणे
विठोजी तावरे मोकदम मौजे
मोरगाव ता। करेपठार
बाहुजी पा। पोमसर मोकदम
मौजे पिपले ता। करेपठार
—डजी बनकर मोकदम मौजे
निळुज पा। मा।र
कान्होजी सेख्याजी पा। बेले
मोकदम मौजे खानवडी ता।
करेपठार
तुक पाटील मोकदम मौजे
मालवडी ता। करेपठार
कान्होजी चौधरी मोकदम मौजे
खोर ता। करेपठार
रुपाजी झेंडे पा। मौजे पि

बापूजी रांडा पा। मौजे सुपे
खुर्द पा। मा।र
माणकोजी कामथा पाटील
मौजे चांबली ता। करेपठार
म्हसकोजी पाटील बुधा मौजे
कोढीत बु।। का। सासवड
रत्नोजी पा। कुभारकर मौजे
कुभारवळण पा। सुपे
बाबाजी जगथाप मोकदम
व तानाजी चौगुला
मौजे काथले पा। मा।र
वाघोजी कामथा मोकदम
मौजे खलद बु।। का। सासवड
बालोजी खोमणे निमे मोकदम
मौजे जेजुरी ता। करेपठार
कनकोजी तावरे मोकदम मौजे
आंबी बु।। पा। मा।र
सिरसोजी मोकदम मौजे
कोलविरे पा। सुपे
लखमोजी रानगाड मोकदम
मौजे जवलार्जुन ता। करेपठार
पा। पुणे
राजश्री व कृष्णाजी चावरे
मोकदम मौजे वाळुज पा। पुणे
चांदखान मोकदम मौजे
नाविली पा। सुपे
बापाजी कुतवल मोकदम
मौजे आंबी खुर्द पा। पुणे
आबाजी पाटील जगदले
मोकदम मौजे गराडे ता। करेपठार
समस्त बलुते मौजे मा।र
रत्नोजी बेडा मौजे परिंचे
ता। निरथडी पा। पुणे

(सर्वे) का सासवड
अग्रवादी खंडोजी गरुड पा
मौजे बेलसर का सासवड
तकरीर केली यैसी जे आपली
पुरातन मोकदमी होती त्यास
आपण चाकरमाने विज्यापुर
प्रांते मसलतीस गेलो
मागे माली जगथाप मुतालिक
ठेउन चाकरीस गेलो तसात
आठ डोईपावेतो गेलो मागे मुतालीक
बलावले हे वर्तमान
आम्हास कलले मग चाकरी
टाकून गावास आलो तो
माली जगथाप भांडो लागले
भाडत भाडत मोरेचुरे + + त
गेले आपण चाकर माने आपणास
वतनाचे तुख ? ठावके
नाही मग आपण हुजूर राजश्री
महाराज साहेबांपासी
जाऊन जगथापास तलब
करून नेले मग हुजरून
गोत मुपे देशमुख देशपाडिये
देशक मोकदम देहाये निवाडि
यासी दिल्हे मग गोतानी
आपला करिना मनास आणून
जमान घेऊन निवाडा करावयाचा
तह केला तरी तुम्ही
पंचाइतानी सांगितले की भोवरगाव
गावीचे बलुते ( जे ) सांगतील
ते यैकोन या ( सी )
जो कोण्ही इस्कील करील
तो दिवाणची गुन्हगारी
देऊन वतना वेगला ( अ ) सो

या विदायमाने तकरीर केली बिा ता
पछमवादी मावजी जगथाप
माली मोकदम मौजे बेलसर
का सासवडी तकरीर केली
ऐसी जे आपली पुरातन
मोकदमी आजीवर चालत
आली आहे गरुड आपणास
ठावके नाहीत अगर
आपणास मुतालिक ठेऊन
गेले नाहीत आपली मोकदमी
खरी आहे यासी खोटे
जालो तरी दिवाणची गुन्हेगारी
देऊ वतनावेगले होऊ
हे तकरीर लिहिली सही

वतनास समंध नाही हे
तकरीर लिहिली सही——

———

ले. ६४१ } {श. {इ.

भिउजी मोकदम मौजे पलसदेऊ (ना. चि.)
फिरगोजी मोकदम
मौजे निरगुडे
माऊजी मोकदम मौजे काझड

सटवोजी देवकर व सटवाजी धुला मौजे वरकुटे बुा
कालोजी
व
सुभानजी मोकदम मौजे सेलगाऊ

या विद्यमान महजर जाला यैसाजे पाा मजकुरीची देसमुखी कदीम सबजी वलद माहादजी व बाजी वलद रुपाजी देवकर देसमुखी पिढी दर पिढी खात आले दरम्यानें उमाजी वलद सबाजी भोसले त्यास विज्यापूर तरफेन जागीर होती त्यांनी देसमुखावरी धामधूम केली देसमुखी जोरावारीने घेतली खावद कदीम देसमुख सबाजी व बाजी देस [मुख] यासी मारून बाहीर घातले त्याची जागीर होती तोवरी देसमुखी खादली त्यावरी पातशाही अमल जाल्यावरी कदीम देसमुख परागदा होऊन गेले होते म्हणौन पाा मजकुरास जे जागीरदार जाले त्यानीं तनाखियामधे देसमुखी खात आले यावरी सन १०९३ कारणे कदीम देसमुख हजूर पासीं उभे राहिले खान अजम हाबीबुलाखान जागीरदार यासी हुकूम आणिला की कदीम देसमुखाचे मुले वतन करणे यावरून देसपाडे व मोकदम व हाली मवाली बोलाउन हकिकत मनास आणून देसमुखी कदीम देसमुखाचे दुमाले केली असे कदीम देसमुख सबाजी व बाजी देसमुख वतन खात असेती हा महजर सही

———

ले. ६४२ } {श. {इ.

साजन

श्री राजमान्य राजेश्री दामाजी पटील व सुभानजी पटील मौजे सिखाड प्रती येसूबाईने आशीर्वाद येथील क्षेम जाणून तुम्ही आपले क्षेम लिहिले पाहिजे रा गोसावी आले आहेत हे कितेक वर्तमान सांगतील त्यावरून कलो येईल सुभानजी माळी याकडे आपले रुा सात आहेत त्यास दहा बारा वरासे जाली आहेत तरी त्या ताकीद रा गोसावी यास व्याज समवेत हिसेबू करून पावते करणे पावते होत नाही तरी माणूस पाठवून त्याचे बेइजत करून पैका तो घेऊन तुम्ही मग गोस्टी ठेवाल की आपणास पत्र लिहिले नाही म्हणून तुम्हास सूचना मात्र लिहिली आहे त्यास ताकीद करून पैसे गोसावीस पावते कीजे व हौसाजी

लोहकरे त्यासी पटा केला होता त्यापैकी त्यावरी रुा पाच राहिले आहेत त्यासही बहुत दिवस जाहाले त्यास ताकीद करून ते पैके देविले पाहिजे रोा गोसावी यास पावलेचे उत्तर पाठविजे बहुत लिहिणे नलगे मोा

---

ले.६४३ } { श. १६०६ इ. १६८४

इजत असार देसमुख व गोविंद कान्हो व गोमाजी सुरो देसपांडे पाा इंदापूर सुाा सन हजार १०९४ यासि मलारी चोपदार मिर्धा कचेरी बारामती कागद लेहून दिधला येसाजे पाा माा साल तागाईत मोगलाई जाली ते साल पासून बारामतीचे कचेरीस. ( अपूर्ण )

---

ले.६४४ } { श. १६१० ज्येष्ठ शु. ८ इ. १६८८ मे २७

## शिराळे-देसाई,

श्री.

आज्ञापत्र धर्माभिमान कर्मकांड परायण दैवतीकनिस्टग्राहिताभिमान सत्यसध समस्त राजकार्यधुरंधुर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कविकलश छंदोगामात्य ताहां तुळाजी देसाई प्राा सिराले सुाा तिसा समानीन अलफु तुजकडे हाा वारणा कडेत पैकी हुजूरदफ्तरी बाकी वोढत आहे त्या पैकी बद्दल देणे ऐवज दाणा पागा सरसुभा राजश्री सेनापति गला केली नवसरी सोळुले माप खंडी १० दाहा रास देविले असत खुद निसबतपैकी आदा करून पावलियाचा कागद घेणे जाणिजे छ ७ शाबान मलकापुरी पागा मारनिलेकडील छावणीस आहे तेथे देणे पावलियाचा कागद खुद मारचा घेणे पाा हुजूर ( वा. मो. )

बार सुरु सुद बार

---

ले. ६४५ } { श. १६१० भाद्र. व. २ इ. १६८७ सप्टें. ८

श्री.

आज्ञापत्र राजमान्य राजश्री कविकलश छंदोगामात्य ताा तुलाजी देसाई पाा सिराले सुाा तिसा समानीन अलफ तुजकडे बाबती कर्ज सरदेसमुखी देऊं आहे गला खंडी २० पैकी बद्दल देणे खर्चास मिरबातखान दिलेलखानाचा भाऊ हुजूर आहे त्यास तकर्दीम होन पाा ४० चाळीस होन रास देविले असेत रवैशप्रमाणे आदा करणे पावलियाचा कागद घेणे जाणिजे राा छ १५ जिलकाद आज्ञा प्रमाण ( वा. मो. )

बार सुरु सुद बार

---

ले. ६४६ } {श. १६१० कार्तिक व. ९
{इ. १६८८ नोव्हें. ता. १८

यादिदस्ती आसामी कदीम व जदीद पेठ का इंदापूर सुा सन हजार १०९९ छ २२ मोहरम

आा ११३

| कदीम | जदीद |
|---|---|
| ३ सराफ | ५ सराफ |
| १ माणकोजी | १ विठोजी पढे |
| १ कुसावा | १ नारो त्रिमल |
| १ रामाजीम | १ विसाजी |
| ३ | १ माणकोजीम |
| १ सोनार | १ केशव शकर |
| १ जिवाजी पाटे | ५ |
| ५ तेली | २ सोनार |
| १ मलाजी बाजी | १ निबाजी |
| १ विठोजी पते | १ जिवाजी मार |
| १ रघू मेहतर | ९ तेली |
| १ | १ मकाजी पो |
| १ संताजी | १ यमाजी तेली |
| + + + | १ खडोजी बा+ |
| १ गोविंद गुरव | १ मादाजी |
| १ नरसू | १ गणोजी |
| १ राचपा | १ + + + |
| १ सिवजाद | १ मकाजी |
| १ सबजी | १ रामजी |
| ५ | १ भिकाजी |
| २ दरजी | ९ |
| १ आबाजी मा + | |
| १ सिवाजी खुर्द | |
| २ | |

( अपूर्ण )

ले. ६४७

श. १६१२ वैशाख व. २
इ. १६९० मे १५
नकल

## बेडसिंगे-पाटील.

( फा. वा. शिक्का )

ई कौलनामा अज दिवाण ठाणे पा इंदापूर ता मोकदमानी मौजे बेडसिंगे पा मार सुा सन हाजार १०९९ दादे कौलनामा ऐसाजे तुमचे बाबे देसमुख देसपाडे पा मार मालूम केले जे साल गुा जागीरदारानी व फौजदारानी खलल करून बेऐवजी टका घेतला रयेत फरारी जाहाली कहत पडले यावरी हजरत मेहरबान होऊन कौलनामा करून आमीन मोकरूर केले यावरू (न) (मोक) दम मजकूर तलास करून लावणी केली त्यास पेसजी आमल जानोजी राजे पालकर वसुले जाहाले हाली जमाबदीचे वख्त साहेबास जागीर जाहाली तरी साहेबी रयेतीचे जिवने पाहोन जमा मुशकस करणे म्हणौन मालूम केलें बराये मालुमाती खातेरीस· आणून मारफत सैद कासमि आमीन जमाबदी माल सायेर खरीफ व रबी कुलबाब कुलकानू बेरीज रुपये २७९ मो दोनिसे यकोण

आमल जानोजी राजे पालकर गुा गोविंदराऊ सेखदार रुा २४७

आमलखान साहेब मारफत येशवतराऊ सेखदार रुा ३२

सदरहूप्रमाणे साल तमाम जमाबदी मुशकस केली आसे खातीरजमा राखोन कीर्दी आबादानी करणे माो सुद (ल. व. मो.)
छ १५ माहे साबान.

---

ले. ६४८

श. १६१३ फाल्गुन व. १४
इ. १६९२ मार्च ६

## सिरसवडे-पाटील.

( फा. बदा. शि. )

ई कौलनामा ता मोकदमानी मौजे सिरसवड पा इंदापूर सुा सन हजार ११०१ दादे कौलनामा यैसाजे तुम्हांस मौजे मजकुरीची जमाबदी साल मजकुराकारणे चुकवाव· याबदल तुम्हास हुजूर बोलाविले की जमाबदी चुकवणे येसियासि पा मा देसमुख व देसपाडे इही येउनू मालूम केले की गुदस्ता मौजे मजकुरीची जमाबदी मुसेकस मोकरर रुा ३१५ तीनसे दा (?) जाहाली आहे सालमजकुराकारणे पाऊस मा (पा) णी नाही व पीक आमदानी नाही याकरिता रयेतेत काही तकवा राहिला नाही साल मजकुरा [का] रणे साहेबास जाहागीर जाहाली आहे तर साहेबी रयेतेचा जीवन पाहून रयेत राहे आणि साहेबाची कीर्दी होये यैसी जमाबदी साल मजकुराकारणे जमाबदी चुकविली पाहिजे

म्हणऊन बहूत बाजीद होऊन अर्ज केला बरांये मालुमाती खा [ ते ] रसी आणून साल-मजकुराकारणे ई......रुा ६० साठी करून येकून जमाबदी मुसकस रुा ३७५ पावणे-च्यारीसे रास करून तुम्हास कौल मऱ्हामत केला आसे तर तुम्ही आपली खातीरजमा राखोन मौजे मजकुरीची कीर्दी मामुरी करून सुखी असणे कोणे बाबे शक आदेशा न धरणे दर्राबाब कौल आस जाणिजे मोर्तबु सुद ( फा. ल. व. मो. )
तेरीख २७ माहे जमादिलाखर

---

ले. ६४९ { श. १६१४ भाद्र. शु. १३
इ. १६९२ सप्टे. १३

( वरील पाव बंद गाहाळ )

गणोजी पटवारी का मार याची लेक मौजे तावबे का वेलापूर तेथे होती यास माणिक वेडे कान्हापुरीस स्वार होते त्या स्वारास नालबदी कबूल करून गणोजीची लेकी जोरावारीने काढिली जंगलात नेउनू पाटोदेयाच्या कुलकर्णी याच्या हवाला केली दो ती दिवसा मुलीस आणून घातले जोरावारीने लगीन लाविले हे खबर हजूर जाहीर जाली यावरी नफर मारास ठाणियासि आणून तंबी केले तबी करून रुपये ३०० तीनसे गुन्हेगारी सिरी ठेविली सा महिने कैदत ठेविले सदरहू गुन्हेगारी वसूल नव्हे दोनी तीन मार केले रुका वसूल जाला नाही नफरे मार बद मामली आजी तवान मरो लागले मग देसमुख व देसपाडे पा मार हजूर येऊन आर्ज केला जे नफर मार नातवान आहे येक रुका वसूल होणार नाही.........काये तीनसे कोठून येतील बाजीद होऊन गुन्हेगारी रुपये ६० साठी मुकरर केले पैकिया वायेदा करून येक तटू कुमाईत रंग मुकरर उमेदीस बोरकरडा होईल ऐसे तटू आणिले यास देसमूख व देसपाडे वगैरे आर्ज करून सदरहू तटू सरकारांत देऊनू नफर मारास खलास केले तेरीख ११ माहे मोहरम सन ३६ जलूस.

दा सकराजी देसमुख — दा राघोजी को .........
पा मा — आ मानधाता देसमुख

( वा ) सकराजी
देसमुख (नांगराचें चित्र)

---

ले ६५० { श. १६२२ मार्ग. व. १
इ. १७०० डिसें. १५

( फा. लं. व. शिक्का. )

येकलास असार देस. व देसपा. पा इदापूर सुा११११२मालूम दानद तुम्ही अर्जदास पाठविली हाकिकती मालूम जाहाली लिहिले की प्रतापजीचे आमिलानी दोही दिल्ही आम्ही काये करावे ऐसे मालूम जाहले की पातशाहाजीचा हुकमापरीस प्रतापजीच्या आमिलाचा हुकूम तुम्हास जादा ऐसा दिसोन आले काही महसूलस केली पायेमालीबदल गेले

व रयतेने मोहिले हाली महसूल रयत बाहिरेचे बाहीर घेऊन जाती आम्ही तो पातशाहाजीचे हुकुमावरून बैसलो आहो तुम्हास कोण्हाची सनद आगर वकिलाचे लिहिले आले आहे त्याची काजीचे मोहरेनसी आम्हापासी पाठऊन देणे आम्ही आपल्या खावदापासी पाठऊन देऊ आसो यैसे होये की आजी हगाम तुम्ही आपला गुमास्ता पाठऊन देणे की टका वसूल करून सावकाराचे घेरी आमानत ठेऊन पेस्तर ज्याची सनद पोचल तो घेईल आगर यैसे न होये किमान तफरका होये साजिल हाल टका निमे आहे आम्हास रयतीसी दरकार नाही पेस्तर रयतेस तगादा लावाल आम्हास रयेतीस गरज नाही टकियाचा जबाब तुम्हास करणे लागेल तुम्ही जमीदार आहा मुलकातील दस्तूर आहे की टका जमा करून साहुकाराचेथे ठेवितातो तो दस्तूर तुमचा नाही तुमचा आणि कच दस्तूर मालूम होऊन आला बरे तुम्ही धनी आहा रा छ १५ माहे रजब पहिले येक दोनी मोर्तबे तुम्हास लिहिले आता निदान जाणोन तुम्हास लिहिले इतकियावरी आमची हाद जाहाली मालुम होये मो सुद

---

ले. ६५१ } {श. १६३४ आषाढ शु. ११ | इ. १७१२ जुलै ३}

( फा. चौ. शि. )

ताा रायाजी जाधव व सताजी जाधव मौजे परिचे ठाणे वाल्हे ताा नीरथडी सुाा ११२२ मालुम-दाद की तुम्हाकडे साल गुााची बाकी मौजे मजकूरची आहे ते देखत रोखा हुजूर येऊन वारून जाणे उजूर न करणे या कामास प्यादे पाठविले यास मसाला रुपये ४ च्यार देणे (उजू) र न करणे ताा छ ९ जााखर मोर्तब सुद ( वा. मो. )

हजू सुरनिवीस

---

श्री

ले. ६५२ } {श. १६४६ आषाढ शु. १३ | इ. १७२४ जून २३}

साक्ष श्री पलसनाथ आसे

(वा. फा. शिक्का)

राजश्री जीवनराऊ शकर विपट मोकदम तरफ तिसरी मौजे गोकली पाा इदापूर यास कालोजी वलद रामाजी काले मोकदम मौजे पलसदेऊ पाा मार सुाा सन हजार ११३४ कारणे कागद लेहून दिधला यैसाजे मौजे मारीची मोकदमी तिसरी तकसीम काली व पाढरी तुम्हास सेटियाजी वलद बिरोजी वागमोडे मोकदम मौजे मजकूर यानी करून दिधली आहे त्यास वर्तणुकेस त्याचे तरफने आपण धणी जमान असो सेटियाजी वलद बिरोजी वागमोडे माा मौजे मार तुम्हासी वोशपरपरेने त्याचे कोणी मुजाहिम होईल त्यास आपण वौशपरपरेने वारून न वारू तर तुमच्या वतनाच्या जाब करू हा कागद लेहून दिधला सही यास आन्येथा होणार नाही छ १२ सवाल वली सुमार १६

( नां. चित्र )

गोही

| | | |
|---|---|---|
| चागोजी वलद बाऊजी वणजोर दराडे मो॥ मौजे आकोले पा॥ मा॥र | माणकोजी वलद मुधोजी पा॥ मोकदम मौजे लाकडी पा॥ मा॥र | |
| राणोजी वा॥ जोगोजी कनेरकर पा॥ मौजे भादल वाडी पा॥ मा॥र | कान्होजी वा॥ बाबजी खलात मोकदम मौजे पिपरी खुर्द पा॥ मा॥र | |
| माणकोजी वा॥ विठोजी गलडे चौगुले का॥ मा॥र | नाईकवाडी पा॥ मा॥र | |
| | सुलतानखान वा॥ सैदखान | परसोजी वा॥ निकम |
| | जिवाजी गाइकवाड नाइकवाडी | कुसाजी पोवार नाइकवाडी |
| | मालोजी गाइकवाड नाइकवाडी | |

---

## काझड-पाटील.

ले. ६५३ } {श. १६८३ कार्तिक शु. ४ / इ. १७६१ आक्टो. ३१

श्री

तकरील कर्दे बा॥ लखोजी पा॥ बि॥ मालूजी पा॥ नरोटे मो॥ मौजे काझड प्रा॥ इदापूर सु॥ सन ११६२ कारणे साहेबांचे सेवेसी तकरीर केली यैसाजे आपला मूल पुरुश लखाजी बावा थोरला त्याचे पोटी सांतान नवते मग पराजी पाटलाचा लेक सिदोजी घेतला त्याने मोकदमी केली त्याचे पोटी लखाजी पा॥ जाला त्याने मोकदमी केली त्यावर गांवावर रा॥ दादो कोंडदेव याची स्वारी आली तेव्हा जुज जाले त्यामध्ये त्याच्या पुतन्या पडला त्यामुळें लखाजी पा॥ धरून आणिले तेव्हा खुनास खून यावासा जाला तेव्हां तुकोजी पा॥ भालेरायाचे विल्हेचा तो धाऊन आला लखाजी पाटलासी बोलिला जे मी खून देतो मी मेलो तरी माझी मुलेलेकरे पाससील आणि पाटिलकीहि राखसील आणि तुला मारले राहनार नाही आज मुलेमानसेही जगनार नाहीत यैसा विचार करून मग तुकोजीस मारले मग त्याची मुले लेकराचे चालविले आणि लखाजी पाटलानें मोकदमी केली ते वेळेस

आवघेच भाऊ होते परंतु कटकट नाहीं लखाजीचे म्हातारपण पोटी काहीं नाहीं तेंव्हा आंबाजीचे लेक रायाजी वडील त्याहून धाकटा माऊजी व त्याहून धाकटा मकाजी मग लखाजी पाटलाने माऊजी घेतला त्यांनेंही मोकादमी केली पुढे लखाजी पाटलांचे सोयरे धायरे होते त्यानी आणके जागा जऊन गाव मारून आणिला तें कांझडच्या राणांत येऊन राहिले त्यासी लखाजी पाटलाची बाइको रखमाई भाकरी घेऊन गेली गांव मारून आणिला त्याचें लागें होतें त्यानी ही बाइको गावची पाटलीन सि टी की कडील दिवाणात फिरांद करून रखमाबाईस धरून नेले तेंव्हां रायाजी व मकाजी पाटलास विचारलें म्हातारीस सोडवावयाचें कार्ये करावें त्यानी जाब दिल्हा जे तुझी आई तू मोकदमीचा खावंद आहेस आम्हास काये पुसोतोस सोडउन आणी आगर बंधात ठेव मग माउजी पाटलाने नवसे रुा देऊन सोडून आणिली पाटिलकी करीत्तच होते मग पुढें आरधेलीची धनीन तुकाई पळोन बांधाटीस गेली गावची बाकी होती यास नसरकर जाखोजी पा जमान होता तेंव्हां दिवाणच्यानी जाखोजी पा धरून आणून सात आठ महिने इंदापुरी बंदी होता तेंव्हा तो बोलिला जे मजला सोडऊन ने किंवा तुकाईची आरधेल मजला लेहून दे तेंव्हां भावास विचारिले तेंव्हां मकाजी सामील जाला त्याने तीनसे रुा दिल्हे बाकी चौदासे रुा माऊजीने देऊन सतराष्याचा कागद काढून घेतला तेंव्हांही रायाजी पाटील होता परंतु त्यानेंही काही हात लाऊन लागला नाहीं मोकदमी माऊजीच करीत आला माऊजी पा मेलियावर माऊजी पाटलाचा पुत्र निबाजी पा त्याचे बाइको पारावा तिने मांग गुमास्ता टेऊन केली तेंव्हाही आवघेच भाऊ होते त्यावरी वस्ती फुटली मुलकावर आवघीच गेली त्यावर काल जानोजी नाइकाचे वेलेस गांव भरला ते वेलेपासून आरधलीचा सुलतानजी आणि आबाजी गाव चालवीत होते मग आबाजी पा व सुलतानजी पा मकाजी पाटलाचा नातू येसे उदगिरीस येऊन आपल्यास घेऊन आले जे गावांत कुफराना उठिला आहे मोकदमी चालली मग आपन गावास येताच भिवाई तारामली सातारियासी गेली यावर गांवांत सातीचे मेंढरे मारली त्याच्या मुंढ्या आपण घेऊन आलो तेंव्हां आवघेच भाऊ होते तेंव्हा सुलतानजी मकाजी पाटलाचा नातू त्याने सिव माली यासि काठीने मारलें जे तूच कुफूर करितोस मग सिव माली रुसून घरी बैसला मग सुलतानजी आर्धलीचा व सुलतानजी मकाजी बावाचा नातू व आबाजी पा मिळोन सिव माली यांसि मुंडासें बांधोन समजावीस केली पुढे दसरा आला तेंव्हां गाव लोकानीं मोकदमीचे मेंढरु वेसीपासी डाक्यास बाधले आवघेच भाऊ आहा जो मोकदम आसल त्याने घेऊन जावे मग आपन घरींच होतो तो दोघे सुलतानजी व आबाजी पा येसे मिळोन बकरे सोडून माहाराचे डोईवरी देऊ(न) आमच्या घरास पाठविले तेंव्हां आपन बेकरे मारून जेवायासि केले तेंव्हां आवघेच भाऊ जेवायासि आले तेंव्हां काही कटकट जाली नाही त्यावर जीवनरायासी भेटावयासि सुलतानजी आरधलीचा व आपन आलों त्यासि सुलतानजीनें रा धोंडोपंत बावास सांगितले जे माउजी मोकदमाचा लेक त्यासि सिरपाव द्यावा तेंव्हां धोंडोपतबावा बोलिले जें आपणासही ठाऊक आहे कोटात जाऊन सिरपाव देवितो

मग जीवनरायाकडे नेऊन आपल्यास सिरपाव देविला तेव्हांही कटकट नाही त्यावर आबाजी व सुलतानजी व मकाजी पाटलाचा दूर सुपाकडे गेले त्यावर सचीवपंताचा दंगा जाला मग आपन उठोन गेलो त्यावर आलिकडे आबाजी पा। याने व सुलतानजीने गाव भरला यावर सुलतानजी कटफलास गेला तेथून आलियावर तोही मेला त्यावर आपन गावास आलों आहों आपली मोकदमी हे खरे यैसियासि पूर्वी जेव्हा आपला वडील मावजीबावा दिल्हा त्यावर पुढे मावजी बावा गेले रायाजीबावा व मकाजी बावा आपल्या माये बापापासी होते त्यावेलेस त्याची आई सताई बोल्ली जे तुम्ही तिघे लेक माझे पोटी निरमान जाला पुढे तुझे कपाली मोकदमी होती तें तुजकडे गेली परंतु माझा हेत आहे जे आपण जिवे आहे तोवर मजकडे सिरालसेत व होलीची पोली मी बाधीन मज माघाऱ्या तूच आहेस यैसे तिने आपला जीव आहे तोवर मागून घेतले तैसी सिरालसेट व होलीची पोली तैसीच आबाजी पा। रायाजी पाटलाचे लेक याजकडे राहिली पुढें भाउ म्हणऊन माये करितां माऊजी पा। काही बोलला नाही आता आमोजी कटकट करावयासि उठला आहे माघे पुढें कोन्ही कटकट केली नाही हे समाकूल पाढरीस ठाऊक आहे त्यास पाढरीच्या मुखे खरे करून देऊ हे तकरीर लिहून दिल्हे सही तेरीख २ माहे रबिलाखर

निा नागर

( नां. चित्र )

बिा नानाजी महादेव कुलकर्णी मौजे मजकूर

---

ले. ६५४ } श्री { श. १६७४ माघ शु. ३ | इ. १७५३ फेब्रुवारी. ६

तकरीरकीर्द बाो आमोजी पा। बिा जिवाजी पा। मो। काझड प्रा इंदापूर सुा सन हजार ११६२ कारणे साहेबाचे सेवेसी तकरीर लेहून दिली यैसजे आपला मूल पुरुष पराजी पा। मो। त्याचा वडील पुत्र जोनोजी पा। मो। त्याचा वडील पुत्र आबाजी पा। मो। थोरला त्याचा वडील पुत्र रायाजी पा। मो। त्याचा धाकटा भाऊ माऊजीबावा त्याऊन धाकटा मकाजीबावा यैसे तिघे पुत्र त्यास रायाजी पाटलाचा पुत्र वडील आबाजी पा। मो। त्याचा वडील पुत्र जिवाजी पा। मो। व त्याचा पुत्र वडील आमोजी पा। मो। व लखाजी व तुकोजी पा। याचे डोकसे मारले ते दादो कोंडयावा बा। थोरल्या आबाजी पा। त्याचे सके चुलत भाऊ पाचा भावातील धाकटा सिदोजी त्याचा लेक लखाजी त्यानें माऊजीबावा घेतला नाही त्याची साखरपाणे पाढरीमधे वाटली नाहीत त्यास आपन पाढरीच्या मुखे व भोवरगावच्या मुखे खरे करून देऊ त्यास आपला सिरालसेट व होलीची पोली व मोकदमीच हकदक आज तागाईत चालत आला आहे त्यास घुगरी व दाहीजमा व पाढरीचा कजिया आपल्या वडिलानी भावाबदास कोन्हास दिल्हा नाही हे पाढरीच्या मुखे खरे करून देऊ

लखाजीबावाचे नकल जाले तेव्हा त्याचा आद चावर व आबाजी पाटलाचा आद चावर यकून सेत चावर ४० चालीस बिघे भाऊपना ती ठाई चावर वाटून घेतला त्यास लखाजी-बावाचा मलाही ती ठाई वाटून घेतला त्यास धाकटा भावास घरे दिली त्यास आपले वडील बाहीर राहिले जेव्हा लखाजी पाटलाचे नकल जाले तेव्हा आपला पजा रायाजी पाटील माो लखाजीच्या घरात नाद्रू लागला त्यास आपनही आता नादत आहोत लखाजी-बावाची बायेको रखमावा तेही आबाजी पाटलाजवल पाच सात वरसे होती तिच्या पोटा-पानियाचे चालविले त्यास तीस देवज्ञा जाली तेव्हा तिला पाणीही आपला आजा आबाजी पा याने पाजले आपल्या देखता त्यास पाढरांच्या मुखे खरे करू देऊ भावानी जबरदस्तीने वतन खादले त्यासि कुडकम करून देसपाडे याचे कागद पत्र करून घेतले आ...ले व आपल्या घरीही कागद केले आसतीले त्यास आपन खावंद नाही थलचा कागद, पत्र आसला तर त्यास आपन रजावंद आसों त्याचाही निरनय पांच करनार हे तकरीर लेहून दिल्हे सही तेरीख छ २ माहे रबिलाखर वली ३७ बिा नानाजी माहादेव कुल [ क ] र्णी मौजे मजकूर

निशान नागर

( नां. चित्र )

---

## इंदापूर–काजी

ले. ६५५ } {श. १५४४ श्रावण व. ४ इ. १६२२ आगष्ट २५

(फा. वा. शि.)

अज दिवाण ठाणे पाा इदापूर ताा हुदे मोक० देहाये कसबे इदापूर व कसबे कलस पाा मजकूर बि० सुाा सलास इशरैन व अल्फ काजी हाफीज बिन काजी...खिजमती मसीद कसबे मजकूर येऊनू मालूम केले इनाम चावर ४८ दर सवाद देहाये

| | |
|---|---|
| कसबे मजकूर जमीन चावर बाा खिजमती मसीद कसबे मजकूर चावर तीन | कसबे कलस जमीन चावर येक बाा |

आपणासि इनाम आहे सरजाम होयें तरी इनामदाराचे बाबे देणे परगणे मजकूर कबज जालियावरी इनामदाराच्या हुजती भोगवटा तसुरुफाती खातिरेसी आणौमू दुमाल करून हुजूर अर्दास छ २४ रजब लिहिली त्याचा जबाब छ ७ माहे साबान सादर जाला जे इनामदार हुजूर पाठविजे हुजरून सरजाम होईल तेणेप्रमाणे आमल कीजे यावरून इसकील करूनु दुसरेन अर्जदास्त छ १९ रमजान लिहिले जे बाब छ २८ रमजान पैाा छ १७ माहे सव्वालु सादर जाला जे बाा फर्मान व खुाा राा ब इजानेब व भोगवटे व तसरुफाती चालत असेल तेणे प्रमाणे दुमाले कीजे म्हणौनु रजा सादीर जाली बाा रजा इनाम मोकरर केला आहे भोगवटा व तसरुफाती पेसजी पासुमू ताा सन इसने चालिले असेली ते रिती सदरहू प्रमाणे चालविजे तालिक० मोर्तब दरन माा दुमाले कीजे मोर्तब.( अ. मो. )

---

ले. ६५६ } { श. १५४४
{ इ. १६२२

( फा. वा. शि. व. मज. )

आज खिल्तखाने नवाजिस याफ्त हाये दरगाह जाहपन्हा ग + ला एक शिपाह येत मादत दौल्त लग आलिया अलजलये मौलाना अजम अलाग मौलाना बाबा खुली० ब० कार० पाा इंदापूर बि० सुहूरसन इसने आशरीन अलफ बो काजी हापीज मालुम केले जे आपणास इनाम......चावर १ जमीन दो मह० दरसवाद मौजे कल्स पाा मजकूर बाा फरमान व खुर्दखते वजिरानी कारकीर्द दर कारकीर्द चाल्त असे पाा मजकूर साहेबास मोकासा अर्जानी जाला महाली कारकून ... ... करितााति नजर० हक्कमन्हामती करावया रजा होये म्हणवुनू तरी काजी मशारुनुल्हेस सदरहू इनाम येक चावर जमीन बाा फरमान व खुर्दखते वजिरानी कारकीर्द दर कारकीर्द चालिले सारिखे तशरुफाती खातिरेसी आणवुनु बरहुकूम सालाबाद आयाम चालिले असेल तेणेप्रमाणे दुमाले करणे. तालीक० हरसाल०

रुजू दप्तर खास ( पाठीवर फारशी मजकूर )

मुतलेशुद्‌.

---

ले. ६५७ } ( फा. मज. ) { श.१५४७ मार्ग. व. ३
{ इ. १६२५डिसें. १९

अज दिवाण ठाणे पाा इदापूर ताा हुदे० व मोक ... ... बि. सुा सीत इसरीन व अलफ बाा खुर्द!... ... राा छ २८ रबिलवल तेथे मजमून की' काजी खोजा हुजूर काजी इमाद यानी पाा माा त्याने मौजे काटी परगणे मजकूर मसीदीचे भोगावटे तूप करून इनाम चावर १ + रोशनाई घेतले ता...कारकीर्दी अबदुल सत्राहवाल दरमानी हेही मसीदीचे खबर घेता खिजमती न करिता खातो येसे मालूम झाले होते मसीदीचे खिजमती आपले... कोली खिजमती करीत होते त्यावरील दरम्याने गुलोखाले कारकीर्दी मुल्ला महमद येदिलशाही ते वखती हा प्रती ...... इमादे होजमती घेतले यावरी महाल साहेबास मुकासा अर्जानी जाहला साहेबाचे कारकून महालास ...... तेही आपले हवाली केली आहे खिजमती करितो साहेब हत्ती ... ... म्हन्हामती होये काजी ...... याचे हवाली खिजमती मसीदीचे केली आहे तरी खिजमती घेऊन इनाम व रोशनाई सालाबाद ताा सन सलास इसरीन भोगवटे तसरुफाती चालिले असेल ते रीती यास चालविजे जीर्द माहा नावे भोगवटे आहे की त्याचा उजूर न कीजे दर हर० तालीक०: सादजी छ २८

( अस्पष्ट मो. )

---

ले. ६५८ } { श. १५५३ कार्तिक शु. १५
{ इ. १६३१ आक्टो. २९

( फा. वा. शि. )

अज दिवाण किले फत्तेमगल ता। हुदे० व मोक० व खोतानी माहाल जकाती पेठ किले मा। बि० की हर्चा सुा। इसने सलासीन अलफ बा। खुा। रा। छ १२ रबिलाखर पा। छ १३ मिनहू सादर जाले तेथे रजा जे बा। मुला सैन बिन मुला अतासीन...किले मा। हुजूर येऊन माळूम केले जे आपले खिजमती मसीद इनाम जमीन चावर येक दर सवाद कसबे मजकूर व अबा सैद हाली किले मा। मुकासा साहेबास...ताजा खुर्दखत मऱ्हामती करावया रजा होये म्हणौनू तरी इनामदार मा।चे भोगवटे व तसरुफाती खातिरेसी आणऊनू सदरहू प्रमाणे सालबाद चालिले आसेल तेणेप्रमाणे चालविजे दर हर० तालीक० म्हणऊनू रजा रजेबा। अमळ कीजे मोर्तब ( अ. मो. )

---

ले. ६५९ } { श. १५५९ आश्विन शु. ९
{ इ. १६३७ आक्टो. १७

आज दिवाण ठाणे बायवडे पा। इदापूर ता। हुद्देदारानी व मोकदमानी देहाये कसबे मा। सुा। समान सलासिन अलफ + + रा। छ २९ माहे रबिलोवल पा। छ ८ जमादिलोवल सादर जाहले तेथे रजे बा। काजी अबन बिन काजी हाफीज परा मा। हुजूर

आपणा इनाम ...........सवाद मवाजे देह ता।

मौजे लासुर्णे

इनाम

मौजे पलसदेऊ

| | | | |
|---|---|---|---|
| जमीन चावर | तेल बदल | जमीन चावर | तेलब बदल रो ( श ) |
| गजशरायेनी | रोसनाई | गजशरायेनी | नाई दरोज वजन |
| १ | दरोज वजन ८८। | १ | ८८।- |

कसबे कलस

लाग

| | |
|---|---|
| जमीन चावर | तेल बा। रो |
| गजशारायेनी | सनाई वजनी |
| एक १ | ८८।- |

एकून चावर ३ तेल दररोज वजन ८८।।। तीन पाऊशेर सादील नख्तयाती व महसूल बाजे पट्टेया व वेठ बेगारी व फर्माये कुल व ता। गहदम चालिले आहे फर्मान व भोगवटियाचे ता। कागद आफ [ त ] फितरती करिता कागद गुम जाले गहदम भोगवटा आपणास आहे हली साहेबास मुकासा करियाती मा। अर्जानी जाला आहे महाली तरी दरीबाब सरजाम होये माळूम जाले तरी इनामदार मजकुरास सदरहूप्रमाणे इनाम देहाये मजकुरी गहदम साला-

बाद कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटा जाला असेल येसे बरवे रीती खातिरेस आणवुनु जेणेप्रमाणे चालिले असेली तेणेप्रमाणे इनामदार मजकुर देहाय मजकूर इनाम दुमाला कीजे औलाद० तालीक० दरहर० कागद गुम जाले याचे उजूर न कीजे भोगवटे पाहून दुमाला कीजे म्हणौनु रजा रजे बा। अमल कीजे मोरतब (वा. मो)

तेरीख ८ माहे जमादिलावल

---

ले. ६६० } {श. १५६२ फाल्गुन
इ. १६४१ फेब्रु.

द अज महल उलिया हजरत मरदेनी निशानिमुतक इफत वइजत हुजले गुजीन बरामर दे इस्रमत व बिसमत बिलकिश अलजमान खतीजे अल अवाटा धरत व खिदारत पना बी
(फा. शि.) (फा. शि.) हजरत साहेब दामत इफत
बत्ता बाता हासीर याफ्त

ब० कार० व देस० परगणे इंदापूर बि० शुहूर सन इहिदे अरबैन व अलफ दरीविला काजी अबन बिन काजी हाफीज सेकिन कसबे मजकूर हुजर० आपणासी इनाम बदल खिजमत मसाजिद कसबे मजकूर जमीन चावर ३ तिनी दरसवाद कसबे मा। प्रज लखमण धणगर देखील माह० व बाजे० बेठ व बेगार कुलबाब० सालांबाद कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटा तश्रुफत चालिले आहे हाली कसबे मजकूर साहेबासी मोकासा० नजर० दुबाला खुर्दखत महामत करणे तरी बिनाबरा० सदरहू इनाम दुबाला फर्माविले आहे देहाये ××× महाली भोगवटा व तसरुखत सालाबाद ता। दर साल गुदस्ता रुजू पाहून बदमा दस्तूर अज इस्तकबाल सन तेल मजकूर दुबाला कीजे दर० साल बसाल हमीं खुर्दखत रखा चाल· वीत जाणे तालीकं० बिदानंद बरहुकुम खुर्दखत ×××× (वा. मो.)
तेरीख माहे जिल्काद सन खमसैन अलफ

---

ले. ६६१ } (अ. मु.) {श. १५६८ आश्विन व. १२
इ. १६४६ आक्टो. २५

अजर० **सिवाजि** राजे दाम० ब० कार० व देस० इदापूर बि० सुा सबा अर्बेन अलफ बा। काजी सैद (?) सो। कसबे मा। हुजूर० आपणासि इनाम बदल खिजमती मसीद मुा। मौजे कारी पा। मा। बिता।

| | |
|---|---|
| जमीन बा। खिजमती मसीद | तेल बा। रोशनाई मसीद |
| चावर येक १८ | दररोज वजन पाऊशेर ८८।- |

दर सवाद मौजे मजकूर सालबाद बा। फरमाने व खुर्दखते वजिरानि व भोगवटे तसरुफाती ता। सन खमस चालत आले आहे. यांशी साल गुा। सन सीतामधें साहेबासी मुकासा

अर्जानी झाला ते वख्तीं आपण हुजूर येवुनु सदहु इनामाचें बाबें खुा घ्यावयासि फुरसती जाली नाही म्हणौनु साल गुा सन सीतामधे भोगवटा तुटला आहे हाली साहेबी नजर० सदहु इनाम आपणासि देविलिया माशिदींची खिजमती करून साहेबासि दुवा देवुनु मणौनु मालुम केले. तरी बो काजी सइद ना सा लास इ मा यासि इा बा खिजमती मशीद मौजे कारी पा मा बी ता [ येथें वरीलप्राो तपशील ] दर सवाद मौजे मा सालाबाद बा फरमान व खुा वाजिरानी भोगवटे तसरुफाती ता सन खमस आरबईन अलफ चालत आले आहे तेणेंप्रमाणें दिधले असे दुमाले कीजे साल गुा इा हुजूर आला नव्हता म्हणौनु भोगवटा नाहीं त्याचा उजूर न कीजे औलाद० दर हर० तालीक० फिराऊनू दीजे.

( ष ) मर्या
देयं विरा
जते
रुजू सुरु
निवीस

तेरीख २५ रमजान माहे रमजान सुरू सुरू

---

ले. ६६२

श. १५७० माघ शु. १२
इ. १६४९ जाने. १५

द अज सरकार फैज असार हू आली हजरत फुलीद जिलाल जलाल तहरीर याफ्त ब० बापोजी बावदेऊ ठाणदार व कार० व देस० पा इदापूर बि० सुा सन तिस्सा अरबैन अलफ दरीविले बाो मुला काजी अबन खिजमतगार मासिजिद मौजे निबगाऊ केकती पा मजकूर हुजूर आपणासीं इनाम बदल खिजमती मासिजिदे मजकूर जमीन चावर १ व बद्दल रोशनाइ मसीद तेल रोजीना दजन पाउशेर दरसवाद मौजे निबगाऊ केकती पा मजकूर बमाहसुलेसी बरहुकूम फर्मान निजामशाह व खुर्दखत मोकासाइयानी मार्जी रवा असे व भोगवटे चालिले आहे हाली पा मजकूर अली हजरत साहेबासी मोकासा० महाली कारकून० दरीबाब० बरफर्मान निजामशाह: जमीन चावर १ व तेल सदरहु रवा असे सदर खुर्दखत-मोकासाइयानी माजी खुर्दखत सरखवास दरसाल सुा सन सब्बा सलासीन अलफ व हरदूद खत घोरपडे यानी सुा सन खमस अरबैन अलफ चावर मजकूर रवा असे तेल रोशनाई जिकीर नाही बराये० मुला काजी आबन खिजमतगार मासिजिद मौजे मजकूर यासी इनाम बदल खिजमती जमीन चावर १ व तेल रोशनाई मसिजिद मजकूर मौजे निबगाऊ मजकूर जमीन बदल माहसुलेसी व तेल बरहुकूम फर्मान निजामशाह: दुमाला केला असे सदरहू दरदो कारकीर्दी भोगवटे कागदी तेल जिकीर मेहत गिरी करून ... कीजे दरहर० तालिक०

तेरीख ११ माहे मोहरम सन तिस्सा खमसैन अलफ

---

ले. ६६३ } {श. १५७१ आषाढ शु. ९
{इ. १६४९ जून ३०

(फा. शि.)

अज र० राजश्री त्रिंबकजी राजे साहेबु उजादौल ब० कार० देस० व हुदे० अमानत व अजहती मुकासाइयानि हाल व इस्तकबाल व मोक० कर्यांती बायेवाडे पा० इंदापूर बि० सुा खमसैन व अलफ बा काजी अबन बिन काजी हफीज इनामदार पा मार हुजूरू० आपणास इनाम बदल खिजमती मसीद दरसवाद देहाऐ का मा बा हुजूर कदीम सन समान सलासीन अलफ छ २९ रबिलोवल बिा (ले. ६५९ प्रो) येकून जमीन चावर तीन गज शरायेनी ३ व तेल वजनी पाऊणसेर ८८॥।- दरोज देखील नख्त० व बाजे पटिया व वेठी बिगारी व फरमासी व कुल० भोगवटे व तसरुफाती गहदम सालाबाद चालत आहे हली कारकून० तरी साहेबी मेहेरबान होउनु खुर्दखत मऱ्हामती केले पाहिजे म्हणवुनु दरीबाब० तरी काजी अबन बिन काजी हाफीज इनामदार बदल खिजमती मशीद दर सवाद बिता (ले. ६५९ प्रो) एकूण जमीन चावर तीन गजसरायनी व तेल रोसनाई वजन दरोज ८८॥।- देखील नख्त० व बाजे पटिया व वेठी बेगारी व फर्मासी कुल० भोगवटा व तसरुफाती बा खुा कदीम गहदम सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी जैसे चालिले असेली तेणे प्रमाणे दुमाले करीत जाणे अवलाद० दरहर० तालीक० मोर्तब सुद ( फा. ष. मो. )

रवा सुद

( पाठीवर १५।१६ ओळी फारशी मजकूर ) रुजू सुरु
नवीस

तेरीख २९ माहे जमादिलाखर
जमादिलाखर

———

ले.६६४ } {श. १५७५ मार्ग. शु १०
{इ. १६५३ नोव्हे. २०

( अ. मु. )

अज र० राजश्री सिवाजी राजे दाम० ब० कार० देश० पा इंदापूर बि० सुा अर्बा खमसैन अलफ दरीवि ( ले ) काजी अबन बिन काजी हाफीज इनामदार का मा हुजूर० आपणास इनाम बदल खिजमती मसीद व तेल बा रोषनाई दर सवाद का बायेवाडे पा मा बिता

(वा)श्री शिव न
पति र्हेष
निदान साम
राज मतिम
त प्रधान

| जमीन | | तेल बदल रोषनाई | |
|---|---|---|---|
| चावर गजशरायेनी | | मसीद दरोजीना | |
| येक | १८ | पाऊसे [र] | ८८।- |

येणेप्रमाणे बा फर्मान हुमायून व खुर्दखते वाजिरानी भोगवटे तसरुफाती कारकीर्दी दर कारकीर्दी चालिले आहे व साहेबास हाली मुकासा० माहाली कारकून–दुमाले खुर्दखत मऱ्हा–

मती करावया रजा होये म्हणौऊनु तरी बिनाबरा० सदरहू इनाम जमीन ( येथे वरील इनामाचा तपशील ) भोगवटे तसरुफाती बाा फर्मान व खुाा वजिरानी मुकासाइयानी कारकीर्दी दर कारकीर्दी जैसे चालिले असेली तेणे प्रमाणे मनासी आणून काजी माचे दुमाले करणे दर हर० तालीक०१

तेरीख ९ मोहरम

(ष) मर्या देयं विरा॰ जते

रुजू सुरू निवीस

---

ले. ६६५

श. १५७५
इ. १६५३-५४

अज र० राजश्री **सिवाजी** राजे दाम० ब० कार० व देश० पाा इंदापूर सुाा अरबा खमसैन अलफ दरीविले काजी हाफीज सेाा कसबे मजकूर हुजूर० आपणास ( इनाम वर्णन ले. ६६० प्रो ) बाा खुर्दखते व वजिरानी भोगवटे तशरुफाती चालिले आहे व साहेबाचे खुर्दखत सन सब्बा मध्ये छ २५ रमजानी चालिले आहे हाली साल मजकुराकारणे महाली कार० दरीबाब नजर० दुमाले खुाा मन्हामती करावया रजा होये म्हणवुनु तरी बिनाबरा० सदरहू काजी हाफीज सेाा काा माा यास इनाम बाा खिजमती मसीद काा माा ( येथें वरील इनामाचें पुन्हा वर्णन ) बाा हुाा वजिरानी भोगवटे तशरुफाती ताा साल गुाा चालिले असेली तेणेप्रमाणे मनासी आणुनु दुमाले करणे दर हर० तालिक० ( फा. ष. सी. )

रुजु सुरू नवीस

---

ले.६६६

श. १५८५ माघ शु. १
इ. १६६४ जाने. १९

( मराठी अस्पष्ट शिक्का )

अज दिवाण ठाणे कसबा इंदापूर ताा मोक० कसबे इंदापूर पाा माार सुाा अरबा सितैन अलफ बाा खुर्दखत राा छ २९ माहे जमादिलाखर सादर जाले. तेथे रजा जे दरीविले सैत खास फरास मुाा मशीद मुाा काा मजकूर हुजूर० आपणास इनाम बाब फराशी मशीद मजकूर बितफशील

इनाम जमीन चावर येक

दरसवाद काा मजकूर
देखील नख्त याती

दररोज दर सवाद मोईन
चौत्रे काा मजकूर

---

१ सनेदेतील अक्षरांत कोठेंही बदल नाहीं फक्त तेरीख ९ मोहरम ' निराळ्या वळणाचें

महसूल व तूप व | जोरी ८८॥
कडबा व वेठी बेगारी | बदल तेल रोजिना आडसेरी केली वजन ८८।
कुलबाब कलकानू दुमाले असे

येणेप्रमाणे भोगवटे व तशरिफाती कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आले दरम्याने कारकीर्दी **सिवाजी राजे भोसलियाचे** भोगवटा झाला नाहीं **हलीं पा जागीर अर्जानी साहेबास जाली आहे** तरी साहेबी मुदा रजा सदरहू इनाम देविला पाहिजे म्हणौन मालुम केले बराये० सदरहू इनाम दुमाले केला असे कारकीर्द दर कारकीर्द भोगवटे व तशरुफात चालिले असेल तेणेप्रमाणे दुमाले करणे दरम्याने शिवाजी राजे याचे कारकीर्दीस भोगवटा जाला नाही यासी उजूर नकरणें दर हर० तालीक०म्हणौन रजा सादर जाली रजे बरहुकम कसबे मजकुरी इनाम चावर १ येक कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटा व ताश्रिफाती चालिले असे तेणेप्रमाणे दुमाला करणें दरम्याने शिवाजी राजे याचे कारकीर्दीस भोगवटा झाला नाही याचा हुजूर न करणें तालीक०

---

ले. ६६७ | श. १५८५<br>इ. १६६३-६४

(अस्पष्ट मराठी शिक्का)

अज दिवाण ठाणा इदापूर ता मोक० व रयानी कसबे बायेवंडे पा मा सु । अरबा सितैन अलफ हुजुरून खुर्दखत रा छ १५ माहे ......सादर जाले तेथें रजा जे दरीविले काजी अबन वा काजी हाफीज हुजूर आपणास इनाम कसबे बायवडे पा मा कारकीर्दी मलिक अबर बदल खिजमती बितपसील ( ले.६६५प्रो. ) येणेप्रमाणे आपणास इनाम मलिक अबर दिधला होता यावरी मालिक अबर फौत जाहाल्यावरी आपणास भोगवटा जाहला नाही तरी साहेबी मेहेरबान होऊन खुदा रजा अजराम्हरामती केला पाहिजे म्हणौन मालुम केले बराये० सदरहू इनाम अजरामऱ्हामती ( अपूर्ण )

---

ले.६६८ | श. १५८५<br>इ १६६३-६४

(फारशी शिक्का)

अज र० खुदा० नबाब हिलालखान सायेबु (फा. शि.) खुली० ब० कार० पा इदापूर बि० सुा अरबा सितैन अलफ दरीविले काजी अबन हफीज सेकिन कसबे मजकूर हुजुर० आपणस इनाम(वर्णनले.६६० प्रो)दुमाले असे येणे प्रमाणे भोगवटा व तसरिफाती कारकिर्दी दर कारकिर्दी चालत आले दरम्याणे:कारकीर्दी **शिवाजी** भोसिल्याचा भोगवटा जाहाला नाही **हाली पा मार जागीर अर्जानी साहेबास जहाली आहे** तरी साहेबी खुद रजा

सदरहू इनाम देविला पाहिजे म्हणवुन मालूम केले बराये० सदरहू इनाम दुमाला केला असे कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आले दरम्याने शिवाजी राजे याचे कारकीर्दी भोगवटा जाहाला नाहीं याचा उजुर न करणे दर हर० तालीक० पाा हुजूर राा गणेश पंडित जबानी फतुला केस बार बार (ष. मो.) रुजु सुरनवीस

---

ले.६६९ } { श. १६११ माघ शु. ११
इ १६९० जाने. ११

(फा. शि.)

अज र० राजश्री नेतोजीराजे पालकर ब० कार० पाा इंदापूर सुाा सन हजार १०९९ बि० सइद कासीम फराग जुमा मशीद कसबे इंदापूर पाा मजकूर येवुनु मालुम केले जे आपलियास इनाम व रोजमुरा कारकीर्द दर कारकीर्द भोगवटा चालत आला आहे साहेबास मोकासा जाला आहे मेहरबान होवुनु खुर्दखत सादर केले पाहिजे म्हणवुनु मालूम केले तरी दर हरसाल सालाबाद चालत आले आहे तरी तुम्ही ही येणें प्रमाणें चालविणें बि॥ ( ले. ६६६ प्रो ) एकुण दररोज जोरी आधोली व तेल पाऊशेर वजन व चावर येक येणे प्रमाणे चालत आले असे तुम्ही ही येणेप्रमाणे चालविणे तालीक० उजूर न करणे ( ष. मो. )

तेरखि ९ रुजू सुरुनीवीस
रबिलाखर

---

ले.६७० } { श.१६१७ आषाढ शु. ५
इ. १६९५ जून ७

हजरत लतीफशा काजी इजत आसार आमिलानी देहाये पाा इंदापूर सुाा सन ११०६ मालूम दानत की मौजे अगोती पाा मजकूर आपली जागीर आहे त्यासी देह मजकूर इनाम........याचा आहे तर देह मजकुरास तुम्ही मुजाहीम न होणे अगर पेशजींच्या सनदेचा उजूर न करणें सालबसाल यांचा इनाम: चालत आला आहे तर कोन्हे बाबते यासि हरकत न करणे आणि साल बसाल ताजे सनदेचा उजूर न करणे या सनदेची नक्कल घेणे आणि हे सनद याचे हवाले करणे दरीबाब ताकीद आसे मोा

ताा ४ माहे
जिल्काद

---

ले.६७१ } { श.
इ.

फा. शि.

( फारशी मजकूर )

बाा सनदा पेसजी बाो मुला हुसेनशा वलद मुला जलाल वलद सेद बाा बे इदूर खिजमती फर्मान बाजीद इनाम रोजमोरा व रोशनाई बिताा

इनाम दर सवाद कसबे
मजकूर थल वोगी चावर ४
सेले २

पेठ मजकुरी......
चौत्रा पेठ मार बाजारात
रोजमोरा सेव फसक
जोरी केली तेल रोश
दरोज केली नाई द- बाहेरील गोणीस
पाईली रोज ब- मा ळ र सवासेर
८८॥ जन ८८॥

च्यारदी व मुव बाग
राणोजी कडा मोकदम का मार

| | | | |
|---|---|---|---|
| ताऊजी कन्हेरकर देसमुख पा मा १ | विठल बोपाजी देसपाडे पा मजकुर १ | माणकोजी गलदा चौगला का मार १ | न्होबा आमीन माहाजन का मार १ |
| भगवत माहाजन का पेठ मार १ | मकाजी तेली मे हतरा का मार १ | आबाजी खादट | हावजी खादट |
| मल्हारी खादट १ | सुभानजी गलडा १ | बहीरजी गलडा १ | म्हपाजी गलडा १ |
| बाबाजी घोरपडा १ | म्हकाजी कासीद १ | लिगोजी सर्डा १ | जिवाजी कन्हेरकर १ |
| माहादू सोनार १ | अनाजी सो १ | बरू माली मेहतरा १ | मक माली १ |
| भूत माली १ | आब माली १ | रघू माली १ | भिक माली १ |
| गद माली १ | राम माली १ | सेटी चाभार १ | निब बरघा माहार २ |

सदरहू प्रमाणे चालिले असे यास हरकत मुसल्मान करील त्यास मकेची अण व हिंदूस कासींची अण असे

सन ४६ तेरीख १२ रजब नि॥ नागर

( ना. चि. )

---

ले. ६७२ } { श.१६५८ माघ व. ६
इ.१७३७ फेब्रु.९

द मा अनाम देसमुख व देशपांडे पा इंदापूर यासि देवराव मेघशाम सुा सबा

सलासीन मया व अलफ काजी हुसेनशा व महमदखान वलद जलालशाहा व

(क.व.)राजा शाहू छ- काजी आबन वलद कासीमशा सेकीन कसबे मार याणी
त्रपति स्वामी चर हुजूर सातारोच मुकामी राजश्री स्वामी सन्निध येऊन
णि तत्पर देवराव विनंती केली की का मजकरी वगैरे गांवी मसीदी आहेत
मेघशाम नी त्याचे खिजमतेबदल आपणास पूर्वीपासोन कसबा मजकुरी वगैरे
रंतर देहाये पा मार येथें इनाम जमिनी व तेल दरोबसे व नख्तयात
व अडसेरी व बाजे हकलाजिमा आहे त्याचे कागदपत्र आपणा-
जवळ आहेत कैलासवासी थोरले महाराज यापाशी आपला आजा काजी हफीज जाऊन इनामाची हकीकत विदित करून त्याची पत्रे घेऊन इनाम अनभवी त्यामागे आपले बापानेही अंनभविला आलीकडे आपणास खुलीत चालत नाही तरी माहाराज साहेबी हुजूरची पत्रे करून देऊन चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन विदित केले व पूर्वील पत्रे आणून हुजूर दाखविला तो राजश्री स्वामीनी मनास आणून तुम्हास हुजरून आज्ञापत्र सादर केले आहे तरी तुम्ही काजी मजकुरास मसीदीचे खिजमतेबदल का मजकुरी व गात्रगंना पा मजकर येथे इनाम जमीन असेल ते तहकीक करून हुजरून पत्रे आहेत त्याप्रो यांचे जमीन यांचे दुमाले करणे जाणिजे छ १९ सवाल पा हुजूर (वा) लेखन

सीमा

सुरूसुद

ले ६७३ } {श. १५२७ कार्तिक शु १२
इ. १६०५ आक्टो. १२

## किरकोळ.

दतपुत्र बिषई हे पत्र बतारीख छ १ माहे जमादिलाखर हजीर मज्यालस मौजे बोरी पा इदापूर सुा हजार १०१६.

मोकदमानी मार

| | |
|---|---|
| हेलोजी बिन कुमाजी पा मोकदम निमे मौजे मजकूर | बिा नारो सुरदेव कुलकरणी मौजे मजकूर |
| ( नां. चित्र ) | — मजकूर व प्र पुजारी |
| बोपाजी गाडेकर कुलवाडी मौजे मजकूर | विठोजी भांड मौजे मजकूर |
| सोन नाक माहार | सटव नाक मांग |

सीवधडे पाटील

| | |
|---|---|
| हणगोजी गौड मोकदम मौजे फोडसिरस का दहिगाऊ पा मान | लिगोजी रूप + + मोकदम मौजे कुरबावी का दहिगाऊ पा मान |
| ( ना. चित्र ) | ( नां-चित्र ) |
| लखाजी नरवटे मोकदम | संताजी मोकदम मौजे |

मौजे कान्नड पा इंदापूर
( ना. चित्र )

स्वातगाऊ पा कडेवलीत
( ना. चित्र )

या हुजुर सके स्वास्तिश्री सके १५२७ ( र ) क्ताक्षी नाम सवछर कार्तिक सुध २ रविवार त दिनी सेवेसी रखमाबाई वागमोड मोकदम मौजे मजकूर सेवेसी पत्र लिहिले ऐसजे- आपले भ्रतार भगतार्जी पा मोकदम निमे मौजे मजकूरचे असतां आपले पाटील पडले त्यांचे पुत्र संतान चौघेजण यांत वडल जनकोजी दुसरा विठोजी तिसरा जबाजी चौथा घुलोजी ऐस च्यार पुत्र आपणास त्यामध्ये वडल जणकोजी निमे आनभवीत होता त्यास देव आज्ञा जाली त्याचे पोटी संतान नव्हते त्याचे आस्री तुकाई बा (ग) मोड ती आपली सून लिंगोजी रणनवराची कन्या हे म्हणो लागली की आपले पोटी संतान नाही दिराचे पुत्र घेऊन नाव चालवावे तर त्या त्रिवर्गाचे पोटी सतान नाही यास्तव बिरोजी गौड फोडसिरस्कर याचा पुत्र घेते ऐसे बोलो लागली मग आपण व आपले तिघे पुत्री विचार करून घुलोजी पुत्र आपला चौथा होता तो तुकाईस दिल्हा जनकोजीचा लेक करून वसंगला घातला तुकाईचा दीर होता तो पुत्र केला आणि याचे पाणिग्रहण विव्हाह नावरूप तुकाईन करावे पुत्रान जणकोजीचे नाव नागर निमे मोकदमीचा करावा पुत्रापरी पाणिग्रहण करावे याउपरी पुढे वौसंपरपरेने जो कोन्ही हिला हरकत करील तो गोताचा अन्याई दिवाणचा गुणेगार जेव्हा घुलोजी तुकाईच्या वसंगला घातला तेव्हा दोघा पुत्रानी विठोजी व जबाजी यानी श्रीची सफत केली की आपले वौसेपरपरेन या म्हणौन चालावे यास चालावयास हरकत करील तो आमच्या विर्याचा नव्हे हे सफत असे सही.

---

ले ६७४

श. १५८५ चैत्र शु. ७
इ. १६६३ एप्रिल ४

श्री

राम राम

सिदी हिलाल साहेब

( वा. फा. शि. मज. )

राजश्री रताजी माने देसमुख व समस्त मोकदम कों म्हसवड गोसावी यास

ाद अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये—श्रोकित आनदराऊ मुतालीक देसमूख व कान्हो रखमागद व विसाजी रगनाथ देसकुलकर्णी व मालजी गवडे व सटवोजी गवली व वाल्होजी सरडे चौगुले व रायाजी काकाटे सेटे व दादाजी मालो माहाजन व समस्त माहानाड पेठ का इंदापूर विनती सुा सन सलास सितैन अलफ येथील क्षेम जाणौन स्वकीये लेखन केले पाहिजे विशेश आमच्या थलास तिमाजी विठल व सिवाजी हिरदेऊ

केसकर व बेजाजी बापजी येजुरवेदी उभयेता परगणे माण आठा कर्यातीच्या देसकुल-कर्णाच्या वादाबदल आले होते येसियासी त्या उभयेतांचा करिणा मनास आणितां उभयेता वादे आठा कर्यातीच्या सडीस राजी जाहाले त्यावरून आठा कर्यातीस सडी पाठविलिया की उभयेताचा करिणा आपले पूर्वज स्मरोन लेहून पाठवणे यैशा सडी पाठविलिया सडीची उतर आली की पूर्वापार केसकर देसकुलकर्णी परगणे माण खरे यांचे... माधेजन यासि मिरासीसी समध नाही यैसिया सडी आलिया सडीवरून इनसाफ पाहातां केसकर देसकुलकर्णी सडावद खरे येजुरवेदी मुतालिक सदरहू प्रा निवाडपत्र करावे तां होनाजी बावाजी व उदाजीपत येलापूरकर येजुरवेदी येथे येऊन आमचे हाकीम खान आजम—द्रव्ये खर्च करून हाकिमापासी आम्हा गोतास नेऊन येजुरवेदी याने कागद करून घेतला ये जातीचा करिणा जाहाला आहे गोसावी यासी कलावे म्हणौन लिहिले आसे विशेश काये लिहिणे तेरीख ५ माहे रमजान वली सुमार दिा सिरनामा ३८ आडतीस रास हे विनती.



# शिव--चरित्र--साहित्य खंड ३ रा.



## व्यक्तिस्थलसूची

## भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला.

**वि. सूः-ह्या मालेंतील ग्रंथ मोबदल्यांत मिळत नाहींत. परंतु क्रमांक सभासदांस विशेष सवलतीनें मिळतील.**

( १ ) मठगांवचा शिलालेख आणि ब्राह्मण सामंत राजवंश ( पृ. २४३ ) लेखक रा. ब. वा. अ. बांबर्डेकर. किं. रु. २, सभासदांस रु १-१४

( २ ) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् ( मूळ व भाषांतर ) पन्हाळ्यावरील शिवाजींची स्वारी. प्रकाशक-स. म. दिवेकर ( पृ. ५० ) किं. ॥० सभासदांस ॥८

( ३ ) श्री शिवभारत ( कवींद्र परमानन्दकृत ) मूळ व मराठी भाषांतर ( सं. व. प्र. स. म. दिवेकर. ) पृ. ५८९ किं. रु. ६ सभासदांस रु. ५ ॥१२

( ४ ) शिवचरीत्र-प्रदीप ( सं. द. वि. आपटे. व. स. म. दिवेकर, कागदी व कापडी. पृ. ३३५ किं. रु. ३॥ व ४, सभासदांस रु. ३। व ३॥

( ५ ) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला ( कै. रा. सा. कृ. वि. वझे ) पृ. २७०, किं. रु. ३ सभासदांस रु. २

( ६ )शिवकालीन जंत्री ( शके १५५१-१६४९ ) पृ. २०० किं. रु. ५

( ७ )साधन-चिकित्सा ( ले. वा. सि. बेन्द्रे. ) पृ.३२० किं.रु. ३॥ सभासदांस ३ रु.

( ८ ) ऐतिहासिक पोवाडे ( सं. य. न. केळकर- पृ. ६१५ किं. रु. ३, सभासदांस रु. २॥

( ९ )वाठारकर निंबाळकर-इतिहास ( पृ. ३०० ) किं. रु. १॥ सभासदांस १॥३

( १० ) भूतेश-आख्यान ( पृ. ७५ ) किंमत ॥१२ सभासदांस ॥१०

( ११ ) कऱ्हाड (ले. य. रा. गुप्ते. बी. ए. ) द्वि. आ. पृ. ५४ किं. ॥८

( १२ ) ऐतिहासिक प्रस्तावना ( कै. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ) पृ. ६०० किं. रु. ३ सभासदांस २ ॥६ ॥६

( १३ ते १६ ) तयार नाहींत.

( १७ ) पुरंदरे-दप्तर, भाग २ रा. ( उत्तर पेशवाईतील पत्रव्यवहार ), किं. ३ रु. सभासदांस २॥ रु.

( १८ ) " The Dlievarence or the Escape of Shivaji the Great from Agra ( R. S. G. K. Deshpande ) किं. रु. ३ सभासदांस २॥ रु.

( १९ ) लोक-कथा, पुस्तक १ लें ( शं. ग. दाते ) किं. रु. १ कागदी व१॥ रु. कापडी. सभासदास १४ आणे व १। रु.

( २० ) पानसे घराण्याचा इतिहास ( राव. ब. पानसे ) किंमत ३ रु. सभासदास रु. २॥

( २१ ) कै. वासुदेवशास्त्री खरे-चरित्र ( रा. दा. मो. भट ) किं. रु. २॥ सवलत २।≈

( २२ ) लोक-कथा, पुस्तक २ रें ( शं. ग. दाते ) किं. १ रु. सभासदांस ।॥≈

( २३ ) संपूर्ण-भूषण ( रा. गो. काटे ) किं १॥ रु. सभासदास १।

( २४ ) रायगड राजधानी-वि. वा. जोशी किं.

# भारत–इतिहास–संशोधक–मंडळ–स्वीय–ग्रंथमाला.

* अशी खूण केलेले ग्रंथ मुंबईसरकारनें प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकाल्यांसाठीं मंजूर केले आहेत. + या खुणेच्या पुस्तकांच्या किंमती दुर्मिळ म्हणून वाढविल्या आहेत.

| क्रमांक | किंमत रु. |
|---|---|
| १ अहवाल ( शके १८३२ ) | ३ |
| २ ” ( शके १८३३ ) | ५ |
| +३ सुबंतविचार(रा.वि.का.राजवाडे) | १० |
| ४ वार्षिक इतिवृत्त (शके १८३४) | |
| ५ मराठ्यांच्या इतिहासाची साधनें खंड १२(रा. राजवाडे) | १ऽ८ |
| *६ प्रथमसंमेलनवृत्त(शके१८३५) | ऽ१२ |
| *७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३६) | ३ |
| *८ द्वितीयसंमेलनवृत्त (शके१८३६) | ३ |
| *९ वार्षिक इतिवृत्त (शके १८३६) | ३ |
| *१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खं. २० (शिवकालीन घराणीं) | ३ |
| *११ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३७ ) | ६ |
| *१२ तृतीयसंमेलनवृत्त (शके १८३७) | ३ |
| *१३ मुकुंद–महाभाष्य ( संस्कृत ) | ऽ८ |
| *१४ ग्रंथराज ( दासोपंत ) ” | ऽ८ |
| *१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला | ऽ१२ |
| *१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा | ऽ१२ |
| भा. इ. सं. मं. १८४२।४३ १८४३।४४।४५।४६।४७।४८।४९।५०।५१ प्रत्येकीं | रु. ३ |

| क्रमांक | किंमत रु. |
|---|---|
| * १७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३८ ) | ३ |
| १८ चतुर्थसंमेलनवृत्त ( शके १८३८ ) | ४ |
| * १९ राजवाडे-खंड-स्थलसूची (१८३९) | ४ |
| * २० पंचमसंमेलनवृत्त ( शके १८३९ ) | ३ |
| २१ संशोधनसंग्रह (१८३९छा. आहे. ) | |
| २२ चंद्रचूड–दफ्तरकला १ | ३ |
| २३ महाराष्ट्रसारस्वत( संपलें ) | |
| २४ षष्ठसंमेलनवृत्त ( १८४० ) | ४ |
| २५ सप्तमसंमेलनवृत्त( १८४१ ) | ३ |
| २६ संशोधकांची छोटी जंत्री ( रा. द. वि. आपटे ) | ऽ४ |
| २७ प्रदर्शनपरिचय | ऽ४ |
| * २८ फारशी पत्रव्यवहार मूळ व भाषांतर ( कंपनी व पेशवे ) | ५ |
| २९ फार्शी-मराठी- कोश | ४ |
| ३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला | १ऽ८ |
| ३१ Historical Miscellany. | १ |
| ३२ पुरंदरे-दप्तर-भाग१ कृ. वा. पुरंदरे ( छत्रपतिराजाराम ते पानिपत अखेर) | ४ |
| ३३ शिवचरित्रसाहित्यखं. २ रा. | ४ |
| ३४ दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खं. १ व २ | |

टीपः—ट. हं. व. बंगी व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. घाऊक घेणारांस चांगलें कमिशन देऊं. माहितीपत्रक मागवा.

---

‘ त्रिशतसांवत्सरिक-शिवस्मारक-ग्रंथावली *’

| अनुक्रम | पुस्तकाचें नांव | | पृष्ठें | रु. आ. |
|---|---|---|---|---|
| १. | शिवकालीन-पत्र-सारसंग्रह खंड १ व खंड २ | | ७५२ | ७-० |
| २. | ×शिवाजी-निबंधावली | खंड १ कालविषयक | ३२८ | ३-८ |
| | | खंड २ चरित्रविषयक | ४२० | ३-८ |
| | | खंड ३ (वाढाव्याचा) कालविषयक | २९६ | ३-८ |
| ३. | शिव-चरित्र-साहित्य ( अस्सल पत्रें ) | पूर्व प्र. खंड १ | १४० | १-८ |
| | | खंड २ | ३०० | ४-० |
| | | खंड ३ | ३०० | ३-० |

४. Foreign Biographies of Shivaji.
by Dr. Sen. PP. 492+97 — १०-०

५. सचित्र शिव-चरित्र, श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि सं. औंधकृत, तीन खंड — ५-०

६. Shivaji Album by Dr. Balkishna, about 70 pictures. — २-०

संपूर्ण भूषण ( प्रसिद्ध भूषणकवीचें समग्र काव्य ) — १-८

Birth-date of Shivaji ( जन्मतिथीबद्दल साधार इंग्रजींत चर्चा ) — ०-१०

श्रीमंत औंधकर विरचित बाजप्रभूवरील आख्यान. — ०-२

---

* या यादीनें पाठीमागील सर्व याद्या रद्द केल्या आहेत.

× कापडी बांधणीला प्रत्येकी चार आणे जास्त पडतील.